मङ्गल साहित्य प्रकाशन : २५

# मङ्गल साहित्य

— संवत् २००२ —



संपादकः—अमरेन्द्र गाडगीळ

मूल्य तीन रुपये
वैशाख संवत् २००२ : मे १९४६

जनासो अग्निं दधिरे सहोवृधं विधेम ते ।
स त्वं नो अद्य सुमना इहा-विता वाजेषु सन्त्य ॥

—ऋग्वेद

दर्पदमन-सामर्थ्याची वृद्धि करणारा जो अग्नि त्याची भक्तजनांनीं वेदीवर संस्थापना केली आहे. त्यास हवि अर्पण करून आम्हीही त्याला प्रकट व्हावयास लावूं. हे सत्प्रतिपालका — अग्निदेवा, पराक्रमाच्या कृत्यांत आमचा तूं प्रसन्न अंतःकरणानें संरक्षणकर्ता हो.

---


मङ्गल साहित्य प्रकाशन

संचालकः—अमरेन्द्र गाडगीळ

अनुशासकः—श्री. दि. वि. काळे, एम्. ए.
श्री. 'हेमाग्रज'

प्रकाशिकाः—सौ. मङ्गला अमरेन्द्र गाडगीळ,
'मङ्गल साहित्य प्रकाशना 'करतां.
आनन्दचेम्बर्स, आम्बराई, पुणें ४.

मुद्रकः—अमरेन्द्र लक्ष्मण गाडगीळ,
'अग्रणी मुद्रणालय,'
आनन्दचेम्बर्स, आम्बराई, पुणें ४.

# जागरण

विचारापूर्वींची, विचार उत्पन्न होण्याअगोदरची खळबळ आज देशांत सर्वत्र उसळलेली दिसत आहे. आपण कांहीं विचार करावा असें समाजांतल्या वरच्या थरामधल्या कांहीं माणसांना आज नुसतें वाटूं लागलें आहे. यद्यपि विचार निर्माण झालेला आहे असें मात्र दिसत नाहीं; विवेक तर अजून फारच दूर आहे.—आणि आम्ही तर अशा निर्धारानें ठाण मांडून उभे राहण्याचा यत्न करीत आहोंत कीं अर्थयुक्त, हेतुपूर्ण नि ध्येयसाधक असेंच फक्त कांहीं घडवावें. त्या उद्देशानेंच ह्या ग्रंथाची योजना केली.

अर्थात् ग्रंथ जसा प्रथम तयार करावयाचा मनांत योजिला होता तसा तो प्रत्यक्षांत उतरलेला नाहीं. ह्याबद्दल अर्थातच आम्हांस वाईट वाटतें. तथापि कांहीं परावलंबन अटळच असतें. 'वाङ्मयाचा लोकशिक्षणासाठीं कितपत उपयोग होईल ?' हा आमचा प्रश्न. तो आम्हीं कांहीं विद्वानांपुढें मांडला. त्या त्या विशिष्ट साहित्यशाखांतील विद्वानांकडून ह्याचें उत्तर अपेक्षिलें. कांहींनीं श्रमपूर्वक लिहून दिलें; कांहींना लिहावयास सवड झाली नाहीं असें समजूं. तरी सुद्धां 'जो देगा उसका भी भला, जो न देगा उसका भी भला।' असें आम्ही मनाशीं म्हणालों. तथापि त्यामुळें योजनेंत अपुरेपणा राहावयाचा तो राहिलाच, वैगुण्य उरलेंच. त्याचीं कारणें शोधिलीं. त्यावरून मनाशीं एवढेंच उमजलों कीं, आम्हां सर्वांसच अजून पुष्कळ शिकावयाचें आहे. लोकशिक्षणाच्या विवंचनेंत समाजांतील केवळ खालच्याच थरांना शिक्षित करावयाचें नसून 'सुशिक्षित' म्हटल्या जाणाऱ्या आम्हांसहि सुशिक्षणाचे बरेच पाठ गिरवावयाचे अद्यापि बाकी राहिले आहेत.

वाङ्मयाचा उपयोग लोकशिक्षणासाठीं अधिकांत अधिक कसा करून घेतां येईल ही आमची सततची विवंचना आहे. ह्या मङ्गल साहित्य प्रकाशनाचा सारा प्रपंच त्यासाठींच जमविलेला आहे; उभारला जात आहे. आणि त्यांतूनच हें पुस्तकहि जन्म घेत आहे. यांत आमचें स्वतःचें काय आहे ? कांहींच नाहीं, तसें पाहिलें तर ! तरीपण एक आहे—जमवणी—जुळणी—उभारणी. या देशांत शक्ति कांहीं थोडी पडलेली नाहीं. नव्हे, सुवर्णतोलाची शक्ति

मातीमोलानें वांया जात आहे. तिचे अलंकार घडविणारे कुशल कारागीरहि कांहीं कमी होऊन गेले नाहींत. पण उणीव कशाची पडत असेल, वाण कशाची भासत असेल, तर ती या सुवर्णावर योग्य संस्कार होण्याची. या सुवर्णांत जें 'हीण' आज कैक वर्षें शिरून बसलेलें आहे तें काढून टाकण्यासाठीं हें सुवर्ण भट्टींत चांगलें तावूनसुलाखून निघालें पाहिजे. — आणि त्यासाठीं जाणत्या जोखीमदारांकडून जनमनावर योग्य संस्कार घडविण्याचे पुरुषप्रयत्न घडावयास हवे आहेत. अजूनहि, या आमच्या दुरवस्थेंतहि ' कलेसाठीं कला ' असा पक्ष भांडविणारे वाद माजलेले दिसतात !

ज्या समाजांत राहावयाचें, ज्या समाजाकडून संरक्षणाचीच केवळ नव्हे तर गौरवाचीहि अपेक्षा धरावयाची त्या समाजाच्या हितासाठीं कांहीं करण्याचें आपण लागतों, त्यासाठीं कांहीं बंधनें आपल्यावर साहजिकच पडतात हें पत्करावयाचें तर नाहींच, मानावयाचेंहि नाहीं. उलट समाजाकडून अवास्तव अपेक्षा करून त्या सफळ झाल्या नाहींत तर त्याच्याच नांवानें बोटें मोडीत राहावयाचें ! हा केवळ कृतघ्नपणाच नव्हे तर निव्वळ मुर्दाडपणा आहे, असें म्हटलें तर वावगें लागावयास नको. लोकशाहीच्या या युगांतलें आपल्या देशामधील विपरीत असें आहे कीं, लोकशाहीचे निर्बंध स्वत:वर घालून घेण्यास सबुद्ध ( सुबुद्ध नव्हे ! ) आणि जाणितेहि तयार नाहींत. विध्यर्थवाद्यांनींच या लोकशाहीची सारी बैठक व्यापिलेली दिसते. जें ' नवीन ' म्हणून, ' पुरोगामी ' म्हणून, ' क्रांतिकारक ' म्हणून आमच्यापुढें कांहीं टाकलें जातें त्याची अवस्था तर न्यारीच ! काश्मिरी शाल म्हणून घडी मोडावयास जावें आणि उस्तरलेल्या गोधडीचीं लक्तरें हातीं यावींत तसें घडतें ! पण हट्ट मात्र असा कीं आम्ही त्यांनाच शालीचें मोल दिलें पाहिजे; गुणवान म्हणून गौरविलें पाहिजे.

ही स्थिति यापुढें चालूं देतां कामा नये. असें घडविण्यासाठीं म्हणजे ही स्थिति पालटविण्यासाठीं प्रथम जनमनाला काय हवें नि काय नको, कोणतें इष्ट नि कोणतें अनिष्ट याची जाणीव उत्पन्न झाली पाहिजे. सारासार काय तें

त्यांना समजलें—उमजलें पाहिजे. त्यांना जाणतें केलें पाहिजे. तें त्यांना शिकविलें पाहिजे. त्यासाठींच लोकशिक्षण हवें आहे. या लोकशिक्षणाचीं अनेक साधनें असतात. वाङ्मय-निर्मिति आणि त्याचा प्रसार हें त्यांपैकीं एक साधन इतक्याच भावनेनें आम्ही त्याकडे पाहातों. 'एकदां सुचलेला विचार छापून टाकला कीं समाजाचे संबंधांत आपलें ऋण फेडलें' असा आमचा 'युक्तिवाद' नाहीं. उलट वाङ्मयाकडे पाहाण्याचा आमचा दृष्टिकोन सर्वथा असाच आहे कीं, समाजांत जें घडत आहे त्याचें यथातथ्य प्रतिबिंब त्यांत दिसावें; आणि त्याच वेळीं जें घडूं नये त्याचा खडखडीतपणें निषेध व्हावा व अवश्य घडावयास हवें त्याचा आग्रह आवर्जून प्रतिपादला जावा. कारण साहित्य हें समाजाचें प्रतिबिंब असें आम्ही मानतों. आजचें एका टोंकाचें निस्त्राण नि दुसऱ्या टोंकाचें स्वप्नाळू अशीं दोन्ही दिसणारीं साहित्याचीं चित्रें हीं आपल्या आजकालच्या समाजाचीं केवळ प्रतिबिंबेंच म्हटलीं पाहिजेत.—याचा उहापोह या पुस्तकांतच कांहीं विचारवंत नि खंबीर लेखकांनीं स्पष्टपणें केलेला आहे.—पण यानें निभाव लागणार नाहीं. या देशाला पुनः राष्ट्रीय जीवनाची समृद्धि करून घ्यावयाची असेल तर या उलटच्या मार्गानें जाऊन भागणार नाहीं. कलावंतांना वाटतें आणि कृतिशून्य 'बहुजन' समाजाला आवडतें तें नव्हे, तर विचारवंतांना पटतें आणि कृतिप्रवण कार्यकर्त्यांना रुचतें तेंच वाङ्मय समाजांत प्रसृत झालें पाहिजे; तसें करण्यासाठीं श्रमपूर्वक यत्न झाला पाहिजे. प्राचीन ऋषींच्या अर्थामागून शब्द जसे धांवत तसें आजहि कार्यकर्त्यांच्या कृतीमागून साहित्य धांवलें पाहिजे. कृतीला शब्दानुसारिणी करण्याचा खटाटोप व्यर्थ आहे.

आणि ज्यांच्या ठायीं समर्थांसारखें, टिळकांसारखें 'चालण्यासारखें बोलणें नि लिहिणें' राखून जनप्रवाह पालटविण्याचें सामर्थ्य असेल ते कांहीं आमच्या या लिहिण्यासाठीं अडून बसलेले नसतील!—आज मात्र दुर्दैवानें तसे कोणी दिसत नाहींत. समर्थांच्या संघटनेंतून 'दासबोध' जन्माला आला आणि नंतर 'आधीं केलें मग सांगितलें' अशा 'दासबोधा'नें

त्यांच्या संघटनेचें सामर्थ्य प्रसारिण्यास नि वाढविण्यास साहाय्य केलें. लोकमान्यांच्या स्वराज्यसाधनेंतून 'केसरी' उभा राहिला आणि नंतर तो कार्याचा प्रचंड अग्नि धगधगत होता म्हणूनच 'केसरी'नें त्या साधनेंतील चैतन्य शतगुणित केलें. हा इतिहास सोयिस्कररीतीनें कोणी विसरेल तरच कृतिशून्य, अनुत्तरदायी नि हेतुरहित साहित्याचाहि आजचा उदोउदो सुसंगत ठरेल. वाङ्मय अवश्य निर्माण व्हावयास हवें आहे पण तें निदान आज तरी लोकशिक्षणाचा हेतु मनांत धरूनच व्हावयास हवें. सद्यःफलदायी असें कांहीं केवळ यांतूनच निर्माण होईल. आणि मनास मानेल तें कसें तरी नि कांहीं तरी लिहावें, प्रसिद्धावें असें — जें आज घडत आहे — होत राहिल्यास, 'यद्वा तद्वा भविष्यति ।' हेंच भविष्य वर्तवावें लागेल. अभ्यास, परिश्रम, हेतुविषयींची निष्ठा आणि मनाचा कांहीं खंबीरपणा हें आज हुडकीतच फिरावें लागतें. 'समाज' सुधारण्याचें तर दूरच आहे. 'बहुजन' समाजाला शहाणें करण्याचें तर लांबच आहे. आज या 'समाजा'ला, 'बहुजना'ला सुधारण्याचा दावा सांगणाऱ्यांनीं स्वतःलाच सुधारलें, शहाणें केलें पाहिजे असें म्हटल्यावांचून राहावत नाहीं. सामाजिक कर्तव्याची जाणीव, त्यासाठीं खंबीरपणानें, नेटून उभें राहण्याची सिद्धता या गोष्टी जर समाजाच्या वरच्या थरांत प्रकर्षानें दिसूं लागतील तर त्याचें प्रतिबिंब खालच्या थरांतून उमटल्याशिवाय राहाणार नाहीं. कारण

**"येथें शब्द नाहीं शिष्यासी ।**
**हें तों अवघें सद्गुरुपाशीं ॥"**

व्यक्तिनिष्ठ वा स्वयंनिष्ठ सुखासीनतेच्या दलदलींतून जर आम्ही बाहेर पडूं आणि स्वप्नरंजित कल्पनासृष्टींत भराऱ्या मारण्याचें जर आम्ही मनांत आणणार नाहीं; आणि आम्हांस ध्येयपूत स्वातंत्र्याच्या वाऱ्यावर जर कसला उच्च घोष करावयाचा असेल तर तो ह्याच जागरणाचा आहे कीं —

**प्रथम** आम्हांस जगावयाचें आहे !

— **संपादक**

जेणें सद्‌बुद्धि लागे। जेणें पाषांड भंगे।
जेणें विवेक जागे। या नांव कवित्व ॥

*श्रीदासबोध* (द. १४ स.४ ओ. ५१)

# मङ्गल साहित्य

## ( संवत् २००२ )

**विसाव्या शतकांतील मराठीचें विचार-धन —**
प्रा. श्री. म. माटे, एम्. ए. – मराठीचे प्राध्यापक, स. प. महाविद्यालय, पुणें.

**वृत्तपत्रांचें राष्ट्रीय जीवनांतील स्थान —**
श्री. दा. वि. गोखले, बी. ए., एल्एल्. बी.— सहसंपादक ‘ केसरी.’

**आजचें जनतावाङ्मय प्रातिनिधीक आहे काय ? —**
प्रा. अनन्त काणेकर, बी. ए., एल्एल्. बी. – मराठीचे प्राध्यापक, खालसा महाविद्यालय, मुंबई.

**सरस्वतीच्या सामर्थ्याची हिंदुस्थानांतील हेळसांड —**
डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे – मराठीचे डी. लिट्. ( मुंबई विद्यापीठ ).

**चालू महत्त्वाचीं पांच प्रश्नोत्तरें —**
साहित्यसम्राट न. चिं. केळकर ( संभाषण ).

**विज्ञानाची उपासना शास्त्रयुक्तच हवी —**
प्राचार्य गो. रा. परांजपे, एम्. एस्सी., ए. आय्. आय्. एस्सी., एफ्. एन्. आय्., जे. पी., आय्. ई. एस्. ( निवृत्त ) – माजी प्राचार्य ( प्रिन्सिपॉल ) रॉयल इन्स्टिटय़ूट ऑफ सायन्स, मुंबई.

**इतिहास-वाङ्मय आणि लोकशिक्षण —**
श्री. दि. वि. काळे, एम्. ए. – संपादक ‘ सह्याद्रि ’ पुणें.

**मराठी पुस्तकांवरील मुखपृष्ठांची सजावट —**
श्री. ज. ग. देवकुळे, प्रसिद्ध औद्योगिक चित्रकलागृह, ‘ दि रॅशनल आर्ट सर्व्हिस ’चे संस्थापक, मुंबई.

**साहित्यिकांना सामाजिक जोखमीची जाणीव** ( प्रश्नोत्तरें ) —
रावसाहेब ना. गो. चापेकर, बी. ए., एल्एल्. बी. – जुन्या पिढींतील एक विचारवंत व निस्पृह साहित्यिक.

**हत्याराचा कायदा** ( एक आदर्श कथा ) —
१८५७ च्या धामधुमींतील एक प्रसंग. श्री. चिं. य. मराठे. – यांच्या शैलींतील ऐट आणि कथनांतील जोम हाच यांच्या नांवाचा पुरेसा परिचय आहे.

प्रा. श्रीपाद महादेव माटे, एम्. ए.

# विसाव्या शतकांतील मराठीचें विचार-धन

---

चालू म्हणजे विसाव्या शतकांमध्यें हिंदुस्थानांतील विचार-धनांत महाराष्ट्र भाषेनें जी स्पृहणीय भर घातलेली आहे तिचें सम्यक् दर्शन अगदीं मोजक्या शब्दांत येथें करून दिलें आहे. ज्यामुळें प्रगतीच्या मार्गावर भारतीय जनतेचीं, कांहीं पावलें निश्चित पडलीं त्या या आठ-दहा प्रकारच्या विचार-धन निर्मितीबद्दल प्रत्येक मराठी भाषिकाला अभिमान आणि साऱ्या भारतीयांना कृतज्ञता अवश्य वाटण्यासारखी आहे.

---

महाराष्ट्राबाहेरच्या एका स्वतंत्र प्रकाशनाच्या संपादकांनीं 'विसाव्या शतकांत मराठी भाषेनें हिंदुस्थानाला दिलेलें विचार-धन' या विषयावर मला एक लेख लिहावयास सांगितला होता तो मीं लिहिला आहे; आणि तो यथाकाल प्रसिद्धहि होईल. परंतु त्याच लेखांतील सर्व विचार मराठी भाषेंतहि कोठें तरी नमूद केलेले असावे, असें मला व माझ्या मित्रांना वाटल्यावरून, श्री. अमरेन्द्र गाडगीळ यांनीं लेख लिहून देण्याचें बोलणें काढतांच तोच विषय मीं निश्चित केला.

गेल्या पंचेचाळीस वर्षांत मराठी भाषेची प्रगति फार जलदीनें झालेली आहे. तिला अनेक शाखोपशाखा फुटल्या आहेत आणि मोठमोठाल्या विचारवंत साहित्यिकांनीं आपलें विचार-धन तिच्या वाङ्मयांत प्रकट केलें आहे. शोध करून पाहिलें असतां, अगदीं नवें असें बेताचेंच भेटतें. हा न्याय आपल्याच भाषेला लागू आहे, असें नाहीं. जें पूर्वी कोणाला सुचलें नव्हतें, जें वाचल्याबरोबर एका नव्या वस्तूची गांठ पडली म्हणून वाचकाच्या मनाला मोठें आल्हादकारक आंदोलन मिळावें आणि ज्याच्या योगानें देशांतील विचारप्रगतीला विशेष प्रकारचें वळणहि मिळावें, तेंच काय तें नवीन या संज्ञेला पात्र झालेलें असतें. गेल्या पंचेचाळीस वर्षांत मराठी भाषेंत अशासारखें नवीन कोणचें झालें, याचा तपास करून पाहिला, तर माझ्या मतानें जी उत्तरें मिळतात, तीं मी पुढील लेखांत सांगितलेलीं आहेत. माझ्या वाचनाचा पल्ला रुचि-विकलत्वामुळें असावा तितका मोठा नाही आणि म्हणून कांहीं नव्या गोष्टी माझ्या या गणनेंतून वगळलेल्या दिसतील; पण त्या मी मुद्दाम वगळलेल्या नाहींत; मला त्यांची माहिती नाहीं, इतकेंच काय तें.

### लोकमान्यांचें ‘ गीतारहस्य ’

हिंदुस्थानांतील विचार-धनांत या कालखंडांत महाराष्ट्र भाषेनें, घातलेली । अगदीं ठळक भर म्हणजे कै० लोकमान्य टिळक यांनीं प्रतिपादिलेला गीतेंतील कर्मयोगाचा सिद्धांत, ही होय. गीतेचा मुख्य प्रतिपाद्य विषय कर्मयोग आहे, हें मत टिळकांनीं आपल्या ‘ गीतारहस्यां ’त मोठ्या चतुराईनें, विद्वत्तेनें, आणि आग्रहानें प्रतिपादिलें आहे. गीतेंत ज्ञानयोग सांगितलेला आहे किंवा भक्तियोग सांगितलेला आहे, हीं मतें आपल्याला माहीत होतींच; परंतु श्रीकृष्णानें या दोनहि योगांचा प्रपंच भगवद्गीतेंत केलेला असला, तरी त्याचें मुख्य प्रतिपादन कर्मयोगाचें आहे, हें मत आपल्या ‘ गीतारहस्यां ’त टिळकांनीं नाना प्रकारानें सिद्ध केलेलें आहे.

लहानपणापासूनच टिळकांच्या मनावर गीतावाङ्मयाची छाप बसलेली होती. प्रौढपणीं पांडित्याचें स्फुरण होऊं लागल्यानंतर आणि स्वतंत्र विचाराची धमक उत्पन्न झाल्यानंतर लोकमान्यांना असें वाटूं लागलें कीं, श्रीकृष्णानें गीतेंत कर्मयोगाचेंच प्रतिपादन केलेलें आहे. राजकारणाच्या धबडग्यांत आपल्या आवडीच्या शास्त्रीय व तत्त्वज्ञानाच्या विषयांकडे लक्ष देण्यास त्यांना फारशी फुरसत सांपडत नसे; परंतु जो कांहीं वेळ त्यांना सांपडला, तेवढ्यांत त्यांनीं या ज्ञानाचें वाचन चालू ठेविलें होतें, आणि प्रसंगोपात्त, गीता कर्मयोगपर आहे, हें आपलें मत त्यांनीं एकाद्या एकाद्या व्याख्यानांत बोलूनहि दाखविलें होतें. परंतु, तेव्हां वाटलेल्या दुर्दैवानें, आणि आतां वाटत असलेल्या सुदैवानें त्यांना सहा वर्षेपर्यंत ब्रह्मदेशाच्या जुन्या राजधानींतील किल्ल्याच्या एका लहानश्या खोलींत एकांतांत काढावी लागलीं. या सहा वर्षांचा टिळकांनीं पुरापुरा उपयोग करून घेतला, आणि आपलें 'गीतारहस्य' सिद्ध केलें.

परत आल्यानंतर त्यांनीं आपला हा महद्ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथाचें पांडित्य, त्यांतील संदर्भांचें वैपुल्य, त्यांतील कोटिक्रमांची कुशलता, पाश्चात्य व पौर्वात्य तत्त्वज्ञानांचें ग्रंथकर्त्यानें केलेलें आलोडन, त्याचा आर्यसंस्कृतीचा कडवा अभिमान, त्याची झुंझार वृत्ति, इतकेंच काय त्या ग्रंथाचा आकार, या सर्वांचा तेव्हांच्या महाराष्ट्र जनतेवर इतका विलक्षण परिणाम झाला कीं, कित्येक महिनेपर्यंत लोकांच्या तोंडीं या ग्रंथाशिवाय दुसरा विषयच नव्हता. ज्ञानमार्गाचे व भक्तिमार्गाचे अभिमानीसुद्धां कांहीं काळपर्यंत दिपून गेल्यासारखे झाले. परंतु शंकराचार्य आणि ज्ञानेश्वर महाराज यांच्या अभिमानी पंडितांनीं लवकरच टिळकांच्यावर परत हत्यार उगारलें. या प्रतिहल्ल्यानें, टिळकांच्या हातांत सांपडलेलीं कांहीं थोडींशीं ठाणीं या लोकांनीं परत घेतलीं, परंतु टिळकांच्या मुख्य सिद्धांताला त्यांना कांहींहि बाधा करतां आली नाहीं.

लोकमान्यांच्या या ग्रंथाचीं भाषांतरें हिंदुस्थानांतील इतर भाषांत

भराभर होऊं लागलीं आणि त्यांच्या पश्चात् इंग्रजींतहि त्याचें भाषांतर झालें. प्रांतोप्रांतींच्या भाषांत हा महद्ग्रंथ जाऊन पोहोंचल्यावर टिळकांच्या या नव्या सिद्धांताला अधिकच बळकटी प्राप्त झाली. आणि महाराष्ट्र भाषेंत लिहिणाऱ्या या महापंडिताच्या ग्रंथांतून आपल्याला एका अभिनव विचाराची प्राप्ति झाली असें शेंकडों पंडित व अभ्यासक मानूं लागले. टिळकांचें हें मत सर्वसंमत झालें आहे असा दावा कोणीच सांगूं नये. खुद्द शंकराचार्यांचें मत तरी कोठें सर्वमान्य झालें आहे ! पण टिळकांनी भारतीय विचार-धनांत या ग्रंथाच्या द्वारां स्वतंत्र भर घातली आहे, हें कोणासच अमान्य करतां येणार नाहीं. ही भर मराठी भाषेच्या द्वारां पडली, हें ध्यानांत ठेवावयास हवें. मराठी भाषेचा दर्जा या नव्या धनानें एकदम कितीतरी वाढला.

### राजवाड्यांचे तीन विचार

कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनींहि भारतीय विचार-धनांत अशीच स्वतंत्र भर घातली आहे. या धनाची ओळख इतर प्रांतांतील किती लोकांनीं करून घेतली, आणि त्याची पारख करण्याचें पांडित्य दाखविलें हा प्रश्न स्वतंत्र आहे; परंतु राजवाडे यांनीं ही भर घातली, हा मुद्दा मात्र डावलून चालावयाचें नाहीं. राजवाडे यांनीं इतिहासविचाराच्या क्षेत्रांत प्रथमच हा विचार आणून सोडला कीं, आपल्या देशाचा इतिहास जर विश्वास्य पद्धतीनें लिहावयाचा असेल, तर बखरवाङ्मयाला प्रामाण्य देतां उपयोगाचें नाहीं; समकालीन पत्रव्यवहार शोधून काढावे, आणि त्यांच्या आधारानें इतिहास लिहावा. हा आपला सिद्धांत राजवाडे यांनीं हरतऱ्हेच्या प्रमाणांनीं ठोकून बसविला आणि समकालीन पत्रव्यवहार हुडकून काढावा, हें स्वप्रणित सूत्र प्रत्यक्ष आचारानें ते जन्मभर सिद्ध करीत राहिले. ऐन उमेदींत विचारपूर्वक बनविलेल्या मताची अंमलबजावणी इतक्या निष्ठेनें आणि चिकाटीनें सर्व हयातभर फार थोड्या लोकांनीं केली असेल. त्यांनीं संशोधनाचा आखाडाच

मांडला आणि त्यांचा हा सिद्धांत इतका वीर्यशाली ठरला कीं, महाराष्ट्रांत याच धोरणानें चालणारी संशोधकांची एक स्वतंत्र कुळी प्रस्थापित झाली. आपल्याकडील संशोधकांची नामावळी वाचून पाहावी आणि त्यांनीं केलेलें कार्य पाहावें. म्हणजे असें दिसून येईल कीं यांतले नव्याण्णव टक्के लोक राजवाड्यांच्या कुळींत उत्पन्न झालेले आहेत. परप्रांतांतील मोठमोठाले लोक कबुली देवोत किंवा न देवोत, परंतु सरकार–दरबारांतील समकालीन अस्सल पत्रव्यवहार प्रसिद्ध करण्याची जी प्रथा त्यांनीं पत्करलेली आहे, तिचा मुळारंभ राजवाड्यांच्या या सिद्धांतानेंच झालेला आहे. ' मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें ' असें विनयशील नांव त्यांनीं आपल्या तेवीस-चोवीस खंडांना दिलेलें आहे; आणि या खंडांच्या बाहेरहि सहस्रावधि पत्रें त्यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत. प्रत्यक्ष इतिहास लिहिण्याकडे त्यांचें मनच झुकेना; इतकी पत्रसंशोधनावर त्यांची श्रद्धा बसली. असो. हा सिद्धांत म्हणजे, राजवाडे यांनीं भारतीय विचारांत घातलेली एक महत्त्वाची भर होय.

राजवाडे यांनी आणखी एक भर घातली. भाषा, शब्दसिद्धि, व्याकरण, यांतून ऐतिहासिक पुरावे उपलब्ध करून घेतां येतात, हें राजवाडे यांनीं दाखवून दिलें. एकादें लिखाण लिहितांना, आपल्या लेखांतून पुढें कांहीं ऐतिहासिक प्रमाणें उपलब्ध व्हावीं, असा हेतु ठेऊन कोणीच लिहीत नाहीं. रूढ असलेल्या भाषा-पद्धतीनें तो लिहितो आणि प्रचलित असलेल्या शब्दसंहति, वाक्प्रचार, व्याकरणाचीं रूपें, इत्यादिकांचा उपयोग तो स्वाभाविकपणेंच करीत जातो; परंतु या शब्दसंहति, इत्यादिकांवरून लोकांच्या समजुती, त्यांचे अभिमान आणि त्यांचें कालमान, यांच्याविषयींचा बोध प्रसंगविशेषीं होऊन जातो. राजवाडे यांनीं विविध तऱ्हेच्या उदाहरणांनीं दाखवून दिलें आहे कीं, या विशेषांचा उपयोग ऐतिहासिक प्रमाणें उत्पन्न करावयास अनेक ठिकाणीं होतो. राजवाडे यांनीं महाराष्ट्र भाषेंत विचाराची ही नवी भर घातली; आणि परंपरेनें भारतीय विचारांतहि घातली, असें

म्हणावयास हरकत नाही. राजवाडे यांच्या स्फुट लेखांचा व टिपणवजा लेखांचा संग्रह जर का कोणीं प्रसिद्ध केला, तर त्यावरून त्यांनीं दाखविलेली इतिहाससंशोधनाची ही नवी वाट रसिकांच्या सहज ध्यानांत येईल.

राजवाडे यांनीं आणखीहि एक धन मराठीला व परंपरेनें भारताला दिलेलें आहे. अगदीं आरंभापासून त्यांना इतिहासाचा हव्यास होता, हें प्रसिद्धच आहे. इतिहास-संशोधनाचें कार्य करतां करतां, ऐतिहासिक पुराव्याचे पाझर केवळ वाङ्मयरूप ग्रंथांतून सुद्धां कसे बाहेर पडत असतात, हें त्यांना कळून चुकलें. याचा अर्थ असा की, इतिहास-संशोधनाची त्यांची दृष्टि, प्रमाणशोधनाच्या कामीं सूक्ष्म होत चालली. परंतु ते येथेंच थांबले नाहींत. आपण इतिहास असें जरी म्हटलें, तरी साकल्येंकरून विचार करतां, इतिहास म्हणजे, एकाद्या लोकांचें जीवनचरित्रच होय. माणसाच्या जीविताला जितक्या शाखा असतात, तितक्याच सगळ्या इतिहासालाहि उत्पन्न व्हाव्या, हें ओघानेंच येतें. पण याहिपेक्षां बलवत्तर विचार म्हणजे हा कीं, अमुक एका मानव-संघाचें जीवित अशा प्रकारचेंच कां व्हावें, त्याच्या मनांत याच भावना कशासाठीं उत्पन्न व्हाव्या, अमुक एक प्रकारचे स्वभावविशेष त्याच्या ठिकाणी कां उत्पन्न व्हावे, त्याच्या हातून झालेले प्रमाद कोणच्या कारणासाठीं केवळ अटळ होते, त्याला जर सुदीर्घ जीवित लाभलें असेल किंवा तो अल्पायु ठरला असेल, तर हे विशेष त्याच्या आयुष्यमर्यादेला कशानें प्राप्त झाले असतील, याचें संशोधन करणें हें इतिहासकाराला अवश्य झालें आहे. घडलेली गोष्ट आहे तशी सांगणें हें इतिहासाचें काम आहे हें खरें, आणि ज्याला एवढेंच करणें झेपेल त्यानें तेवढें करूनच संतोष पावावा; परंतु ज्याच्या अंगांत धमक असेल, म्हणजे ज्याची कल्पनाशक्ति पुरेशी तीव्र आणि तरळ असेल तो यांच्या पुढें जाऊं इच्छितो. अमुक एक बनाव घडला, एवढें सांगण्यानेंच त्याचे समाधान होत नाहीं. तो तसा कां घडला असावा, याचें विवेचन करण्याची हिंमत धरून तो

भूतकाळांच्या पाण्यांत डोळे घालून पाहातो. कल्पनाशक्तीच्या बळावर, एरवीं एकमेकांपासून अलग असलेल्या घटना एकमेकींस कांहीं दूरस्थ नात्यांनीं कशा चिकटल्या आहेत, हें त्याला कळूं लागतें; आणि एरवीं लोकांना ज्या घटनांचे संबंध विशद होत नाहींत त्या घटनांचा कार्यकारण संबंध इतिहासकार आपल्या ह्या प्रतिभेच्यां बळावर स्पष्ट करून सांगतो. इतिहासकाराला याच्याहि पुढें जाणें प्राप्त असतें. ज्याला जातां येईल, त्यानें अवश्य जावें. ज्या मानव-संघाचा इतिहास तो लिहीत असतो, त्याचा समाजच मुळांत कसा बनला आहे हा उमग आपल्या इतिहासकाराला पडणें अवश्य आहे. त्या लोकांचा मनःपिंड व शरीरपिंड कोणच्या मूलभूत सामाजिक कारणांनीं अंकित झालेला आहे याचें ज्ञान जर त्यानें करून घेतलें, तर त्या संघाच्या इतिहासांतील विविध घटना अमुक एक प्रकारें कां झाल्या, हें त्याला इतरांपेक्षां जास्त चांगल्या तऱ्हेनें सांगतां येईल. याचा अर्थ असा कीं, इतिहासकाराला निरनिराळ्या समाजांच्या घटना-पद्धति व एकंदर समाजशास्त्र यांचें ज्ञान असणें अवश्य आहे. आपल्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं राजवाडे यांच्या मनांत हा समाजशास्त्राच्या अभ्यासाचा विषय विशेषच घोळूं लागला होता. कारण जीं ऐतिह्य प्रमाणें संशोधण्याच्या कामास ते प्रवृत्त झालेले होते, त्या प्रमाणांचें अगदीं खोलांतलें उगमस्थान त्या त्या लोकांच्या सामाजिक बांधणींत आहे, हें त्यांना कळून चुकलें होतें. हा आणखी एक विचार राजवाडे यांनीं आपल्या लोकांना शिकविला; आणि परंपरेनें तो सर्वांच्याच उपयोगाचा होण्यासारखा होता. इतिहासकाराला सामाजशास्त्राचें म्हणजे Sociology चें ज्ञान असावयास हवें, हें तिसऱ्या प्रकारचें विचार-धन त्यांनीं आपल्या लोकांना दिलें. अशाप्रकारें ( १ ) विश्वास्य इतिहास समकालीन पत्रव्यवहारावरच रचतां येईल; ( २ ) ऐतिह्य प्रमाणें भाषेंतून व व्याकरणांतून सुद्धां उपलब्ध करून घेतां येतात; व ( ३ ) इतिहासकारानें त्या त्या समाजाच्या सामाजिक बांधणीपर्यंत पोहोंचावयास हवें म्हणजेच त्यानें Sociology चाहि अभ्यास

करावयास हवा हे तीन नवे विचार राजवाडे यांनी ऋणरूपानें आपणांस दिले आहेत, असें म्हटलें पाहिजे.

## शिवरामपंतांचीं दोन ऋणें

कै. शिवरामपंत परांजपे यांचें जप्त झालेलें 'काळ' पत्रांतील वाङ्मय जेव्हां केव्हां मुक्त होईल, तेव्हां आपण त्यांचें कोणचें ऋण लागतों, याचें प्रस्तुत परिच्छेदांत मी केलेलें विवेचन नवीन पिढींतील वाचकांस खरें वाटूं लागेल. पुष्कळ लोक असें समजतात कीं, शुद्ध राजकीय स्वातंत्र्याची कल्पना अमक्या किंवा तमक्या काँग्रेसच्या ठरावामुळें आपल्याला माहीत झाली आहे किंवा त्या संस्थेच्या या किंवा त्या पुढाऱ्याच्या स्फुरणानें हा स्वातंत्र्याचा संदेश लोकांना मिळालेला आहे. असें मुळींच झालेलें नाहीं. महाराष्ट्र देशांत स्वातंत्र्याचा संदेश कधींच मेलेला नव्हता. क्वचित् प्रसंगीं दरोडेखोरीचें रूप धारण करून, क्वचित् प्रसंगीं लपत छपत राहून, क्वचित् प्रसंगीं देशांतर करून हा संदेश महाराष्ट्रांत अखंडपणें जागृत राहिलेला होता. आपला प्रस्तुतचा विषय मराठी भाषेनें दिलेल्या धनासंबंधीचा आहे. विसाव्या शतकांत मराठी भाषेनें महाराष्ट्राला आणि पर्यायानें अखिल भारताला हा स्वातंत्र्याचा संदेश दिलेला आहे. आणि तो कै. शिवरामपंत परांजपे यांच्या हस्तें दिलेला आहे. १८९८ ते १९०८ पर्यंत चालू असलेल्या त्यांच्या 'काळ' पत्रानें शुद्ध राजकीय स्वातंत्र्याचें प्रतिपादन निर्भयपणानें आणि अव्याहत चालविलें होतें. शिवरामपंत हे चिल्हर सुधारणांचा तिरस्कार करीत. इंग्रजांच्या तावडींतून आपला देश मुक्त व्हावा, आणि तो पूर्णतया स्वतंत्र व्हावा, आणि असें झालें, तरच आपल्या लोकांनीं समाधान मानावें, हें शिवरामपंत यांनीं महाराष्ट्राला व हिंदुस्थानाला पहिल्यानें शिकविलें. एकमेकांच्या भाषेंतील उदात्त विचारांची भाषांतरें करून घेणें, ही चाल तेव्हां पडली नव्हती, याला नाइलाज आहे. ती चाल जर असती, तर शिवरामपंतांचें हें ऋण भारतांतील सर्व

प्रांतांच्या लोकांनीं खुषीनें घेतलें असतें व मान्य केलें असतें. कोणी गैरमाहितगार लोक सांगतात कीं, बाबू अरविंद घोष यांनीं आपल्या ‘ युगांतर ’ व ‘ वन्देमातरम् ’ या पत्रांतून शुद्ध स्वातंत्र्याची कल्पना लोकांपुढें पहिल्यानेंच मांडली. हें त्यांचें सांगणें चूक आहे. स्वातंत्र्याची कल्पना लोकांपुढें मांडल्याचें पहिलें श्रेय शिवरामपंत परांजपे यांसच द्यावयास हवें. ‘ काळ ’ पत्राचा एक अंक असा गेला नसेल, कीं ज्यांत शिवरामपंतांनीं स्वातंत्र्याचें गायन केलें नाहीं.

पण शिवरामपंतांचें आणखीहि एक ऋण आपण लागतों. इंग्रजी अंमलाची कैची त्या काळीं इतकी कांहीं चमत्कारिक असे कीं, जें आपल्या मनांत आहे, तें उघडपणें बोलून दाखविणें मोठें कठीण होऊन बसत असे. लोक म्हणतात कीं, वक्त्याच्या अंगी काय किंवा लेखकाच्या अंगीं काय, स्पष्टवक्तेपणाचा गुण असावा, आणि आपल्याला जें कांहीं सांगावयाचें असेल, तें सांगण्याचें धैर्य त्याच्या अंगीं असावें. हा सामान्य सिद्धांत सर्वांसच मान्य आहे. परंतु हें धोरण नित्य उठून अंमलांत आणावयाचें म्हटल्यास मत-प्रतिपादनाचें काम कधीं तडीसच जावयाचें नाहीं. मी बोललों, तर स्पष्ट आणि उघड बोलेन, नाहींतर बोलणारच नाहीं, असा आग्रह जो कार्यकर्ता धरील, त्याच्या हातून कांहींच व्हावयाचें नाहीं. इंग्रजांनीं चालविलेली मुस्कटदाबीच इतकी भयंकर होती कीं, स्वातंत्र्याचा उघड घोष करणें, खरोखरच अशक्य होतें. अर्थात् शिवरामपंतांनीं मराठी भाषेंत एक नवें शस्त्र उत्पन्न केलें. त्याचें नांव ‘ उपरोध ’ हें होय. हें शस्त्र म्हणजेसुद्धां महाराष्ट्र भाषेच्या द्वारां शिवरामपंतांनीं आपल्याला व पर्यायानें भारतीय जनतेला दिलेली एक देणगीच होय. त्यांच्यापूर्वीं हें शस्त्र कोणाला घडवितांहि आलें नाहीं आणि चालवितांहि आलें नाहीं; परंतु शिवरामपंतांच्या या शस्त्राची धार इंग्रजाच्या अंगाचें प्रत्यहीं रक्त काढूं लागली आणि स्वकीयांच्या दृष्टीला मात्र हें शस्त्र वाङ्मयाच्या एकाद्या सुंदर अलंकारासारखें त्यांच्या हातीं शोभून दिसूं लागलें. उपरोध, छद्म, कुत्सा, लावून लिहिणें, अंगीं लावणें, चालटें घेणें, कलाटणी देणें, हातचलाखी

करणें, दुटप्पीपणानें बोलणें, या बोटावरची थुंकी त्या बोटावर करणें, मानभावीपणानें बोलणें, मनस्येकं-वचस्येकं हें धोरण राखणें,—या सर्वांचा एक रांधा बनवून शिवरामपंत यांनीं आपल्या या नव्या शस्त्राला त्याचें पाणी दिलें होतें. ही एक नवी किमयाच होती. शुद्ध राजकीय स्वातंत्र्याची शिकवण जशी शिवरामपंत यांनीं पहिल्यानेंच दिली, तशी या अद्‌भुत वाङ्मयीन शस्त्राची निर्मिती यांनींच पहिल्यानें केली. हीं दोन ऋणें मराठी भाषेच्या द्वारां आपल्याला व पर्यायानें अखिल भारताला शिवरामपंतांनींच दिलेलीं आहेत.

### केतकरांचीं तीन धनें

विसाव्या. शतकाच्या आतांपर्यंत लोटलेल्या कालावधींत महाराष्ट्र भाषेच्या द्वारां खुद्द महाराष्ट्रीयांचे आणि पर्यायानें अखिल भारतांतील लोकांचे धनको बनण्याचा मान मिळविलेले चवथे गृहस्थ म्हणजे डॉ. केतकर हे होत. केवळ ५२ वर्षांच्या वयाला या कर्तबगार माणसाला मरण आलें. सुमारें पंचवीस वर्षांच्या अवधींत या गृहस्थानें मराठी वाङ्मयांत केवळ अद्‌भुत कामगिरी केली; आणि याचें मुख्य कारण असें कीं, जीविताच्या आरंभस्थानींच योजना—पुरस्सरतेची कल्पना त्यांना आलेली होती. होत होत कांहीं तरी व्हावयाचें असें बहुतेकांचेंच असतें. कांहीं थोडे लोक ऐन तारुण्यांत आपल्या भावी जीविताचा नकाशा आंखतात. डॉ. केतकर हे अशा लोकांपैकीं होते. राजवाडे यांच्या प्रमाणेंच कै. केतकर यांनींहि तीन प्रकारची विचारसरणी आपल्याला दिली. मराठी भाषेंत ग्रंथरचना चालूच होती; आणि जिज्ञासू लोक, पुस्तकें जसजशीं होत जात होती तसतशीं तीं वाचीत होते. परंतु इंग्रजी भाषेच्या अभ्यासाशिवाय खरें खरें ज्ञान लोकांना प्राप्त होत नव्हतें आणि इंग्रजी शिक्षणाचा प्रसार, कितीहि खटाटोप केला तरी, फार मर्यादितच होत होता. आपल्या लोकांना जर शहाणे करावयाचें असेल आणि त्यांच्या सुसंस्कृतपणाची कमान जर उंच करावयाची असेल तर सर्व प्रकारचीं ज्ञानें त्यांच्या

अधिकाराच्या कक्षेंत आणून सोडलीं पाहिजेत, व हें काम 'ज्ञानकोश' रचल्यानेंच होण्यासारखें आहे ही विशाल कल्पना केतकर यांच्या मनांत दृढ झाली. आपल्या लोकांच्या जरूरीच्या दृष्टीनें कोणच्या गोष्टीला किती महत्त्व द्यावयाचें हें ठरवावें व अस्ताव्यस्त पडलेलें ज्ञान ज्ञानकोशाच्या रूपानें सुसंघटित करून लोकांपुढें मांडावें, ही कल्पना डॉ. केतकर यांनीं मराठी भाषेंत प्रथमच आणली आणि केवळ अलौकिक अशा संघटनेच्या बळावर त्यांनीं ती सिद्ध करून दाखविली. 'विश्वकोश' रचावा ही गोष्ट महाराष्ट्रांतच काय, पण हिंदुस्थानांतहि नवी होती. डॉ. केतकर यांनीं ती मराठी भाषेंत खरी करून दाखविली; आणि जर त्यांना सुदीर्घ आयुर्मान लाभलें असतें तर त्यांच्या या ग्रंथाचें भाषांतर हिंदुस्थानांतल्या अनेक भाषांत झालें असतें.

केतकर यांची ही ज्ञानकोशाची कल्पना इतकी वीर्यशाली ठरली की, राजवाड्यांनीं ज्याप्रमाणें संशोधकांची एक कुळीच प्रस्थापित केली त्याप्रमाणें केतकर यांनीं कोशकारांची एक परंपराच उत्पन्न केली. डॉ. केतकर हे कोशयुगाचे खरेखरे प्रवर्तक होत. त्यांच्या हाताखालीं तयार झालेल्या लोकांनीं किंवा त्यांचें उदाहरण मनांत नीट उतरवून घेतलेल्या लोकांनीं नाना प्रकारचे कोश मराठी भाषेंत त्यांच्या मागोमाग तयार केले. चित्राव यांचा 'चरित्रकोश', दाते व कर्वे यांचा 'शब्दकोश', त्यांचाच 'वाक्प्रचारांचा व म्हणींचा कोश', होऊं घातलेला शास्त्रपरिभाषेचा कोश, लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा 'धर्मकोश', मुजुमदार यांचा 'व्यायाम-कोश', भिडे यांचा 'व्यवहार-कोश'—हे सारे कोश डॉ. केतकर यांनीं प्रस्थापित केलेल्या कोशयुगांतच जन्मास आलेले आहेत. आपण स्वतः एखादें नवें काम करावें आणि त्या कामाची एक स्वतंत्र कुळी प्रस्थापित करावी, हें अलौकिक यश राजवाडे व केतकर या दोघांनाच लाभलेलें आहे. केतकर यांनीं आपल्याला दिलेलें हें पहिलें धन होय.

केतकर यांनीं केलेली दुसरी कामगिरी म्हणजे हा प्रचंड उद्योग करण्याची नवीनच कल्पना त्यांनीं बसविली ही होय. लोकमान्यांना जेव्हां त्यांनीं आपली ही ज्ञानकोशाची कल्पना सांगितली तेव्हां त्यांनीं उत्तर केलें, " राजाश्रयाशिवाय येवढालीं कामें व्हावयाचीं नाहींत." परंतु महाराष्ट्रांतील लोकांच्या राजकारणप्रवणतेचा जसा अचुक अंदाज खुद्द टिळक यांनीं केलेला होता, तसाच येथील पांढरपेशा लोकांच्या ज्ञानलोभाचा अंदाज केतकर यांनीं तितक्याच अचुकपणानें केला होता. त्यांना हें कळून चुकलें होतें कीं, हे लोक विद्येचे हौशी आहेत. डॉ. केतकर यांनीं अमेरिकेंतून येतांना आणखी एक नवें ज्ञान आणलेलें होतें. तें हें कीं, विनिमयपद्धतीनें मोठमोठालीं कामें उरकतां येतात. ज्ञानाचा प्रसार केवळ उपकारबुद्धीनें व मोफत करावा ही कल्पना त्यांना मान्य नव्हती. लोकांना जर विद्या हवी तर त्यांनीं गांठींचा पैसा सोडावा असें त्यांना वाटे. महाराष्ट्रांतील लोकांच्या ज्ञानप्रवणतेचा कयास आणि ही विनिमयाची पद्धति हीं डॉ. केतकर यांनीं एक केलीं आणि जवळजवळ चार लाख रुपये उभे करून त्यांनीं हें अवाढव्य ग्रंथरचनेचें काम पार पाडलें. महाराष्ट्र भाषेनें अभिमान बाळगावा असें हें काम झालें. अशा प्रकारचा उद्योग जगांत इतरत्र कोठेंहि झालेला नाहीं, असें डॉ. केतकर यांनीं अभिमानानें म्हटलेलें आहे. आणि तो त्यांचा अभिमान सर्वथा यथार्थ आहे. महाराष्ट्र भाषेच्या द्वारां डॉ. केतकर यांनीं दुसरें जें फार मोठें धन लोकांना दिलें तें हें होय कीं, विनिमयाच्या पद्धतीनें ज्ञानाचा प्रसार करावा व करतां येतो.

केतकर यांची तिसरी कामगिरी म्हणजे त्यांनीं महाराष्ट्र समाजाचें तोंड समाजाच्या शास्त्रीय अभ्यासाकडे हटकून वळविलें. राजवाडे यांना शेवटीं शेवटीं या अभ्यासाची आवश्यकता वाटूं लागली होती. केतकर यांनीं अमेरिकेंत पीएच्. डी. च्या पदवीसाठीं 'सोशॉलॉजी' हाच विषय घेतलेला असल्यामुळें त्यांना आरंभापासूनच या विषयाचें महत्त्व पटलेलें होतें. त्यांनीं त्याचा अभ्यास केला आणि आपल्या वाङ्मयांत या अभ्यासानें प्राप्त

झालेली माहिती व समाजशास्त्राची तत्त्वें व प्रमेयें हीं वाङ्मयांत सर्वच पेरून टाकलीं. त्यांच्या आधीं शंभर वर्षेपर्यंत समाजसुधारणा चालूच होती. परंतु ती प्रतिपादणारे व करणारे जे कोणी होते त्यांच्या लिहिण्यांत व कृतींत शास्त्रीयतेचा अंश पुष्कळदां कमी असे. डॉ. केतकर यांनीं आमच्या समाजसुधारणेच्या कल्पनेला शास्त्रीयता प्राप्त करून देण्याचें नवेंच काम केलें व वाङ्मयांत गुंतलेल्या लेखकांचें व वाचकांचें तोंड, दोन्ही हातांनीं धरून तें अशा विचारपद्धतीकडे वळविलें. केतकर यांनीं आम्हांला दिलेलें हें तिसरें धन होय.

## सावरकर यांची भाषाशुद्धि

शेवटीं स्वातंत्र्यवीर सावरकर यांनीं दिलेलें ऋण मान्य करावयास हवें. मराठी भाषेच्या प्रपंचांत भाषाशुद्धीचा विचार त्यांनीं इतक्या तीव्रतेनें आणून सोडला कीं, तो आतां येथें कायमचें घर करून राहिला आहे, हें मान्य केलेंच पाहिजे. त्यांनीं काढलेले नवे नवे शब्द व शब्दसंहति यांना हंसणारे शेंकडों लोक आहेत. परंतु या हंसणाऱ्या लोकांच्या पायाखालची भूमि इतकी डळमळीत झाली आहे आणि कित्येक ठिकाणीं इतकी खचली आहे कीं, ज्या गोष्टीचा आपण उपहास करतों ती गोष्ट नकळतच आपल्या वाङ्मयप्रपंचांत आपण येऊं देत आहों हें त्यांचें त्यांनाहि कळत नाहीं. सावरकर यांच्या या कामगिरीचें आरंभस्थान शिवाजी महाराजांच्या संस्कृति-उत्थापनांतच सांपडतें. मध्यंतरीं हा ध्वज हातांतून गळालेला होता. सावरकर यांनीं तो पुन्हां हातीं घेतलेला आहे आणि या कामीं त्यांना जलदीनें यश मिळत चाललेलें आहे. माधवराव पटवर्धन हे ऊर्दूचे पट्टीचे अभिमानी; पण ते संस्कृतनिष्ठ मराठीचे अभिमानी बनावे हा सावरकरांचा फारच मोठा विजय आहे. स्वातंत्र्यवीर सावरकर यांनीं आधुनिक काळांत मराठी भाषेच्या द्वारां महाराष्ट्रीयांना आणि परप्रांतीयांना दिलेलें हें भाषाशुद्धीचें धन खरोखर अलौकिक आहे.

याप्रमाणें या विसाव्या शतकाच्या आरंभापासून आतांपर्यंत महाराष्ट्र भाषेंत जे नवे विचार उत्पन्न झाले असें मला वाटतें, त्यांची गणती मी या ठिकाणीं केली आहे. आणखी कांहीं बारीकसारीक विचार असतीलहि. शिवाय मी आरंभी सांगितलेंच आहे कीं, माझ्या वाचनाचा पल्ला रुचिभिन्नत्वामुळें बेताचा असल्यानें दुसऱ्या कोणी लेखकांनीं आणखीहि कांहीं धन महाराष्ट्रांतील लोकांना व पर्यायानें हिंदुस्थानांतील लोकांना दिलेलें असूनहि तें माझ्या या गणतींत आलेलें नसेल. ज्यांना साधेल त्यांनीं त्या त्या धनाची बेरीज यांत घालून हा विषय पुरा करावा.



दामोदर विश्वनाथ गोखले, सहसंपादक ' केसरी '

# वृत्तपत्रांचें राष्ट्रीय जीवनांतील स्थान

वृत्तपत्र-व्यवसाय हा पैसे मिळविण्याचा एक धंदा कीं, लोक-शिक्षणाचें पवित्र नि सामर्थ्यशाली साधन या प्रश्नाचें सुस्पष्ट उत्तर येथें दिलेलें आहे. राष्ट्रीय सामर्थ्य संवर्धन करणारें सर्व लिखाण ग्राह्य आणि तें खच्ची करणारें सर्व त्याज्य, असा निष्कर्ष या विवेचनांतून काढलेला आहे.

सध्यांच्या लोकशाहीच्या नव्या युगांत, वृत्तपत्रें ही एक एवढी प्रचंड, सर्वंकष व सामर्थ्यशाली शक्ति अवतरली आहे कीं, तिच्या सिंहासनापुढें राजे व रंक, अट्टल मुत्सद्दी व सत्त्वप्रधान साधुपुरुष आणि धनमत्त श्रीमान व कार्यप्रवण दरिद्री सर्वजणच विनम्र भावानें मुजरा करतात. अमेरिका, इंग्लंड अगर युरोपांतील इतर देश यांच्या सामाजिक अगर राजकीय जीवनाची बारकाईनें तपासणी केली तर त्या लोकशाहीप्रधान देशांत लोकमताला वळण लावून अगर तें संघटित करून किंवा त्याच्या प्रक्षोभाच्या ज्वाला पेटवून देशाची सर्वांगिण प्रगति करण्याचें पवित्र काम तेथील वृत्तपत्रें मोठ्या प्रमाणांत करीत आहेत हें ध्यानीं आल्याशिवाय राहात नाहीं. धार्मिक अंधश्रद्धेवर

परिणामकारक घाव घालून ती भद्धा नष्ट केली वृत्तपत्रांनीं; सामाजिक जुलूम-जबरदस्तीला जबरदस्त पायबंद घातला वृत्तपत्रांनीं; आणि राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय बाबतींत त्या त्या देशांचा स्वाभिमान रक्षण केला वृत्तपत्रांनीं ! म्हणूनच इंग्लंडमध्यें राजा, 'हाऊस ऑफ कॉमन्स' व 'हाऊस ऑफ लॉर्डस्' यांच्याबरोबर सत्तेचें चौथें स्थान तेथील वृत्तपत्रांना दिलें जातें.

व्हिक्टोरिया राणी व ग्लॅडस्टन यांचा एकदां खटका उडाला. त्यां वेळीं राणीसाहेब म्हणाल्या, "मि. ग्लॅडस्टन, तुम्ही कोणाशीं बोलतां हें माहीत आहे ना? ग्रेटब्रिटनची राणी व हिंदुस्थानची बादशाहीण म्हणून राजसत्ता हातीं खेळविणाऱ्या व्हिक्टोरिया राणीशीं तुम्ही बोलतां आहांत." ग्लॅडस्टननेंहि अभिमानपूर्वक ताडदिशीं उत्तर दिलें कीं, "होय, आपणहि लक्षांत ठेवा कीं, आपली राजसत्ता ज्या जनमताच्या सामर्थ्याच्या आधारावर टिकून आहे, त्या जनतेच्या मुख्य प्रतिनिधीशीं आपण बोलत आहां." या जनतेच्या सामर्थ्यांचें प्रभावी प्रतीक वृत्तपत्रें हींच होत. १९०४ मध्यें 'Review of Reviews'चे सुविख्यात संपादक मि. डब्ल्यू टी. स्टेट यांनीं सपादकांसंबंधीं लिहिलें होतें कीं, "सरकार–कोण सरकार? राजे सातवे एडवर्ड कीं राजांचें दमन करणारी लोकसत्ता? लोकसत्ता हेंच खरें सरकार व वृत्तपत्रांचे संपादक हे त्या सरकारचे दरबारी आहेत." अमेरिकेंतहि अशा तऱ्हेनें वृत्तपत्रांचें महत्त्वाचें स्थान सुचविणाऱ्या अनेक गोष्टी घडल्या आहेत. गेल्या महायुद्धाच्या ऐन भरांत प्रे. रूझवेल्ट यांनाहि वृत्तपत्रांच्या सामर्थ्यापुढें वाकावें लागलें. झोटिंगशाही राष्ट्रांनीं वृत्तपत्रांना आपल्या दावणींत बांधण्याचा अगर तीं नष्ट करण्याचा थोडाफार यशस्वी प्रयत्न केला. पण शेवटीं त्यांचीच राखरांगोळी झाली. महायुद्धांतील या अग्निदिव्यांतून सुरक्षित निघालेली व त्या काळच्या अनुभवाची पुनरावृत्ति होऊं न देण्याचा निश्चय केलेली वृत्तपत्र-शक्ति भविष्यंकाळांत पूर्वींपेक्षांहि प्रभावी ठरणार आहे हें सांगावयासच नको.

इंग्लंड, अमेरिका वगैरे स्वतंत्र देशांतील लोकशाहीचें वातावरण, परकीय इंग्रजांच्या गुलामगिरीच्या शृंखलांनीं जखडलेल्या हिंदुस्थानांत कसें दिसणार? तथापि या शृंखला तडातड तोडून टाकून स्वातंत्र्य-संपादनाचें सामर्थ्य जनतेंत यावें म्हणून जे प्रयत्न झाले व आज होत आहेत त्यांत हिंदी वृत्तपत्रांचें स्थान खास अग्रभागीं आहे. हें स्थानहि त्यांना मिळालें त्याचें बीज त्यांच्या निर्लोभ सेवेंत, निर्भय त्यागांत आणि निरलस प्रयत्न-सातत्यांत आहे. गेल्या पंचाहत्तर वर्षांत हिंदी वृत्तपत्रकारांनीं स्वराज्याच्या लढ्यांत जी महनीय कामगिरी केली तिचा इतिहास मोठा बोधप्रद आहे. हा इतिहास त्रुटित स्वरूपांत अनेक ठिकाणीं नमूद केला गेला आहे; पण वृत्तपत्रांनीं केलेल्या लहानमोठ्या पराक्रमांचें यथातथ्य चित्रण करणारा ग्रंथच त्याचें सामुदायिक दर्शन देईल. इंग्रज नोकरशाहीच्या उद्दाम अधिकाऱ्यांच्या जुलमी लीला चव्हाट्यावर आणून त्रस्त जनतेला मानसिक समाधान देण्याचें काम गेल्या शतकाच्या शेवटच्या दोन दशकांत अनेक वृत्तपत्रांनीं केलें. तें ज्या परिस्थितींत केलें तिचें सम्यक् स्वरूप आपण दृष्टीपुढें आणलें तर त्या वृत्तपत्रांबद्दल व त्यांच्या कामगिरीबद्दल कोणालाहि अभिमानच वाटेल. बंगालमधील बंगाली पत्रें व विशेषत: 'अमृतबझार पत्रिका' यांच्या संपादकांनीं काश्मीर संस्थानाबाबतची कुलंगडीं व कारस्थानें बाहेर आणून इंग्रजी साम्राज्यवादी मुत्सद्यांचा काश्मीर गिळंकृत करण्याचा कपटव्यूह ढांसळून टाकल्याचें प्रसिद्ध आहे. अशीं एक दोन, अनेक उदाहरणें देतां येईल; पण तो इतिहास येथें देण्याचें कारण नाहीं.

### एक प्रभावी शस्त्र

परतंत्र हिंदुस्थानाला स्वातंत्र्याच्या ध्येयाचें ध्रुवदर्शन देण्याची जी उज्ज्वल कामगिरी हिंदी वृत्तपत्रकारांनीं केली ती मात्र थोडक्यांत येथें नमूद करणें प्राप्त आहे. बंगाल व पंजाब यांच्या बरोबरीनें किंबहुना कांहीं बाबतींत अधिक निष्ठेनें, अधिक त्यागानें व अधिक सातत्यानें आपल्या महाराष्ट्रानेंहि ही

कामगिरी केली आहे. या दृष्टीनें महाराष्ट्राची परंपरा अभिमानास्पद आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं समाजाला व जनतेला सर्वांगिण प्रगतीच्या मार्गावर हळूहळू पण नेटानें आणि निर्भयतेनें नेण्याचें कार्य आरंभिलें. लो. टिळक वृत्तपत्राला एक प्रभावी शस्त्र समजत असत. राष्ट्राला गुलामगिरीची चीड आणि स्वातंत्र्याची आवड उत्पन्न करण्याचें एकमेव प्रभावी साधन म्हणजे वृत्तपत्र होय, असें ते समजत व त्या एकाच महनीय कार्याकरतां त्यांनीं आपल्या पत्राचा प्रामुख्यानें उपयोग केला. पारतंत्र्य म्हणजे नरक, स्वातंत्र्य म्हणजे स्वर्ग; परराज्य म्हणजे विष; स्वराज्य म्हणजे सुधा; स्वदेशांत गुलाम राहणें म्हणजे शाप आणि स्वतंत्र सत्ताधारी होणें म्हणजे जीवितसाफल्य ही त्यांची शिकवण होती. महाराष्ट्राच्या तोंडीं त्यांनीं वरील भाषा नित्यपाठाप्रमाणें बसविली आणि त्यानंतर उदाहरणांनीं ती कृतींत आणविली. हें सर्व महत्कार्य त्यांनीं त्यांच्या वृत्तपत्रांच्या साधनांनीं केलें. लोकमान्यांनीं अनेक व्याख्यानें यासंबंधीं दिलीं, पण त्यांनीं 'केसरी'च्या द्वारां स्वातंत्र्याची व स्वराज्याची दिलेली संथा जनतेच्या अंतःकरणाला जाऊन भिडली वृत्तपत्रांचें सामर्थ्य केवढें आहे याचें यापेक्षां दुसरें प्रत्यंतर काय पाहिजे ! हिंदुस्थानांत इतरत्रहि अशीच कामगिरी वृत्तपत्रांनीं केलेली आहे.

वृत्तपत्र हें एक प्रभावी शस्त्र किंवा अस्त्र असलें तरी त्याची जपणूक मोठ्या तपश्चर्येनें करावी लागते हेंहि या ठिकाणीं सांगितलें पाहिजे. हिंदुस्थानांतील स्वराज्याचा किंवा स्वातंत्र्याचा लढा आहे इंग्लंडशीं आणि इंग्रज साम्राज्यवादी हे कपटपटू आणि मुरब्बी मुत्सद्दी म्हणून नाणावलेले आहेत. त्यांनीं वृत्तपत्रांविरुद्ध एक कायद्याचें शस्त्र आपल्या बाजूनें परजून भात्यांत ठेविलें आहे. हें कायद्याचें कलम म्हणजे राजद्रोहाचा गुन्हा निर्माण करणारें व त्याला शिक्षा सांगणारें फौजदारी कायद्याचें १२४ कलम हें होय.

लोकमान्य टिळकांवर राजद्रोहाचा खटला प्रथम भरला गेला त्या वेळीं स्वराज्याची चळवळ अगदीं बाल्यावस्थेंत होती, लोकमतहि संघटित नव्हतें

आणि कायद्याची मर्यादा ओलांडून जाणें हें एक दिव्य समजलें जात असे. 'केसरी'तील लेखाबद्दल झालेल्या खटल्यांत टिळकांनीं माफी मागावी असा सल्ला कांहींनीं दिला होता. त्यावर टिळकांनीं दिलेलें कणखर उत्तर अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें व मार्गदर्शक आहे आणि त्यांतच वृत्तपत्रकारांच्या ध्येयवादित्वाचें व त्याला अनुरूप असाव्या लागणाऱ्या आचाराचें रहस्य सांठलेलें आहे. वरील सल्ल्याला उत्तर म्हणून त्यांनीं लिहिलें होतें कीं, "जनतेमध्यें मला जें स्थान आहे तें केवळ माझ्या शीलावर अवलंबून आहे. सरकारनें माझ्या लेखाबद्दल खटला भरला म्हणून मी जर कच खाल्ली तर मग मी महाराष्ट्रांत राहिलों काय किंवा अंदमानांत राहिलों काय सारखेंच! शिवाय पत्रकाराचा हा उद्योग करणाऱ्या लोकांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आपण सर्व जनतेचे सेवक आहों. आणीबाणीच्या वेळीं जर आपण धैर्य धरलें नाहीं, तर त्यांची निराशा होईल." लोकमान्यांच्या या उद्गारांत वृत्तपत्रांचें ध्येय व संपादकांचा आचारधर्म यांची मीमांसा उत्तम रीतीनें साररूपानें केलेली नाहीं काय? या तपश्चर्येचें परिणत स्वरूप म्हणजे महाराष्ट्रांत व इतरत्र राजद्रोहाचें कलम वृत्तपत्रांनीं पचवलें व आज राजद्रोही ठरलेल्या लेखाबद्दल तुरुंगाची वाट धरण्यांत कोणालाहि कमीपणा वाटत नाहीं. तुरुंगाची भीति गेली हें कांहीं लहानसहान कार्य नव्हे.

हिंदुस्थानांतील किंवा महाराष्ट्रांतील वृत्तपत्रें आणि इंग्लंड, अमेरिका येथील वृत्तपत्रें यांच्या ध्येयवादित्वांत व कार्यांत मूलतःच मोठा फरक आहे. त्यामुळें तिकडील वृत्तपत्रांचें व्यावहारिक तत्त्वज्ञान आणि धंदेवाईक परिभाषा यांचें फारसें अवडंबर आपल्याइकडे माजविण्यांत तूर्त तरी अर्थ नाहीं. हिंदुस्थान परतंत्र आहे तोंपर्यंत वृत्तपत्रांची सर्व शक्ति स्वातंत्र्याच्या ध्येयसिद्धीसाठीं एकवटली पाहिजे व ती त्याकरतांच खर्च झाली पाहिजे असें वाटतें. वृत्तपत्रें हा एक धंदा आहे कीं त्यांचें कार्य म्हणजे एक पवित्र ध्येयवादित्व आहे, या प्रश्नाचें उत्तर हिंदुस्थानाच्या राजकीय परिस्थितीकडे दृष्टि ठेऊनच दिलें पाहिजे. हिंदुस्थानांतील अगर

महाराष्ट्रांतील पत्रकारांनीं तरी स्वातंत्र्य व तें संपादण्याकरतां लागणारी साधनसंपत्ती आणि लोकमताचें संघटन या कामींच आपली बुद्धि, आपलें भाषाकौशल्य आणि वाद्चातुर्य खर्चीं घालावें हेंच इष्ट होय. या दृष्टीनें केवढेतरी कामाचे डोंगर आपल्याला उठवावयाचे आहेत. अज्ञान व दारिद्र्य यांच्या पंकांत सामान्य जनता रुतून बसली आहे. सहज मरतां येत नाहीं म्हणूनच शेतकरी जगतो आहे. महाराष्ट्राला तर दुहीचा शाप असल्यानें आणि वैयक्तिक प्रतिष्ठेच्या खोट्या भावनेनें येथील लोक पछाडले असल्यामुळें परस्पर नाशांतच त्यांचें सर्व सामर्थ्य व्यर्थ खर्चीं पडत आहे. अशा एक ना दोन अनेक आपत्तींशीं झगडून स्वातंत्र्याचा मार्ग स्वच्छ करावयाचा आहे. लोकशिक्षणाच्या कार्याचें यज्ञकंकण हातीं बांधलेल्या वृत्तपत्रांनीं हें काम करावयाचें नाहीं, तर कोणी करावयाचें ? वृत्तपत्रांच्या सामर्थ्याची खरी परीक्षा यांतच होत आहे व होणारहि आहे. म्हणून ध्येयवादित्व कीं धंदा असा प्रश्नच उपस्थित होऊं शकत नाहीं.

हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्याच्या लढ्यांत स्वातंत्र्यवादी पुढाऱ्यांनीं वृत्तपत्रांच्या प्रखर शस्त्राचा उपयोग मोठ्या कौशल्यानें केला म्हणूनच हिंदुस्थानांत आज स्वातंत्र्यवादी विचारांची व स्वातंत्र्यवादी उद्योगाची स्पृहणीय प्रगति झालेली दिसते. हिंदुस्थानांत राजकारणाला प्रमाणाबाहेर महत्त्व दिलें जातें व वैयक्तिक जीवनाच्या अगर राष्ट्रीय प्रपंचाच्या इतर आवश्यक बाबींकडे द्यावें तेवढें लक्ष दिलें जात नाहीं असा आक्षेप परकीय टीकाकार आणि कांहीं स्वकीय टीकाकारहि करतात. ऐतिहासिक व भौगोलिक ज्ञान देऊन जनतेला सुबुद्ध करणें, ज्ञानविज्ञानाचें शिक्षण देऊन त्या त्या क्षेत्रांत इतरांच्या बरोबरीचें स्थान आपल्या लोकांना प्राप्त करून देणें किंवा व्यापार-उद्योगधंदे वगैरेंचें तंत्र समजावून देऊन त्यांत प्रगति करणें हीं कार्यें सामान्य किंमतीचीं आहेत असें कोण म्हणेल ? त्याचप्रमाणें वैयक्तिक व सामाजिक जीवनाला नवे नवे संस्कार ललित व शास्त्रीय वाङ्मयाच्या द्वारां देऊन व्यक्ति व समाज यांच्या

जीवनाची उंची व खोली वाढविणें हीं कामें निःसंशय महत्त्वाचीं व आदरणीय आहेत. तीं करणाऱ्या महाभागांचे उपकार राष्ट्रावर फार मोठे आहेत. प्रश्न एवढाच कीं, या सगळ्या कामांचे प्रवाह स्वातंत्र्य-संग्रामाच्या नदीला मिळून तिची धारा प्रचंड, सामर्थ्यवान व अप्रतिहत करण्याची दृष्टि त्यांत असावी म्हणजे झालें. या निरनिराळ्या कार्यक्षेत्रांची विभागणी होऊं देतां उपयोगी नाहीं, इतकाच तात्पर्यार्थ आहे. स्वातंत्र्य हेंच खरें राष्ट्रीय जीवन, आपल्या देशाच्या बाबतींत असल्यामुळें त्याची छाप सर्व उद्योगधंद्यांवर पाहिजे हे निर्विवाद होय.

## आदर्श पत्रकार कोण ?

आदर्श पत्र कसें चालवावें अगर आदर्श पत्रकार कोण, असा प्रश्न विचारला जातो. त्याचें उत्तर वरील प्रमेयांत सांपडतें. हिंदुस्थानाच्या सध्यांच्या परतंत्र स्थितींत जें पत्र किंवा जो पत्रकार अगदीं धार्मिक निष्ठेनें राजकीय गुलामगिरीचे पाश तोडून टाकण्याचें संघटित मानसिक सामर्थ्य लोकांत उत्पन्न व्हावें या बुद्धीनें प्रेरित होऊन आपलें पत्र चालवितो व आपलें आचरण ठेवितो तो आदर्श पत्रकार म्हणून या काळांत तरी ओळखला जाईल. याचा अर्थ असा नव्हे कीं राजकारणाची जहाल व ज्वलंत भाषा वापरणाराच आदर्श समजावा. आपापल्या बुद्धिप्रमाणें आपापल्या क्षेत्रांत काम करतांना राष्ट्रनौका कोणत्या बंदराला न्यावयाची आहे याचें सूत्र दृष्टीपुढें असलें पाहिजे हा या विचारांतील गाभा आहे. वृक्षांचीं मुळें भूमींत स्थिर असलीं तरी वृक्षांच्या वाढीची धांव आकाशाकडे असते. नद्या कोठूनहि वाहात असल्या तरी त्यांचे प्रवाह समुद्राकडेच जातात. परतंत्र देशांतहि सर्व उद्योगांचें, चळवळींचें किंबहुना जीविताचें ध्येय स्वातंत्र्यच असलें पाहिजे. याच्या उलट स्वार्थाकरतां, वैयक्तिक वा जातीय महत्त्वाकांक्षा सिद्ध करण्याकरतां किंवा सामर्थ्यहीनतेच्या न्यूनगंडामुळें उत्पन्न झालेल्या अकर्तृत्वाच्या समर्थनाकरतां स्वातंत्र्याच्या

प्रगतीमध्यें अडथळा निर्माण होईल असे निष्कर्ष निघण्यासारखी भाषा जे काढतात ते पत्रकार मोठे प्रामाणिक असले तरी ते आदर्श होऊं शकणार नाहींत. हा सिद्धांत अर्थात् परिस्थितिसापेक्ष आहे; पण तो अटळ आहे हें मात्र खरें !

देशप्रेम, राष्ट्रीय वृत्ति आणि स्वातंत्र्याचें ध्येयवादित्व या त्रिपुटीच्या निकषावर व्यक्ति अगर समाज आपलें प्रत्येक वर्तन व उद्योग परीक्षून पाहूं लागला तर कोणालाच खालीं मान घालण्याचा प्रसंग येणार नाहीं. विचार, उच्चार व आचार हे सहाजिकच शुद्ध व जोरकस राहातील. परकीय राष्ट्रांतील चिकित्सक व विचक्षण लोक आपल्या वृत्तपत्रांवरून व त्यांत येणाऱ्या विचारांवरून आपल्या राष्ट्राच्या शीलाची परीक्षा करीत आहेत अशी जाणीव झाली व त्या बरोबरच राष्ट्राच्या अब्रूची आपल्याला खरोखरीच काळजी असली तर कुशब्द, गैरवागणूक अगर गुलामगिरीला पोषक होणारी विचारसरणी कोण प्रसृत करील ? वृत्तपत्रें ही समाजाच्या परिस्थितीचा आरसा आहे असें म्हणतात ना ? मग या वृत्तपत्रांतून आपल्या समाजाचें अगर वैयक्तिक आचरणाचें हिडीस चित्र दिसलें तर त्यांत राष्ट्राचा कमीपणा निश्चित आहे. स्वातंत्र्य-संपादनाची महत्त्वाकांक्षा असणारा हिंदुस्थान आपल्या वृत्तपत्रांतील लिखाणानें आपली स्वातंत्र्याची नालायकीच सिद्ध करूं लागला व त्यामुळें इतर राष्ट्रांनीं त्याला नालायक ठरविलें तर कुरकुरण्यांत अर्थ काय ? वृत्तपत्रांतून वाद कोणते करावे, कशा तऱ्हेचें लिखाण असावें ? चैन, स्वैराचार व मर्यादारहित सुखलोलुपता याचा पुरस्कार करावा कीं नाहीं वगैरे प्रश्नांचीं उत्तरें वर दिलेला निकष लावूनच ठरविलीं पाहिजेत. राष्ट्रीय सामर्थ्य संवर्धन करणारें सर्व लिखाण ग्राह्य आणि तें खच्ची करणारें सर्व त्याज्य असाच त्यांतून निष्कर्ष निघतो.

महाराष्ट्र वादप्रेमी व वादपटु आहे. आणि आपली बाजू मोठ्या हिरीरीनें व आवेशानें मांडण्यांत मराठी वृत्तपत्रकार श्रेष्ठ प्रतीचें बुद्धिकौशल्य दाखवितात हेंहि खरें आहे. लोकशिक्षण परिणामकारक करण्याकरतां आणि

आपापल्या मतप्रणालीची धार तिखट करण्याकरतां या वादांचा उपयोगि होतो. वर उल्लेखिलेल्या सामर्थ्य-संवर्धनाचा आणि देशप्रेम, राष्ट्रीय वृत्ति आणि स्वातंत्र्याकांक्षा यांच्या पुरस्काराचा निकष या वादाला लावून ते वाद इष्ट ठरत असले तर ते स्वागतार्हच आहेत. मात्र या वादांत जेव्हां तोल सुटतो आणि तत्त्वावरून घसरगुंडी होऊन वृत्तपत्रें वैयक्तिक टीका करूं लागतात त्या वेळीं हे वाद निंद्य व घातकच समजले पाहिजेत. महाराष्ट्रांत अशा खालच्या कोटीचे वाद कितीतरी झाले व त्यामुळेंच सामान्य जनतेला त्यांचा वीटहि आला. सार्वजनिक काम करणाऱ्यानें व्यक्तिगत निंदेची पर्वा कधींहि करूं नये. अनेक आपत्तींशीं, सामाजिक वैषम्याशीं आणि राजकीय संकटांशीं झुंज देण्याचें व्रत घेतलेल्या सार्वजनिक कार्यकर्त्यांनीं निंदेला व प्रहाराला केव्हांहि डरूं नये. चार टोले घ्यावे व द्यावे हेंच सामर्थ्याचें लक्षण असतें. प्रश्न एवढाच असतो कीं, वर उल्लेखिलेल्या निकषावर घांसून पाहिलें तर या विवादांतून राष्ट्राच्या सामर्थ्याची वाढ होते कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे. व्यक्ति ही राष्ट्राचा घटक आहे, हें सूत्र लक्षांत ठेवून महाराष्ट्रांतील वैयक्तिक वाद या दृष्टीनें कितपत योग्य ठरतील याबद्दल मोठी शंका वाटते.

देशप्रेम, राष्ट्रीय वृत्ति आणि स्वातंत्र्याच्या आकांक्षा या पवित्र भावनांनीं भारलेल्या वृत्तपत्रांना व पत्रकारांना व्यक्तिनिंदेच्या गटारांत पदक्षेप करण्याची खरोखरच जरूर आहे, असें वाटत नाहीं. या तिरस्करणीय उद्योगानें त्यांची निष्ठा डागळली जाते आणि प्रामाणिकपणा संशयग्रस्त होतो. अनेक उदाहरणें अशीं दिसतात कीं स्वतःच्या अंगीं कसलेंहि शील अगर कृतज्ञतेसारखे साधे माणुसकीचे गुणहि नसतांना ज्यांचा व त्यांचा काडीइतकाहि संबंध नाहीं अशा लोकांचा व कार्यकर्त्यांचा दंभस्फोट करण्याच्या पांघरुणाखालीं कांहीं लब्धप्रतिष्ठित फुकट फौजदारी करून वृत्तपत्रांतून सूडबुद्धीनें वैयक्तिक निंदेची हौस भागवून घेतात. अशा व्यक्ति व अशीं वृत्तपत्रें निखालस निंदनीय होत. यापेक्षां अधिक तीव्र शब्दांनीं त्यांची संभावना करणें युक्त असलें तरी आवश्यक नाहीं. मोठीं

माणसें व महनीय कार्यें यांची निंदा करण्यांत हे लोक आपल्या आकुंचित मनाचें व पौरुषहीनतेचें प्रदर्शन करीत असतात इतकेंच. प्रत्युत्तरें देण्यानें त्यांना फुकट प्रसिद्धीची पायरी चढल्याचें समाधान मिळतें व तें मिळूं देऊं नये हेंच योग्य. वाद जरूर व्हावा. त्यांत नाइलाज झाला तर चार टोले द्यावे व घ्यावे. त्यांत पारुष आहे, पराक्रम आहे; त्यांत राष्ट्रहित आहे. पण वर वर्णिलेलें वैयक्तिक हेव्यादाव्याचें, कोत्या मनाचें, राष्ट्रीय प्रगतीशीं संबंध नसलेलें निंदापुराण त्याज्य होय. महाराष्ट्राला दुहीचा शाप आहे असें म्हणतात, त्याचें हिडीस प्रदर्शन या वादांत होतें.

## लोकशिक्षणाचें प्रचड कार्य

हिंदुस्थानांत स्वातंत्र्य व लोकशाही यांची संस्थापना करण्याचें ध्येय दृष्टीपुढें ठेवून त्याच्या सिद्धीसाठीं वृत्तपत्रांनीं आपली तपस्या चालू ठेवावी. जितकें चातुर्य, जितकें बुद्धिकौशल्य व जितकी विद्वत्ता अंगीं असेल तितकी सर्वच्या सर्व या कार्यासाठीं खर्च झाली पाहिजे. जनतेचें, जनतेकरतां व जनतेनें चालविलेलें राज्य असें वर्णन लोकशाहीचें केलें जातें. सहाजिकच या जनतेच्या सर्वांगिण शिक्षणाचें व संघटनेचें कार्य वृत्तपत्रांनीं करणें हें युक्त होय. राष्ट्रीय जीवनाच्या सर्व शाखांत आपण मागें आहोंत, या दृष्टीनें अमर्याद दिसणाऱ्या समुद्राचें उल्लंघन आपणास करावयाचें आहे. अर्भकावस्थेपासून तों प्रौढ स्थितिपर्यंतच्या प्रत्येक अवस्थेंत ज्ञानाचीं नवीं नवीं दालनें उघडीं करून जनतेचें सामर्थ्य वाढविण्याचें केवढें तरी प्रचंड कार्य आपल्यापुढें आहे. आनंदाची गोष्ट ही कीं, हीं सर्व कार्यें आपापल्या मगदुराप्रमाणें निरनिराळे कार्यकर्ते व पत्रकार आज करीत आहेत. सर्व प्रकारच्या सर्व तऱ्हेच्या वाङ्मयाची वाढ होत असून लोकशिक्षणाचें पवित्र कार्य झपाट्यानें चालू आहे.

मात्र आपली गरज किती मोठी आहे हें पाहिलें म्हणजे यापेक्षां अधिक

वेगानें आणि अधिक प्रमाणांत हें कार्य व्हावयास पाहिजे असें लक्षांत येईल. निरनिराळ्या वृत्तपत्रांनीं आपल्या कार्याचें क्षेत्र आंखून घेऊन आपलें नियोजित काम साक्षेपानें केलें तर किती तरी मार्ग आक्रमण करतां येण्यासारखा आहे! वैयक्तिक भांडणें व ज्यांत फलप्राप्ति कांहीं नाहीं असे वाद यांचा जनतेवर विपरीत परिणाम होतो हें लक्षांत घेणें फारसें अवघड नाहीं.

हिंदुस्थानांत सामान्य जनता वृत्तपत्रांकडे कोणत्या दृष्टीनें पाहाते याचा विचार केला, ठिकठिकाणीं चार सामान्य माणसें जमतात तेथें चाललेल्या बोलण्याचालण्याचा कानोसा घेतला, तर वृत्तपत्रांत प्रसिद्ध झालेल्या बातम्यांना किती महत्त्व दिलें जातें हें लक्षांत येतें. राष्ट्रांत होणाऱ्या अनेक सामाजिक व राजकीय घटनांकडे जनतेचें लक्ष त्याहिपेक्षां अधिक असतें हेंहि ध्यानांत आल्याशिवाय राहात नाहीं. म्हणून या बाबतींत वृत्तपत्रांनीं आपली थोर परंपरा आणि आपलें ध्येयवादी पावित्र्य कलंकित होऊं न देण्याकरतां अत्यंत काळजीनें व कटाक्षानें झटलें पाहिजे. बातम्यांची लज्जत आकर्षक खरी पण ती अल्पायुषी असते. ज्यांचे संस्कार जनमनावर होतात, ज्या गोष्टींची स्मृति सहजासहजीं पुसली जात नाहीं आणि ज्यांचा जीवनावर प्रत्यक्ष परिणाम होतो अशाच विचारांची, घटनांची व पराक्रमांची महती लोकांना वाटते. वृत्तपत्रांसंबंधीं जो आदर लोकांना वाटतो तो, नीट बारकाईनें पाहिलें तर, त्यांच्या बातमी देण्याच्या कौशल्यापेक्षां राष्ट्राच्या लढ्यांत त्यांनीं केलेल्या कार्याबद्दल वाटतो. हें थोडें अंतर्मुख दृष्टि करून पाहिल्यास सहज कळून येण्यासारखें आहे. आपापल्या आवडत्या वृत्तपत्राबद्दल लोक अभिमान बाळगतात, त्याला आश्रय देतात आणि त्याची काळजी वाहातात हें पाहून कोणाहि पत्रकाराला अभिमानच वाटावा. अर्थात् या अभिमानाबरोबर आपल्या अंगावर आपण केवढी जबाबदारी घेतों हेंहि त्यांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. आपल्यावर टाकलेल्या विश्वासाला डाग लागेल असें यत्किंचितहि अपकृत्य आपल्या हातून होतां उपयोगी नाहीं हें ओघानेंच येतें!

### नवीन उद्भवणारे प्रश्न

छापील शब्दाला विशिष्ट प्रकारचें महत्त्व जनतेकडून दिलें जातें ही गोष्ट नित्य अनुभवाची आहे. म्हणूनच वृत्तपत्रांनीं मोठ्या कसोशीनें सत्यपालन केलें पाहिजे. युरोप-अमेरिकेच्यां मानानें आपल्याकडील वृत्तपत्रांची प्रगति झालेली नाहीं, किंबहुना वृत्तपत्रांच्या बहुविध अंगोपांगांची सजावट करण्याचें शास्त्र व कला आपल्याला पूर्णांशानें अवगतहि झालेली नाहीं. हल्लीं त्या शास्त्राची जी झपाट्यानें वाढ होत आहे ती आत्मसात् झाल्यानंतर अनेक नवे प्रश्न उद्भवणारे आहेत. मतांत कोणतेहि भेद असले तरी वृत्ताच्या बाबतींत कसल्याहि तऱ्हेचा पक्षपात होऊं नये असा कटाक्ष तिकडील वृत्तपत्रांत ठेविला जातो. इंग्लंडमधील ' मँचेस्टर गार्डियन 'चे मि. स्कॉट यांचा एक दण्डक प्रसिद्ध आहे. त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे कीं, " टीका किंवा मतप्रचार कितीहि स्वतंत्र असला तरी वृत्त हें पूर्ण सत्याला धरून असलें पाहिजे. त्यांत विचारांचा अगर मतभेदांचा रंग मिसळला जातां कामा नये. तसें करणें हे नैतिक दृष्ट्या चूक आहे."

इतक्या कडक व खणखणीत शब्दांत त्यांनीं घालून दिलेला दण्डक आपल्याकडे काटेकोरपणानें पाळला जाणें आवश्यक आहे. कारण वर म्हटल्याप्रमाणें वृत्तपत्रांत प्रसिद्ध झालेल्या बातम्यांवर लोक विश्वास ठेवतात व तें त्यांचें करणें रास्तहि आहे. या बाबतींत आणखीहि एक विचार आहे. सत्य हें सुद्धां अनेक वेळां सापेक्ष असतें. एकच गोष्ट चार माणसांनीं पाहिली तरी ती त्याच चौघांनीं निरनिराळ्या तऱ्हेनें मांडलेली पाहिली म्हणजे आश्चर्य वाटतें. कोणीहि सत्यापलाप बुध्द्या करीत नसतो; पण प्रत्येकाची मांडणी निराळी असल्यानें थोडीबहुत तरी नवी छटा त्यांत चढलेली दिसल्याशिवाय राहात नाहीं. विचक्षण व कर्तव्यदक्ष पत्रकारानें या बाबतींत थोडी सावधानता ठेवली म्हणजे अडचण येत नाहीं. नुकतेंच, सिंधमधील एका पत्रकारानें आपले

प्रतिस्पर्धी पुढारी हे त्रिमंत्र्यांच्या भेटीसाठीं दिल्लीस विमानांतून जात असतांना विमान कोसळून ठार झाले अशी बातमी दिली होती. हा सत्यापलापाचा कळस होय. हे पत्रकार पत्रकाराच्या व्यवसायास दूषण आहेत !

'लंडन टाईम्स' चे सुप्रसिद्ध संपादक मि. विकहॅम स्टीड यांनी नमुनेदार वृत्तपत्र कसें असावें याचें मोठें मार्मिक वर्णन एकदां केले होतें. पत्रकार हे जनतेचे शिक्षक व सेवक असल्यानें त्यांच्यावरील जबाबदारी मोठी आहे असें ते समजतात. त्यांनीं याबाबत लिहिलें आहे कीं, "निर्भयता हा वृत्तपत्राचा मोठा गुण असल्यामुळें पत्रकार हा पूर्ण निर्भय वृत्तीचा असला पाहिजे. संपादकीय पहिल्या स्तंभापासून शेवटपर्यंत त्याची लढाऊ वृत्ति दिसली पाहिजे आणि कोणाच्याहि अगर कसल्याहि भीडभाडेला किंवा वशिल्याला बळी न पडतां त्यानें आपलीं मतें बिनदिक्कत मांडलीं पाहिजेत. प्रतिपक्षाच्या अगर इतर कोणाच्याहि रागाची व हेटाळणीची त्यानें क्षिती बाळगतां उपयोगी नाहीं. प्रसिद्धीयोग्य वार्ता व वृत्तें ठळकपणें व निःपक्षपातानें प्रसिद्धिलीं पाहिजेत व तसें करतांना आपलें पक्षविषयक धोरण अगर मतांचा आग्रह आड येऊं देतां कामा नये." मि. स्टीड यांच्या डोळ्यापुढें तिकडील वृत्तपत्रें असल्यामुळें वृत्ताबाबत त्यांनीं विशेष चर्चा केली आहे. आपल्याकडे ती परिस्थिति अद्याप आलेली नाहीं. एकतर प्रत्येक वृत्तपत्राला स्वतःची अशी वृत्त-संघटना नाहीं व दुसरें वृत्ताच्या बाबतींत इकडील पत्रें सर्वस्वीं वृत्तसंस्थांवरच अवलंबून असतात. म्हणून तो भाग सोडला तरी निर्भयत्व, आत्मविश्वास व कर्तव्यनिष्ठा या गुणांची जोपासना जास्तींत जास्त झाली पाहिजे असा जो भावार्थ मि. विकहॅम स्टीड यांनीं सांगितला आहे तो सर्वांनीं दृष्टीपुढें ठेविला पाहिजे. जीं वृत्तपत्रें संस्थानी बाबींकडे लक्ष देतात त्यांनीं तरी वरील दण्डक कसोशीनें पाळण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आज तसें होत नाहीं म्हणून त्यांचा स्वतंत्र निर्देश केला इतकेंच.

## स्वातंत्र्यांतील वाढती जबाबदारी

हिंदुस्थान सध्यां आपल्या सामर्थ्यानें स्वराज्यसोपानाच्या पायऱ्या एकामागून एक चढत आहे. जवळजवळ शेवटची पायरी त्यानें गांठली आहे. स्वातंत्र्यलक्ष्मीनें आपला वरदहस्त ठेवल्यानंतर पत्रकारांची जबाबदारी कमी होत नसून उलट ती कितीतरी पटींनीं अधिक वाढलेली दिसेल. स्वातंत्र्य-संग्रामाच्या खणखणाटांत आपलें कर्तव्य करीत असण्यांत आत्यंतिक त्याग आहे यांत शंका नाहीं; पण तें प्रत्यक्ष कार्य एका दिशेचेंच असतें. स्वराज्याचे हक्क मिळाल्यावर हें कार्य दशदिशांनीं वाढलेलें आपल्याला आढळल्याशिवाय राहणार नाहीं व या वेळींच पत्रकारांची खरी परीक्षा आहे. सध्यां अक्षर-ओळखीपासून तों 'ॲटम बॉंब'च्या विज्ञानापर्यंतची विद्या त्यांनीं जनतेला शिकविली पाहिजे व ती पचविण्याचें सामर्थ्य जनतेच्या अंगीं आणण्याचें कामहि त्यांनींच केलें पाहिजे. देशांत आज अठराविश्वे दारिद्र्य आहे. या दारिद्र्याच्या पंकांतून देश उन्नत करण्यास सध्यांच्या यांत्रिक युगांत प्रचंड प्रमाणावर औद्योगिकरण करणें जरूर आहे. रशियांतील लोकांनीं आपलें पोट मारून आणि अंगभर वस्त्र घेण्याचें टाळून त्या बचतींतून आपली उन्नति केली. हिंदुस्थानांतहि अशीच स्थिति होणार आहे. या परिस्थितींत जीं दुःखें सोसावीं लागतील त्या दुःखांच्या वेळीं धीर देऊन आशेचीं क्षितिजें जनतेच्या डोळ्यासमोर ठेवण्याचें काम पत्रकाराशिवाय कोण करणार? तीच स्थिति लढाऊ सैन्याची आहे. स्वार्थ-बुद्धीनें प्रेरित होऊन दुसऱ्याचे देश घशाखालीं घालण्याची राक्षसी आकांक्षा आज जगांतून नष्ट झालेली नाहीं. या सर्वांना तोंड द्यावयाचें तर शस्त्रास्त्रानें सुसज्ज व सर्व आधुनिक शास्त्रांच्या ज्ञानाच्या पायावर उभारलेलें सैन्य हिंदुस्थानाजवळ असल्याशिवाय चालणार नाहीं. शिपाईगिरी व राष्ट्राकरतां फकिरी अंगांत बाणविण्याचें काम वृत्तपत्रांचें आहे, व हीं सर्व कामें वृत्तपत्रें करतील यांत शंका नाहीं.

आंतरराष्ट्रीय राजकारणांत हिंदुस्थानाला इतरांच्या बरोबरीचें स्थानहि द्यावें लागणार आहे. हें केव्हां घडेल तें सांगतां येत नाहीं. पण त्या वेळीं हिंदुस्थान आपल्या संस्कृतीचें व परंपरेचें वैशिष्ट्य व आपला शांततेचा संदेश यांची छाप जगावर पाडल्याशिवाय राहणार नाहीं. या बाबतींत वृत्तपत्रें काय करूं शकतात याचें मोठें सुंदर वर्णन नामदार शास्त्री यांनीं केलें आहे. १९२२ सालीं आरमारदल कमी करावें म्हणून विचारविनिमय करण्याकरतां एक आंतरराष्ट्रीय परिषद भरली होती. ना. शास्त्री हेहि या परिषदेंत होते. त्यांनीं त्या परिषदेच्या कामकाजाचें वर्णन करतांना सांगितलें आहे कीं, "कोणत्याहि देशाच्या मनांत आपलें आरमार कमी करावयाचें नव्हतें. प्रत्येकजण सबबीच सांगत होता. पण मौज अशी झाली कीं, कोणी तरी अशी व्यवस्था करून ठेवली होती कीं, वृत्तपत्राच्या प्रतिनिधींना घडलेली हकीगत या सभासदांनीं सांगावी. या वृत्तपत्र-प्रतिनिधींनीं आंतरराष्ट्रीय परिषदेच्या सभासदांना रोज बजावावें कीं, निःशस्त्रीकरण केलें तरच युद्धें बंद होतील. याकरतां प्रत्येक प्रतिनिधि काय करतो याकडे जगाचें लक्ष वेधलें. वृत्तपत्र-प्रतिनिधींनीं मोठ्या कौशल्यानें असा हल्ला केल्यामुळें शेवटीं तेथें जमलेल्या प्रतिनिधींना आपापलें आरमारदल कमी करण्याचा ठराव करावा लागला." ना. शास्त्री म्हणतात कीं, "एवढें मोठें वृत्तपत्रांचें सामर्थ्य आहे. हनुमानाला जशी आपल्या अफाट सामर्थ्याची जाणीव नव्हती म्हणून जांबुवानाला त्याची आठवण करून द्यावी लागली, तशी आठवण पुढच्या काळांत जर पत्रकारांना राहिली अगर करून दिली तर हिंदी वृत्तपत्रकार आंतरराष्ट्रीय राजकारणालाहि आपलें विशिष्ट हिंदी वळण लावल्याशिवाय राहणार नाहींत."

## वृत्त-व्यवसायावरील संकटें

वृत्तपत्रांच्या उद्योगांत सर्व बाजूंनीं वाढ होऊं लागल्यामुळें त्यांत पैसा उत्पन्न होऊं लागला आहे. लोकांत वाचनाची गोडी वाढली. आपलें आवडतें

वृत्तपत्र घेण्याची हौस उत्पन्न झाली आणि ज्ञानाची भूक वाढल्यामुळें वृत्तपत्रांचा खप वाढूं लागला. साहजिकच अशा या व्यवसायाकडे धनिक लोकांची दृष्टि जाऊन यांतून आपण पैसा कमावावा व तो भांडवलशाहीच्या नेहमींच्या कुटिलपणानें मिळवावा असाहि उपक्रम होऊं लागलेला दिसतो. वृत्तपत्रांचा उद्योग वर वर्णन केल्याप्रमाणें, एका अर्थानें जनसेवेचा म्हणून पवित्र असल्यामुळें भांडवलवाल्यांनीं राष्ट्रहित-बुद्धीनें तरी या क्षेत्रांत पाऊल टाकूं नये हें बरें; पण त्यांनीं हें क्षेत्र व्यापण्याचा प्रयत्न केला तर वृत्तपत्र व्यवसायांतील पत्रकारांनीं आपल्या संघटनेनें त्यांना तोंड दिलें पाहिजे. पत्रकार हा एका विशिष्ट उच्च भावनेनें प्रेरित झाला आहे ही जाणीव ठेवून संघटितपणानें त्यांनीं या भांडवलवाल्यांच्या आक्रमणाला तोंड दिलें तर या संकटांतून मुक्तता होईल असें वाटतें. यासाठींच वृत्तपत्रें हीं विश्वस्तांच्या मालकीचीं असावींत असें सांगितलें जातें. भांडवलशाहीच्या या आक्रमणाबरोबरच पुढील काळांत सत्ताधारी राजकीय पक्षांचीहि कुरघोडी पत्रकारावर होण्याचा संभव आहे. अमुक एक विशिष्ट मत अगर धोरण हें सत्ताधारी राजकीय पक्षाचें किंवा गटाचें आहे म्हणून तें वाईट अगर तें देशाचें अहित करणारें असलें तरी त्याला पाठिंबा दिलाच पाहिजे असा आग्रह होण्याचा पुष्कळ संभव आहे. १९३५ नंतर बंगालमध्यें अधिकारारूढ झालेल्या मंत्रिमंडळानें त्याच्याविरुद्ध टीका करणाऱ्यावर फौजदारी कायद्याच्या राजद्रोहाच्या १२४ अ कलमाखालीं फिर्याद करण्याचा प्रयत्न केला होता. तो फसला ही गोष्ट वेगळी; पण सत्तारूढ पक्ष आपल्या सामर्थ्याचा वरवंटा पत्रकारावर फिरविणार नाहीं असें मात्र नव्हे. पत्रकारांची संघटना, त्यांचा ध्येयवादी प्रामाणिकपणा आणि त्यांची त्यागाची तयारी हेंच त्यांचें संरक्षक कवच होय.

पत्रकारांची श्रेष्ठ परंपरा कायम टिकविण्याकरतां पत्रकारांनीं आपापसांत सर्व बाबतींत कांहीं संकेत ठरवावेत असे प्रयत्न सध्यां चालू आहेत. आपापसांत

कितीहि कोणत्याहि प्रकारचे मतभेद असले तरी कांहीं गोष्टी पवित्र समजाव्या, कांहीं कार्यांना निरपवादपणें पाठिंबा दिला जावा आणि कांहीं दुष्ट गोष्टींना सर्वांनीं मिळून लगाम घालण्याचा प्रयत्न करावा असा दंडक योजला पाहिजे. हें ठरविण्याचें काम अवघड आहे हें खरें. तथापि याहि प्रयत्नांना यश येईल असें वाटतें. हिंदुस्थानाला राष्ट्रसंजीवन करावयाचें आहे. हें कार्य करतांना व्यक्तिनिंदा, खाजगी हेवेदावे, किंवा स्वार्थी महत्त्वाकांक्षा याला वाव असतां उपयोगी नाहीं व हे धडे पत्रकारांनींच घालून दिले पाहिजेत. तसें मानलें तर पत्रकार हे जनतेचे वाटाडे व गुरु आहेत. त्यांनीं आपलें पवित्र कार्य दृष्टीपुढें ठेऊन आपलें कर्तव्य बजावलें तर आपला हा मायदेश स्वातंत्र्याचा, वैभवाचा व पराक्रमाचा मार्ग चोखाळीत जगांत श्रेष्ठ स्थान प्राप्त करून घेईल व आपला संदेश जगाला देईल अशी उमेद आहे. ईश्वराच्या भयानें माणसें सरळ वागतात व जनतेच्या भयानें राजे सरळ वागतात, असा एक जुना संकेत आहे. त्यांतील अर्थ लक्षांत घेतला तर जनतेचें मुख असणारे पत्रकार यांचें काय कर्तव्य आहे हें सांगण्याचें कारण उरत नाहीं.



" जेणेंकरून समाजाचे व्यापार सुरळीत चालण्यास मदत होईल असें लोकमत जागृत करणें व जो कोणी ह्या कामीं व्यत्यय आणील त्याचें स्वरूपाविष्करण करून वेळींच बंदोबस्त करणें हें वर्तमानपत्राचें मुख्य कर्तव्य होय. "

— लो. टिळक

प्रा. अनन्त काणेकर

# आजचें जनतावाङ्मय प्रातिनिधीक आहे काय?

' जनतावाङ्मय ' हा अलीकडेच भाषेंत वावरूं लागलेला शब्द कोणत्या हेतूनें जन्माला घातला गेला यासंबंधींचे विचार येथें मांडलेले आहेत. सर्व उत्तम वाङ्मय पुरोगामी, क्रांतिकारक नि जनतावाङ्मयच असतें असा हा सिद्धांत आहे.

' जनतावाङ्मय ' ' जनतावाङ्मय ' म्हणून जें कांहीं म्हणतात तें आजचें ' जनतावाङ्मय ' खरोखरीच जनतेचें, भारतीय सर्वसामान्य जनतेचें प्रातिनिधीक आहे काय ? ' या प्रश्नासंबंधीं मला काय वाटतें तें मीं लिहावें अशी संपादकांनीं इच्छा प्रकट केली आहे. आजकाल वापरला जाणारा ' जनतावाङ्मय ' हा एक अर्थशून्य शब्दसमूह आहे, असें माझें मत झालें आहे. रशियन क्रांति यशस्वी होऊन कम्यूनिस्ट विचारांची लाट सर्व जगांत पसरल्यानंतर जगांतल्या सर्व भाषांत कांहीं उत्तम नव्या शब्दांची भर पडली, त्याबरोबरच कांहीं अर्थशून्य शब्दहि भाषेंत रूढ झाले. तसल्या शब्दांपैकीं ' जनतावाङ्मय ' हा मराठी भाषेंत रूढ झालेला एक शब्द आहे. लोकगीतें किंवा लोककथा हें खरेंखुरें जनतावाङ्मय होय. जनतेचें आणि जनतेनें

जनतेसाठीं तयार केलेलें असें हेंच वाङ्मय; आणि हें वाङ्मय आजचें नाहीं. आज तसें वाङ्मय तयार होणें शक्य नाहीं. आज जें 'जनतावाङ्मय' म्हटलें जातें किंवा 'जनतावाङ्मय' तयार व्हावयाला हवें असें म्हटलें जातें त्या घोषणेंत ज्या 'जनतावाङ्मया' चा उल्लेख असतो, तें वर सांगितलेल्या प्रकारचें 'जनतावाङ्मय' मुळींच नव्हे. तो एक अर्थशून्य शब्दप्रयोग आहे. कसा तें पाहूं.

### कम्युनिस्टांचा नवा शोध !

मम्मट—जगन्नाथापासून म्हणा, किंवा प्लेटो-ॲरिस्टॉटल्‌पासून म्हणा, तों कम्यूनिस्ट विचारांचा फैलाव होईपर्यंत टीकाशास्त्रांत 'चांगलें' वाङ्मय आणि 'वाईट' वाङ्मय असे प्रकार होते. मानवी व्यवहाराच्या प्रत्येक क्षेत्राचा आपल्या प्रचाराकरतां उपयोग करण्याचा चंग बांधलेल्या कम्यूनिस्टांनीं मात्र टीकाशास्त्रांत एक नवीनच गोंधळ निर्माण केला. 'चांगलें' किंवा 'वाईट' वाङ्मय असें म्हणण्याऐवजीं 'पुरोगामी' आणि 'प्रतिगामी', किंवा 'क्रांतिकारक' आणि 'प्रतिक्रांतिकारक' किंवा 'जनतेचें प्रातिनिधीक' आणि 'अप्रातिनिधीक' असे प्रकार पाडावयाला त्यांनीं सुरुवात केली. अर्थात 'पुरोगामी', 'क्रांतिकारक' किंवा 'जनतेचें प्रातिनिधीक' तें चांगलें असें त्यांना सुचवावयाचें होतेंच. हिंदुस्थानासारख्या पारतंत्र्यांत खितपत पडलेल्या देशांतली जनता क्रांतिवादी राजकीय पुढाऱ्यांचा शब्द, त्यांना समजत नसलेल्या क्षेत्रांतहि त्या क्षेत्रांतल्या मुरब्बी विद्वानांच्या शब्दापेक्षांहि अधिक महत्त्वाचा समजते ही गोष्ट योग्य नसली तरी अगदीं स्वाभाविक आहे. निष्णात वैद्याच्या मतांपेक्षांहि गांधीजींचीं वैद्यक-विषयक मतें जनतेला अधिक ग्राह्य वाटलीं तर त्यांत नवल वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. क्रांतिकारक तत्त्वज्ञानाचा प्रचार करणाऱ्या कम्युनिस्टांनीं वाङ्मय क्षेत्रांत आणलेल्या 'पुरोगामी', 'क्रांतिकारक' किंवा 'जनतेचें प्रातिनिधीक जनतावाङ्मय' या शब्दांच्या मोहजालांत जनता अशीच सांपडली. या

जनतेपैकीं मीहि एक होतों हें स्पष्टपणें कबूल केलें पाहिजे. ‘ डिव्हाइन् कॉमेडी ’ हें महाकाव्य लिहिणाऱ्या डान्टेसारख्या जगांतल्या एका श्रेष्ठ महाकवीला, एका पोरींचें प्रेम न मिळाल्यामुळें भग्नहृदय झालेला एक ‘ सन् ऑफ ए बिच् ’ अशी शिवी एका उत्साही रशियन कवीनें हांसडली होती ! त्याच्यापेक्षां थोड्या कमी उत्साहानें आम्ही ‘ पुरोगामी ’ लोकहि त्या वेळेला कालिदास, भवभूति, टागोर वगैरेंना ‘ प्रतिगामी ’ ‘ मध्ययुगीन ’ वगैरे आम्हांला नवीनच उमगलेल्या शिव्या बहाल करीत होतों ! आम्हांला कांहीं समजत नव्हतें हें उघड आहे. कम्यूनिस्ट टीकाकारांचींहि मतें आतां बदललेलीं दिसतात. पण हें खोल विचारामुळें झालेलें प्रामाणिक मतपरिवर्तन नाही. ज्यांना आपण नांवें ठेवीत होतों तीं टागोरांचीं काव्यें चांगली आहेत असें त्यांना आतां वाटतें आहे असें नाहीं, तर चीनवर पाशवी अत्याचार करणाऱ्या जपान्यांचा जळजळीत निषेध टागोरांनीं केला होता आणि त्याचा ‘ लोकयुद्धा ’च्या प्रचाराला उपयोग करतां येत होता म्हणून कम्यूनिस्टांना टागोर एकदम गुरुदेव वाटूं लागले. आणि या प्रसंगावर कामगार संघटनेंत फार थोर कार्य केलेल्या, पण वाङ्मय-क्षेत्राचें यथातथाच ज्ञान असलेल्या श्री. डांगे यांच्यासारख्या कम्यूनिस्ट पुढाऱ्यानें एक नाटुकलें लिहून टाकलें ! एकाद्या लेखकाचा चांगले-वाईटपणा किंवा पुरोगामित्व-प्रतिगामित्व कम्यूनिस्ट टीकाकार स्वतःच्या सोयीप्रमाणें ठरवीत असतात. तेव्हां त्यांच्या वाङ्मयीन मतांना कांहीं किंमत देण्याचें कारण नाहीं.

### उत्तम वाङ्मय हीच कसोटी

कम्यूनिस्ट टीकाकारांच्या प्रेरणेनें रूढ झालेल्या ‘ जनतावाङ्मय ’ या शब्दानें कोणताच नवीन अर्थ सांगितलेला नाहीं. कोणतेंहि उत्तम वाङ्मय, मग तें कालिदास-भवभूतीचें असो वा एकाद्या आजच्या लेखकाचें असो, पुरोगामी, क्रांतिकारक आणि जनतेचें प्रातिनिधीक असतेंच. उत्तम वाङ्मय जनताजीवनांतून आपला जीवनरस शोषून घेतें. जें नसा घेत नाहीं तें उत्तम

नसतें. उत्तम वाङ्मय जनतेचें प्रातिनिधीक असतेंच. जीवनाच्या विशाल दर्शनानें मानवी मनाचे नाना बंध तें तटातट तोडून टाकतें म्हणून तें क्रांतिकारक असतें. तें अनुभवांच्या भांडारांत भर घालतें, जाणीवेचें क्षेत्र विस्तृत करतें म्हणून तें पुरोगामीहि असतें. असें जर आहे, तर हजारों वर्षे चालत आलेला सर्व जनतेला सहज समजणारा चांगला सुटसुटीत 'उत्तम वाङ्मय' हा शब्दप्रयोग टाकून 'जनतावाङ्मय' हा कठीण शब्द कां म्हणून वापरावयाचा ? त्याचें कारण आहे. त्याचें कारण असें कीं, हा शब्द रूढ करणारांना उत्तम वाङ्मय कोणतें आणि अधम वाङ्मय कोणतें हें विशेष कळतहि नव्हतें, आणि त्याची त्यांना पर्वाहि नव्हती. वाङ्मय हें जनमनाची पकड घेणारें एक प्रभावी साधन आहे हें माहीत असल्यामुळें आपल्या विशिष्ट राजकीय प्रचाराकरतां त्यांना वाङ्मयाचा उपयोग करावयाचा होता. तेव्हां सर्व उत्तम वाङ्मय हें खरेंखुरें 'जनतावाङ्मय' असूनहि 'जनता', 'बहुजनसमाज', 'क्रांति' इत्यादि, विशिष्ट परिस्थितीमुळें लोकप्रिय झालेल्या शब्दांचा फायदा घेण्याकरितां 'जनतावाङ्मय' हा एक नवीनच शब्दसमूह या लोकांनी तयार केला आणि त्यांतल्या 'जनता' या शब्दाचा एक संकुचित अर्थ रूढ केला. 'जनता' म्हणजे फक्त बहुजनसमाज किंवा कामकरी-शेतकरी ! पांढरपेशा मध्यमवर्ग किंवा श्रीमान् लोक हे या 'जनतें'त येत नाहींत. कामकरी-शेतकऱ्याचें—आणि केवळ शेत नांगरून किंवा काम करून आपलें सुखदुःखमिश्रित जीवन कंठणाऱ्या साध्या कामकरी-शेतकऱ्याचें नव्हे, तर विशेषतः क्रांतिकारक राजकीय चळवळींत काम करणाऱ्या कामकरी-शेतकऱ्याचें — चित्रण ज्या वाङ्मयांत असेल तेंच जनतेचें प्रातिनिधीक जनतावाङ्मय किंवा पुरोगामी किंवा क्रांतिकारक वाङ्मय. फूल, मूल, ढग, आकाश यासारख्या विषयावरच्या कविता कितीहि सुंदर असल्या तरी त्या — किंवा कालिदासाची प्रेमविव्हल शकुंतला, शेक्सपियरचा द्वि धा म न झालेला हॅम्लेट,

गडकऱ्यांची रडवी सिंधू सर्व — अप्रातिनिधीक, मध्यमवर्गीय, प्रतिगामी, प्रतिक्रांतिकारक !

आजकाल वाङ्मयाला एक प्रकारचा ठराविकपणा आला आहे, विशिष्ट मध्यम किंवा श्रीमंत वर्गाचेंच पुन्हां पुन्हां चित्रण केलें जातें, तेव्हां लेखकाचें निरीक्षण व्यापक असावें, समाजांतल्या सर्व थरांचें विविध, विशाल, खोल दर्शन शक्य तों त्यानें द्यावें हें म्हणणें वेगळें आणि वरच्यासारखी जनतावाङ्मयाची संकुचित व्याख्या करणें वेगळें. क्रांतिकारक कामगारांच्या भिकार किंवा चुकीच्या चित्रणापेक्षां फुलपांखरावरील सुंदर कविता खात्रीनें अधिक क्रांतिकारक, पुरोगामी किंवा प्रातिनिधीक असते. ' जनतेचें प्रातिनिधीक ' या शब्दांचा अर्थ कामगार, शेतकरी, पांढरपेशा, सावकार या सर्वांत वसत असलेल्या मानवतेचें प्रातिनिधीक असाच वाङ्मयांत करावयाचा असतो. याच अर्थानें सर्व उत्तम वाङ्मय जनतेचें प्रातिनिधीक किंवा जनतावाङ्मय असतें.

कामगार-शेतकऱ्यांचा प्रचंड बहुजनसमाज बहुतांशीं निरक्षर आहे. त्यामुळें बरें-वाईट, प्रातिनिधीक-अप्रातिनिधीक कुठलेंच वाङ्मय त्याला वाचतां येत नाहीं; पण वाचतां आलें तरी त्यांना उपरोक्त संकुचित अर्थाचें ' जनतावाङ्मय ' आवडेल, कालिदासाची शकुंतला, भवभूतीची सीता, शेक्सपियरचा हॅम्लेट, गडकऱ्यांची सिंधू आवडणार नाहीं, या खऱ्याखुऱ्या जनतावाङ्मयाचा आस्वाद त्यांना घेतां येणार नाहीं असें म्हणणें हा बहुजनसमाजाचा उपमर्द आहे. पुष्कळ वेळां एकाद्या कामकऱ्यांत किंवा शेतकऱ्यांत जितकी सौंदर्यदृष्टी आढळते तितकी चांगल्या चांगल्या विद्वान पांढरपेशांतहि आढळत नाहीं. फूल, मूल, ढग, आकाश, प्रेम, अश्रू, हास्य इत्यादि नाना विषयांत नाना प्रकारचें सौंदर्य आहे, पण त्याचा आस्वाद घेण्यासारखी आपली परिस्थिति नाहीं म्हणूनच बहुजनसमाजाला क्रांति करावीशी वाटते. तेव्हां बहुजनसमाजाची ही सौंदर्यापेक्षां जिवंत ठेवणें हीहि एक क्रांतिकारकच गोष्ट आहे. क्रांतींतल्या सौंदर्याइतकें याहि विषयांतलें सौंदर्य

बहुजनसमाजाला हवें आहे. सर्व उत्तम वाङ्मय हें क्रांतिकारक कार्य करीत असतें. गॉर्कीचा क्रांतिकारक पाव्हलॉव्ह् किंवा साने गुरुजींची 'श्यामची आई' बहुजनसमाजाला जितकी हवी तितकीच शेक्सपियरची ऑफेलिया किंवा गडकऱ्यांची सिंधूहि हवी. कांहीं लोक वरच्या गड्याकरतां 'जाडा तांदूळ' घेतात त्याप्रमाणें बहुजनसमाजासाठीं खास असें 'जनतावाङ्मय' निर्माण करण्याची कांहींएक आवश्यकता नाहीं. उत्तम वाङ्मय निर्माण व्हावें आणि उत्तमच वाङ्मय बहुजनसमाजालाहि द्यावें हेंच उत्तम !



डॉ. पुरुषोत्तम गणेश सहस्रबुद्धे, एम्. ए., पीएच्. डी.

# सरस्वतीच्या सामर्थ्याची हिंदुस्थानांतील हेळसांड

नवें तत्त्वज्ञान, शिकवण, नवा धर्म हा ग्रंथनिविष्ट न होण्याची दुर्दैवी घटना हिंदुस्थानाच्या गेल्या एक हजार वर्षांच्या इतिहासाचें एक लक्षणच झालेलें आहे. आणि हें सरस्वतीचें सामर्थ्य आपण आकळिलें नसल्यामुळें आपले सामाजिक पुनर्घटनेचे प्रयत्न तितकेसे यशस्वी होत नाहींत असा निष्कर्ष या लेखांत काढलेला आहे.

समर्थ रामदासस्वामींच्या कार्याची आतां मराठी पंडितांनी खूप चिकित्सा केली आहे. त्या चिकित्सेंत कितीहि भिन्न मतें प्रगट झालीं असलीं, तरी सतराव्या शतकांत महाराष्ट्रांत झालेल्या क्रांतीच्या श्रेयांत समर्थ अंशभागी होते याबद्दल दुमत नाहीं. क्रांतिपूर्व जागृति घडवून आणण्यासाठीं समर्थ स्वतः व त्यांचे शिष्य हे सर्व हिंदुस्थानभर वणवण भटकत होते व आपल्या वाणीनें लोकांना त्यांच्या परिस्थितीची जाणीव करून देत होते. क्रांतीला संघटित सामर्थ्याची फार आवश्यकता असते. समर्थांनीं या भूमींत शेंकडों मठ स्थापन करून त्या दृष्टीनें सिद्धता करून ठेविलीच होती. पण समर्थांचें खरें कार्य

याहून निराळें आहे. त्यांच्यापूर्वी महाराष्ट्रांत निवृत्तिमार्गाचें प्राबल्य फार होतें. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ इत्यादि संतमंडळींनीं संसारविमुखतेचा तीनशें वर्षें उपदेश करून लोकांच्या मनांतील राजसगुणी ऐहिक आकांक्षा उच्छिन्न करून टाकल्या होत्या. ऐहिक प्रपंचाविषयीं, या भूमीच्या उत्कर्षापकर्षाविषयीं लोक उदासीन होऊन बसले होते. परमार्थांतील विश्वकुटुंबवाद ऐहिकांत घुसविल्यामुळें राजकीय आकांक्षांना अवश्य असणारा आपपरभाव, शत्रुमित्रभाव हा नाहींसा झाला होता. संसार करणें हें पाप आहे, निदान तो गौणपक्ष आहे असा विचार सर्वत्र रूढ झाला होता. समर्थांनीं ही विचारसरणी, हें तत्त्वज्ञान नष्ट करून लोकांना प्रपंचाचें, राजकारणाचें, ऐहिक आकांक्षांचें, स्वराज्यसाम्राज्याचें तत्त्वज्ञान शिकविलें. प्रपंच केला नाहीं, तर परमार्थहि बुडेल हें लोकांना दाखवून दिलें. सुंदर स्त्री, मुलेंबाळें असणें हें दुर्भाग्य नसून हा ' सुकृताचा योग आहे ' असें सांगितलें. राज्यें मिळतात तीं बाहुबल, मुत्सद्देगिरी यांनीं मिळतात, नामस्मरणानें मिळत नसतात ही शिकवण दिली. शत्रुमित्र सर्व सारखे बुळगें हें तत्त्वज्ञान नष्ट करून प्रखर आपपरभाव त्यांनीं निर्माण केला. सदैव कटावर कर ठेवून अठ्ठावीस युगें निष्क्रियपणें उभा राहणारा विठोबा दूर सारून त्या जागीं धनुर्धर परंतप अशा रामाची उपासना रूढ केली. हातांत वारकऱ्याची पताका न घेतां ' शर्थीची तलवार करावी ' असा उपदेश केला. दैववादानें हतबल, निःसत्त्व, हीनदीन झालेल्या लोकांना, ' यत्न तो देव जाणावा ' हा मंत्र दिला. आणि ही सर्व विद्या लोकांमध्यें हळूहळू पेरण्यासाठीं अनेक शिष्य निर्माण करून नेणत्या लोकांना जाणते करून ' महाराष्ट्रराज्य करावें जिकडे तिकडे ' हें स्वप्न खरें करून दाखविलें.

समर्थांची ही जी नवी शिकवण, त्यांचें हें जें क्रांतिकारक तत्त्वज्ञान त्याचें सम्यक् आकलन व्हावें म्हणून आपण त्यांचें वाङ्मय पाहूं लागलों तर एक मोठी विस्मयजनक गोष्ट ध्यानांत येते. ती ही कीं, समर्थांच्या समग्र ग्रंथांत या तत्त्वज्ञानाचें सविस्तर, सांगोपांग असें विवेचन कोठेंहि केलेलें नाहीं.

समर्थांचे दासबोध, रामायण, अष्टकें, इत्यादि समग्र ग्रंथ एकत्र केले तर सुमारें बाराशें पृष्ठें भरतील. यांपैकीं या नव्या तत्त्वज्ञानाला अवघीं साठपासष्ट पृष्ठें दिलेलीं आहेत. आणि तीं वाचून पाहिलीं तरी त्यांत या तत्त्वज्ञानांतील संघटना, प्रयत्नवाद, ऐहिकाची आवश्यकता, तर्काची श्रेष्ठता, महाराष्ट्रधर्म, शत्रुमित्रभाव या तत्त्वांचें साकल्यानें विवेचन कोठेंच आढळत नाहीं. दासबोधांत किंवा अन्यत्र नवविधाभक्ति, आधिभौतिक ताप, बद्धलक्षण, मोक्ष, माया, पुरुषप्रकृति, रजोगुण, तमोगुण इत्यादि परमार्थांतील तत्त्वांचें आणि सिद्धांतांचें जें विवरण आहे तें अगदीं सविस्तर आहे. मूल सिद्धांतांचें विवरण, त्यावर येणाऱ्या शंका, आक्षेप यांचें निरसन व खंडन, स्वमताचें पुन्हां मंडन, त्याला आधार, प्रमाण, त्याची अनेकवार पुनरुक्ति, हे सर्व प्रकार या परमार्थ विषयाच्या विवेचनांत आढळतात. तसा विषयाचा प्रपंच या नवविचारांच्या बाबतींत, थोडे अपवाद सोडले तर, कोठेंहि आढळत नाहीं. संघटना, प्रयत्नवाद, तर्कनिष्ठा हीं तत्त्वें अशीं आहेत कीं समाजाला त्यांचें पूर्ण आकलन व्हावयास हवें असेल तर त्या प्रत्येकावर एकेक दासबोध लिहिणें अवश्य आहे. आणि जेव्हां जनमताचा ओघ विरुद्ध दिशेला वाहात असेल तेव्हां त्याला वळवून आणण्यासाठीं तर याहिपेक्षां मोठा प्रयत्न अवश्य आहे. समर्थांनीं जनमताचा ओघ आपल्या वाणीनें व प्रत्यक्ष कृतीनें वळविला ही गोष्ट इतिहासप्रसिद्धच आहे. पण वाणीनें त्यांनीं जन्मभर जें विवेचन केलें तें सर्व ग्रंथनिविष्ट झालें नाहीं ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे. ग्रंथनिविष्ट जें वाङ्मय आहे त्याचा सर्व भर परमार्थ–विचारावर आहे. नवें तत्त्वज्ञान त्यांत अगदीं थोडें आहे. आणि तेंहि फुटकळ विचाराच्या रूपानें आलेलें आहे. या प्रकरणांतून, त्या प्रकरणांतून, अशीं कांहीं वाक्यें जमवून त्यांच्या आधारानें समर्थांच्या राजकीय तत्त्वज्ञानाची उभारणी करावी लागते. महंतांचें कार्य, शक्तीची उपासना, प्रपंचाचें महत्त्व, राजकारण अशा कांहीं विषयांवर सबंध समास किंवा प्रकरण फार तर खर्चीं पडलेलें दिसतें. इतर विषयांवर तेंहि नाहीं. ‘ संभाजीस पत्र ’, ‘ आनंदवनभुवन ’ इत्यादि प्रकरणांत

मधूनच त्याविषयीं आलेल्या वचनांवरून समर्थांच्या विचारांचा अदमास बांधावा लागतो. आणि हें सर्व जरी एकत्र केलें तरी वर सांगितल्याप्रमाणें एकंदर हजार बाराशें पृष्ठांपैकीं फार तर साठ-सत्तर — अगदीं पराकाष्ठा म्हणजे ऐशी—पृष्ठें भरतील. म्हणजे समर्थांचें जें खरें कार्य त्याला त्यांच्या वाङ्मयांत अगदीं गौण, अल्प असें स्थान मिळालेलें आहे. आणि पूर्वींच्या संतमंडळींनीं जे परमार्थ-विचार, जो वेदांत, जो भक्तिमार्ग, जो निवृत्तिमार्ग उपदेशिला त्याच्या विवेचनासाठीं, प्रतिपादनासाठीच समर्थांचें बहुतेक वाङ्मय खर्ची पडलें आहे.

## तत्त्वज्ञान ग्रंथबद्ध झालें नाहीं

याचा अर्थ असा होतो कीं समर्थांनीं 'राजकीय क्षेत्रांत जें महान् कार्य केलें, ज्या चळवळी सुरू केल्या, स्वराज्य-संस्थापनेसाठीं जी वैचारिक क्रांति केली, जें नवें तत्त्वज्ञान प्रसृत केलें तें खरें पाहातां ग्रंथबद्ध झालेंच नाहीं. जें कांहीं थोडेंबहुत झालें तें परमार्थ-विचार-महोदधींत इतकें विरून गेलें कीं त्यांच्या वेळच्या पिढीसहि त्याची जाणीव राहिली नाहीं. आणि हीच महाराष्ट्राच्या व भरतखंडाच्या इतिहासांतील मोठी दुर्दैवी घटना होय असें मला वाटतें.

मराठ्यांच्या इतिहासांतील शिव-समर्थांचा काल व पुढील काल यांची तुलना केली तर त्या दोहोंत एक फार महत्त्वाचा फरक दृष्टीस पडतो. पहिल्या कालखंडांत परकीय आक्रमणाशीं झुंज दिलेली जशी आढळते त्याचप्रमाणें हिंदु समाजव्यवस्थेंत जे दोष आढळतील ते नष्ट करून, त्या समाजाच्या अनेक शतकांच्या दौर्बल्याचीं कारणें नाहींशीं करून त्याची पुनर्घटना करण्याचे प्रयत्न झालेले दिसतात. पुढील काळांत नुसता पराक्रम दिसतो. लढाया, स्वाऱ्या, मोहिमा यांचाच तो इतिहास आहे. समाजाचें बल हें त्यांतील धार्मिक संस्था, सामाजिक रूढि, अर्थव्यवस्था, राजकीय तत्त्वज्ञान, म्हणजे एकंदर त्याची संस्कृति यावर अवलंबून असतें. केवल तलवारींत तें

बळ नसतें. तलवारीच्या मागच्या तत्त्वज्ञानावर असतें. तें तत्त्वज्ञान उंच करावें, सामाजिक, धार्मिक संस्थांतील दोष नाहींसे करून, नव्या रूढि प्रसृत कराव्या, आणि विघटनेचीं बीजें नाहींशी करून समाज संघटित करावा असा विचारपूर्वक केलेला प्रयत्न पहिल्या कालखंडांत दिसून येतो. दुसऱ्या कालखंडांत असा प्रयत्न मुळींच दिसत नाहीं.

शिवछत्रपति हे केवळ राज्यकर्ते, सेनापति किंवा मुत्सद्दी होते असें नाहीं. ते एक थोर तत्त्ववेत्तेहि होते, ते राजर्षि होते. धर्म, अर्थ, समाजरचना या क्षेत्रांत पुनर्घटना करण्याचे त्यांचे जे प्रयत्न झालेले दिसतात त्यावरून हें स्पष्ट दिसून येतें. परकीय शत्रु हा खरा शत्रु नव्हे तर नव्या काळाला प्रतिरोध करणारी जुनी समाजव्यवस्था, जुन्या धर्मकल्पना, जुनी अर्थव्यवस्था म्हणजेच जुनें तत्त्वज्ञान हा खरा शत्रु होय हें त्यांनीं जाणलें होतें. आणि म्हणूनच पतितांची शुद्धि, भाषाशुद्धि, समुद्रगमन, वतन-व्यवस्थेचा उच्छेद, क्षत्रियत्वाची स्थापना इत्यादि नवीं तत्त्वें त्यांनी रूढ केलीं व आचरलीं. मराठेशाहीच्या पुढील काळांत समाजाच्या जडदेहधारी शत्रूवरच फक्त लक्ष होतें असें दिसतें. प्रगतीला विरोध करणारी जुनी संस्कृति या शत्रूकडे कोणाचेंच लक्ष नव्हतें.

## याची जबाबदारी पंडितांवर

पण या वैगुण्याची, या अवनतीची बरीचशी जबाबदारी शिवाजी व समर्थ यांच्या काळच्या पडितांवर आहे. त्या दोन महापुरुषांनीं निर्माण केलेल्या नव्या परंपरा, त्यांचे क्रांतिकारक विचार, त्यांचें नवें धोरण, त्यांची काल भेदून मागेंपुढें पाहाणारी दृष्टि, यांचें विवेचन करणारे विपुल ग्रंथ या पंडितांनीं लिहून ठेवले असते, तर पुढील काळांत आलेली दुर्दशा टळली असती. ते ग्रंथ हातीं घेऊन पुढीलांनीं मार्ग आंखले असते आणि त्यांच्या आधारानेंच कालाच्या धांवत्या ओघाला अनुसरून दर वेळीं नवें तत्त्वज्ञान,

नवे धर्मबंध त्यांनीं निर्माण केले असते. कालाला कलाटणी देणारे शिव-समर्थांसारखे पुरुष कांहीं दर शतकांत होत नसतात. पण सरस्वतीच्या साह्यानें त्यांना अमर करणें मात्र शक्य असतें. त्यांच्या काळच्या पंडितांनीं हें केलें नाहीं. त्यामुळें शिवछत्रपतींचें व समर्थांचें तत्त्वज्ञान त्यांच्याबरोबरच लुप्त झालें. थोर पुरुष विद्यमान असतात तोंपर्यंत त्यांची वाणी व कृति यावरून त्यांचें तत्त्वज्ञान लोकांत पसरत असतें. पण त्यांचे विचार, त्यांची शिकवण ग्रंथनिविष्ट झाली नाहीं, तर पुढील पिढीस त्यांचें दर्शन घडत नाही. मराठी राज्यसंस्थापकांची हीच स्थिति झाली. त्यांच्या दिव्य दृष्टीचें, क्रांतिकारक विचारांचें आकलनच तत्कालीन पंडित वर्गाला झालें नाहीं. आणि या त्यांच्या प्रज्ञाहीनतेमुळें पुढील पिढ्यांचें अपरिमित नुकसान झालें आहे.

समर्थांच्या समकालीन शिष्यांनीं व भक्तांनीं त्यांच्याविषयीं व त्यांचा ग्रंथ जो दासबोध त्याविषयीं अनेक स्तोत्रें, आरत्या, धांवे करून ठेवले आहेत. हें सर्व वाचलें म्हणजे मनाला मोठा उद्वेग वाटतो. समर्थांच्या वाङ्मयांत बाराशें पृष्ठांपैकीं राष्ट्रीय तत्त्वज्ञानाला अवघीं सत्तरऐशीं पृष्ठें दिलीं आहेत, ही मोठी दुर्दैवाची गोष्ट होय असें जें वर पुन्हां पुन्हां म्हटलें आहे, त्याचें कारण त्यांच्याविषयीं त्यांच्या शिष्यांनीं केलेल्या आरत्या वाचल्या म्हणजे चांगलें कळून येतें. या शिष्यकृत सर्व वाङ्मयांत समर्थांच्या राष्ट्रीय कार्याचा चुकून सुद्धां कोठें उल्लेख केलेला नाहीं. भवडोहांतून तारलें, चौऱ्यायशीचा फेरा चुकविला, जन्ममृत्यू दूर केले, अज्ञान जडजीवां मार्ग सुकर केला, नवविधा भक्ति विशद करून सांगितली, त्यामुळें बद्ध हे सिद्ध झाले, भक्तांचा उद्धार केला, शांति, क्षमा, विरक्ति, वैराग्य, भक्ति, ज्ञान यांचा प्रसार केला, याविषयींच सर्व कौतुक आहे. त्यांनीं संघटना घडविली, क्षात्रधर्माचें उद्दीपन केलें, संसाराची महती सांगितली, राष्ट्रधर्म शिकविला, याचा एका अक्षरानेंहि कोणी निर्देश केलेला नाहीं. त्यांच्या शिष्यांनाच समर्थांच्या कार्याचें स्वरूप कितपत कळलें होतें हें यावरून दिसून येतें! ही शिष्यांची कथा! मग

त्यानंतरच्या भक्तांची गोष्ट कशाला ! समर्थांची शिकवण इतर संतांच्यापेक्षां निराळी होती, जुन्या रूढ परंपरा उच्छिन्न करून लोकमताचा ओघ बदलून टाकण्याचा त्यांचा प्रयत्न होता, ते क्रांतिकारक होते असें आज जरी कोणी प्रतिपादन केलें तरी त्यावर त्यांचे भक्त आजहि अगदीं उसळून उठतात. इतर संत व समर्थ यांच्यांत फरक केलेला त्यांना मुळींच खपत नाहीं. भक्ति, ज्ञान, वैराग्य यांच्या प्रसाराहून त्यांचें कार्य निराळें होतें हें म्हणणें त्यांना सहन होत नाहीं, इतकें समर्थांच्या कार्याचें त्यांना आकलन झालें आहे !

जी गोष्ट समर्थांची तीच शिवछत्रपतींची. त्यांनीं ज्या वेळीं राज्यव्यवहार कोश करण्याची आज्ञा दिली, त्या वेळीं भाषेच्या शुद्धतेची महती सांगितली असलीच पाहिजे. पतितांची शुद्धि करण्याची चाल सुरू केली, त्या वेळीं तिची कारणमीमांसा केली असलीच पाहिजे. ‘ कलावाद्यन्तयोः स्थितिः । ’ या मूर्ख विचारसरणीचा उच्छेद करून ‘ मी क्षत्रिय आहें ’ असें सांगून स्वतः राज्याभिषेक करवून घेतला, त्या वेळीं श्रीकृष्णाप्रमाणेंच त्यांनीं धर्माधर्माविषयीं विवेचन केलें असलेंच पाहिजे. पण श्रीकृष्णाच्या मुखींचे अमृतबिंदु जसेच्या तसे संग्रहीत करून सरस्वतीच्या साह्यानें ते अमर करून ठेवणारे वेदव्यास भारतकाळीं होते तसे शिवछत्रपतींच्या तत्त्वज्ञानाला अमररूप देणारे पंडित त्यांच्या काळीं झाले नाहींत, हें दुर्दैव होय. त्यामुळें त्यांनीं अंगीकारलेलें क्रांतिकारक तत्त्वज्ञान एका पिढींतच लुप्त होऊन गेलें व पुढील काळांत जड बाहुबल तेवढें उरलें.

शिवसमर्थांचें तत्त्वज्ञान, त्यांची शिकवण, त्यांचा नवा धर्म हा ग्रंथनिविष्ट झाला नाहीं ही जी दुर्दैवी घटना ती मुद्दाम विस्तारानें वर्णन करून सांगण्याचें कारण असें कीं ती घटना एकाकी नसून हिंदुस्थानाच्या गेल्या एक हजार वर्षांच्या इतिहासाचें तें एक लक्षणच आहे. मला मुख्यतः हें सांगावयाचें आहे कीं, या दीर्घ कालखंडांत या भूमींत पित्यानें पुत्राला सरस्वतीच्या साह्यानें

शिकविलेंच नाहीं. या कालांत या भूमींत ऐहिक क्षेत्रांत अनेक कर्ते राजे झाले, सेनापति झाले, मुत्सद्दी झाले, तत्त्ववेत्ते झाले, राजनीतिज्ञ झाले; पण त्यांतल्या कोणीहि आपली शिकवण ग्रंथरूपानें पुढील पिढीस दिली नाही. त्यांनीं स्वतः तसें केलें नाहीं; आणि त्यांच्या शिष्यांनीं, भक्तांनीं किंवा समाजांतील इतर पंडितांनींहि ही काळजी घेतली नाहीं. आणि त्यामुळें येथें ज्ञानाचा संचय झाला नाहीं. दर पिढीला पुन्हां श्रीगणेशापासून प्रारंभ. श्रीमंत थोरले बाजीराव यांनीं ज्या अनेक लढाया मारल्या त्यांचीं आज जीं थोडींशीं वर्णनें आपण वाचतों त्यावरून युद्धविषयक कितीतरी सिद्धांत त्यांच्या मनांत निश्चित झाल्याचें दिसून येतें. निजामाशीं त्यांनीं ज्या लढाया केल्या त्यावरून आपल्याला हवें त्या ठिकाणीं शत्रूला आणून तेथें त्याचा निःपात करण्याचें नेपोलियनचें हुकमी कसब त्यांच्या ठायीं होतें असें दिसून येतें. पण याचें विवेचन करून त्यावरून सिद्धांत बांधून त्याचें युद्धशास्त्र करून सांगणारा कोणीहि रणविशारद येथें झाला नाहीं आणि त्यामुळें पुढच्या सेनापतीला स्वतःचें युद्धशास्त्र प्रारंभापासून तयार करावें लागलें. आणि ही कहाणी प्रत्येक क्षेत्रांतल्या कर्त्या पुरुषाची आहे. प्रत्येकाचे विचार, त्यानें मनांत बांधलेले सिद्धांत त्याच्याबरोबर लुप्त होऊन जात. आणि त्याच्या पुढील पिढीला पायापासून प्रारंभ करावा लागे. त्यामुळें राजनीति, युद्ध, व्यवहारनीति, समाजरचना या शास्त्रांचा येथें विकासच झाला नाहीं. न्यूटनचा गुरुत्वाकर्षणाचा सिद्धांत त्यानें लिहून ठेवला नसता आणि प्रत्येक विद्यार्थ्याला तो स्वतंत्रपणें शोधून काढावा लागला असता, तर वस्तुशास्त्राची जी प्रगति शक्य झाली असती तितकीच प्रगति येथें समाजशास्त्राची झाली. कारण येथें पित्यानें आपले सिद्धांत लिहून ठेविले नाहींत, पुत्राला शिकविले नाहींत.

रजपुतांनीं जवळजवळ आठशें वर्षें मुसलमानांशीं संग्राम केला. तेवढ्या अवधींत त्या भूमींतल्या पुरुषांना लक्षावधि अनुभव आले असतील. मुसलमानांची कडवी धर्मनिष्ठा, त्यांची युद्धनीति, आपली युद्धपद्धति, किल्ल्यांचें महत्त्व,

बचावाचें धोरण, चढाईचें धोरण, शरण आलेल्यास अभयदान, जोहार, यवनांची कपटनीति, रणांत सर्वांनीं आत्मबलिदान करणें, या आणि यासारख्या असंख्य सामाजिक व राजकीय विषयांवर कितीतरी विचार रजपूत पुरुषांनीं केला असेल. पण प्रत्येकाचा विचार ज्याचा त्याच्याबरोबर गेल्यानें आठशें वर्षांच्या अखेरीस पुन्हां सर्व धोरण पहिल्यासारखेंच ! संचय, वाढ, विकास व त्यामुळें निर्माण होणारें नवें तत्त्वज्ञान यांचा येथें ठावाठिकाणाच नाहीं. त्यामुळें येथल्या घडामोडी या निसर्गांतील वायु, वीज, अग्नि यासारख्या अंधशक्तींच्या संघर्षासाख्याच बहुतांशीं भासूं लागतात. पिढ्यान् पिढ्या डोळसपणें लोक मार्ग आक्रमीत आहेत असें दिसत नाहीं.

## युरोपीयांतील आणि आमच्यांतील फरक

डयूक ऑफ वेलिंग्टन हा या मोठ्या पदवीस जाण्यापूर्वी हिंदुस्थानांत प्रसिद्धीस आला होता. येथें ही प्रसिद्धी मिळण्यापूर्वींच एकदां त्यानें मद्रासहून बंगलोरपर्यंत प्रवास केला होता. पण हा प्रवासहि त्यानें फुकट घालविला नाहीं. या प्रवासांत असतांना टिपणें करून ठेवून परत आल्यानंतर या सर्व प्रदेशाच्या भूपृष्ठाची युद्धदृष्टीनें त्यानें माहिती लिहून काढली व ती पुस्तकरूपानें राज्यकर्त्यांच्या हवालीं केली. पुढें त्याला व इतर सेनापतींना तिचा उपयोग किती झाला असेल हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. आणि हें धोरण एकट्या वेलिंग्टनचेंच होतें असें नाहीं. इंग्रजांचा प्रत्येक गव्हर्नर, प्रत्येक सेनापति, प्रत्येक मुत्सद्दी आपले अनुभव असें लेखनिविष्ट करीत आलेला आहे. मराठे लोक कसे आहेत, त्यांचा पराक्रम काय, युद्धपद्धति कोणच्या, त्यांच्या निष्ठा कोणच्या, त्यांची आपसांत फूट कशी आहे, त्यांच्यांत बुद्धिमान् कोण, शूर कोण,— सर्व तपशील अनेकांनीं लिहिला आहे. आणि त्यामुळेंच नवीन आलेल्यांना या भूमीचें आकलन करणें फार सुलभ होत असे. गुरुत्वाकर्षण पहिल्यापासून शोधावें हा प्रसंग त्यांच्यावर येत नसे !

राष्ट्रांत जे विचारी व कर्ते पुरुष निर्माण होतात त्यांच्या विचाराचें व कर्तृत्वाचें धन ग्रंथबद्ध झालें कीं पुढील पिढीवर त्याचे संस्कार होतात व त्या पिढींत कर्ती माणसें निर्माण होतात. त्यांचें तत्त्वज्ञान पुन्हां ग्रंथबद्ध झालें कीं, तें पुढील पिढीस उपयोगी पडतें. आणि अशा रीतीनें राष्ट्राचें ज्ञानधन वाढत जाऊन त्यांतून अनेक प्रकारचीं शास्त्रें निर्माण होऊन समाज बलशाली होतो. बाराव्या तेराव्या शतकापासून युरोपांत नेमका हाच प्रकार सुरू झाला, आठदहा शतकें अंधारांत घोरत पडलेला हा भूभाग या वेळीं जागा झाला. आणि विचार करूं लागला. पोपचे अधिकार किती, राजाचे किती, ग्रंथप्रामाण्य काय म्हणून मानावें, धर्माचा अंतिम हेतु काय, जीवनांत आनंद भोगण्याचा मानवाला हक्क आहे कीं नाहीं, बायबलांतील पापाची मीमांसा खरी आहे काय, पारलौकिकाचा ऐहिकावर पगडा किती असावा, हे व या तऱ्हेचे अनंत प्रश्न लोकांच्या मनांत उद्‌भवूं लागले. आपल्याकडे हे उद्‌भवले नसतील, हें शक्य नाहीं. पण युरोपच्या पंडितांनीं व कर्त्या पुरुषांनीं सरस्वतीचें सामर्थ्य ओळखून दरवेळीं आपले विचार ग्रंथबद्ध करून ठेवले व ज्ञानधन वाढवीत नेलें, आणि येथीलांनीं तें केलें नाहीं हा मुख्य फरक आहे. मार्सिग्लिओ, विल्यम ऑफ् ओकॅम, जॉनहस्, वायाक्लिफ, पेट्रार्क, लूथर, इरॅसमस् अशा किती तरी ग्रंथकारांनीं पुढील पिढ्यांना शिकविण्याचें कार्य अव्याहत चालू ठेविलें होतें. तेराव्या शतकापासून युरोपचा जो उत्कर्ष झाला त्याचें एक प्रमुख कारण म्हणजे सरस्वतीच्या साह्यानें अमर करून ठेवलेले हे विचार, हें तत्त्वज्ञान, हें आहे. युरोपांत बुद्धिवादाचा उदय झाला. ग्रंथप्रामाण्यवादी धर्मोपदेशकांचें वर्चस्व नष्ट झालें, राष्ट्रनिष्ठा ही प्रबळ शक्ति उदयास आली आणि विज्ञान वाढीस लागून पुढें औद्योगिक क्रांति घडून आली. यांपैकीं कोणचीहि घटना हें एका व्यक्तीचें कार्य नाहीं. शेंकडों पंडित, तत्त्ववेत्ते, शास्त्रज्ञ यांचें तें कार्य आहे, आणि या पंडितांचें हें कार्य चारपांच शतकें चालू होतें व अजूनहि चालू आहे. पण या पंडितांनीं आपले विचार

लिहून ठेवले नसते तर हें कार्य घडून आलें नसतें. तेराव्या शतकांतील पंडितांच्या तत्त्वज्ञानाचा पत्ता चौदाव्या शतकांतील पंडितांना लागला नसता. त्यांना पुन्हां पायापासूनच सुरुवात करावी लागली असती. आणि दर शतकांत, दर प्रांतांत हेंच होऊन प्रत्येकाचें ज्ञान वातावरणांत विरून गेलें असतें. आणि मग त्यांतून राजकीय किंवा धार्मिक असें कोणतेंच तत्त्वज्ञान निर्माण होणें शक्य झालें नसतें.

महाराष्ट्रांत व भरतखंडांत नेमकें हेंच झालें. ऐहिक क्षेत्रांत जे विचार त्याच काळीं पाश्चात्यांच्या चित्तांत स्फुरत होते ते येथील लोकांच्या मनांत आलेच नसतील हें अशक्य आहे. मराठेशाहींत तर असे विचार उसळत होते याविषयीं वाटेल तितके पुरावे उपलब्ध आहेत. शिवछत्रपति आणि समर्थ यांनीं तर ते अमलांत आणण्याचा प्रयत्नहि केला होता. बाजीरावाच्या मनांत मस्तानीला हिंदु करून घेऊन तिच्या मुलाची मुंज करावयाची होती. माधवरावांच्या वेळीं सैन्यांतली अस्पृश्यता नष्ट करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला होता. आणि ‘ राज्य हें कोणाच्या मालकीचें नसून आपण केवळ त्याचे संरक्षक आहों, ’ हा महनीय सिद्धांत त्यांनीं सांगितला होता. रामशास्त्री, परशुरामभाऊ यांचे विधवाविवाह चालू करण्याविषयींचे प्रयत्न प्रसिद्धच आहेत. पण या तऱ्हेचे हे क्रांतिकारक विचार सरस्वतीच्या कृपेच्या अभावीं वातावरणांत विरून गेले. त्यांचें तत्त्वज्ञानांत रूपांतर झालें नाहीं. त्यांचें कोणी शास्त्र केलें नाहीं. स्वतः या पंडितांनीं किंवा त्यांच्या आसपासच्या लोकांनीं हे विचार ग्रंथबद्ध करण्याचा प्रयत्न केला असता तर दर दशकास एकांत दुसऱ्याची भर पडून या क्रांतिकारक विचारांचा एक बलशाली प्रवाह निर्माण झाला असता आणि मग त्याच्या ओघांत जुने घातकी विचार वाहून गेले असते; पण हें घडलें नाहीं. म्हणूनच शिवकालानंतरच्या मराठेशाहीला जडशक्तींच्या संघर्षाचें स्वरूप आलें.

समाज जगण्यास कोणच्यातरी एका निष्ठेची आवश्यकता असते. उत्तर मराठेशाहींत या तऱ्हेची प्रबल, बहुजनमान्य अशी निष्ठा कोणचीच

नव्हती. इंग्रज हा इंग्रजाविरुद्ध लढणार नाहीं, फ्रेंच हा फ्रेंचाविरुद्ध लढणार नाहीं अशी निष्ठा युरोपांत ठरून गेली होती. पण येथें हिंदु हिंदूविरुद्ध, मराठा मराठ्याविरुद्ध, भोसल्यांचे सेवक भोसल्यांच्या सेवकाविरुद्ध, सारखे लढत होते. दृढ अशी कोणचीच निष्ठा नव्हती, आणि याचें कारण म्हणजे राष्ट्रीय, राजकीय, सामाजिक तत्त्वज्ञानाचा अभाव हें होय.

कोणच्याहि क्षेत्रांत पंडितांनीं आपले विचार ग्रंथबद्ध केले तर त्याचा प्रभाव केवढा पडतो याचें उदाहरण महाराष्ट्राच्या इतिहासांतच सांपडतें. परमार्थ, भक्तिमार्ग, अद्वैतवेदांत याविषयीं ज्ञानेश्वरानें ग्रंथ लिहिण्याची जी परंपरा घालून दिली ती आजतागायत चालू आहे. त्यामुळें परमार्थांतले कर्म, पुनर्जन्म, आत्मा, मोक्ष, माया, सगुणनिर्गुण असले गहन विचार सुद्धां अगदीं निरक्षर शेतकऱ्यापर्यंत जाऊन पोहोंचले आहेत. ज्ञानेश्वरानें गीतेवर अठरा हजार ओंव्या लिहिल्या. पण त्या कमी वाटून दासोपंतानें त्याच गीतेवर एक लक्ष ओंव्या लिहिल्या. पण ' मराठा तेवढा मेळवावा ', ' यत्न तो देव जाणावा ', ' शक्तीनें मिळती राज्यें ', या समर्थांच्या सिद्धांताचें विवेचन करण्यासाठीं एक ओवी सुद्धां कोणी लिहिली नाहीं. जनमनावर एकादें तत्त्वज्ञान बिंबवावयाचें असलें तर त्यासाठीं केवढा विपुल ग्रंथसंभार निर्माण करावा लागतो हें मराठींतील परमार्थ-वाङ्मयाकडे पाहिलें म्हणजे कळून येतें. बाराव्या शतकापासून दरशतकांत, पुढें तर दरदशकांत आणि पुढें दरवर्षीं या विषयींचे ग्रंथ निर्माण होऊं लागले. हजारों हरदास, कीर्तनकार, पुराणिक समाजावर त्याचे संस्कार करूं लागले. आणि त्याचाच परिणाम होऊन हा भारतीय समाज इहविन्मुख होऊन पराक्रमशून्य बनला. समर्थांनीं भिन्न तत्त्वज्ञान निर्माण करण्याचा अल्पसा प्रयत्न केला. त्यामुळें महाराष्ट्रापुरती जागृति निर्माण झाली. पण समर्थांना कोणी दासोपंत न भेटल्यामुळें त्या निवृत्तीच्या ओघांत त्यांचा खरा ' दासबोध ' लुप्त होऊन गेला.

अलीकडच्या काळांत मागल्यासारखी स्थिति नाहीं हें जरी खरें

असलें तरी जी सामाजिक, राजकीय, धार्मिक क्रांति व्हावयास पाहिजे आहे, तिच्या मानानें पाहातां निर्माण झालेलें वाङ्मय अगदीं अल्प आहे. अस्पृश्यतानिवारण, मिश्रविवाह, पतितपरावर्तन, संसारप्रेम, कर्मयोग, चातुर्वर्ण्यनाश, इत्यादि ज्या सुधारणा आवश्यक आहेत त्या आपण करीत चाललों आहोंत. पण त्याचें सर्व प्रतिपादन केवळ मानव्याच्या, सहानुभूतीच्या, उदारतेच्या दृष्टीनें होत आहे. आरंभीं तसें व्हावें हें युक्तच आहे. कारण कोणच्याहि सुधारणेची पहिली प्रेरणा सहृदयतेंतूनच निर्माण होत असते. पण, हें दीर्घकाल टिकणार नाहीं. दीर्घकाल रूढ असलेल्या आचारविचारांचें तत्त्वज्ञानपूर्वक निर्मूलन झालें नाहीं तर क्रांतिकारक सुधारणा या चिरस्थायी होत नाहींत. आणि त्या दृष्टीनें विचार करतां आपल्या सामाजिक पुनर्घटनेचें तत्त्वज्ञान शास्त्रीय दृष्टीनें लिहिलें गेलेंच नाहीं असें म्हणावें लागतें.

जीवनशास्त्र, वंशशास्त्र यांचा जगांतल्या पंडितांनीं अपरिमित अभ्यास केला आहे, तो विचारांत घेऊन आपल्या जातिसंस्थेचें व चातुर्वर्ण्याचें तत्त्वज्ञानपूर्वक उन्मूलन करणें अवश्य आहे. हिंदुस्थान हें आपणांस एकराष्ट्र घडवावयाचें आहे. या तत्त्वावर सध्यां असंख्य आक्षेप येत आहेत. तेव्हां राष्ट्रनिष्ठेची महती समाजाला पटविण्यासाठीं वाङ्मयाचा वर्षाव केला पाहिजे. भांडवलशाही आहे या स्वरूपांत टिकवून धरून कोणचाच समाज टिकणार नाहीं. कामगारवर्गाचें हित हाच ध्रुवतारा कोणत्याहि समाजांच्या अग्रणींनीं पुढें ठेविला पाहिजे. या क्षेत्रांत तर वर्गविग्रह, आंतरराष्ट्रवाद, विरोधविकासवाद इत्यादि अनेक तत्त्वें प्रचलित झालीं आहेत. त्या सर्वांचा खोल अभ्यास करून पंडितांनीं समाजाला मार्गदर्शन करणारे ग्रंथ लिहिणें अवश्य आहे. लोकसत्ता, संघसत्ता याविषयीं आपण बहुतेक सिद्धांत दत्तक घेऊन चाललों आहों. त्यांचाहि शास्त्रीय अभ्यास झाला पाहिजे. विज्ञानांत आपण कांहीं प्रगति करीत आहोंत. विज्ञान मुलांना थोडें शिकवीतहि आहों. पण विज्ञाननिष्ठा निर्माण

करण्याचे अल्पहि प्रयत्न होत नाहींत. अशा रीतीनें जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत आपण क्रांतिकारक विचार करीत असलों तरी क्रांतिकारक तत्त्वज्ञान प्रतिपादन करणाऱ्या वाङ्मयाची उणीव फार आहे. आणि ती भरून निघाली नाहीं तर समाजाची आपण जी नवी घडण करूं तिला स्थैर्य येणार नाहीं.

फार पूर्वींच्या काळीं सरस्वतीच्या या सामर्थ्याचें महत्त्व पूर्वसूरींनीं जाणलें होतें आणि महाभारतांत समाजाच्या सर्व अंगोपांगांची तात्त्विक चर्चा अगदीं विपुल प्रमाणांत त्यांनीं करून ठेविली होती. संस्कृत भाषेशीं प्रत्यक्ष संबंध सुटल्यानंतर ज्या देशी भाषा निर्माण झाल्या त्यांनीं महाभारतांतील कथा व कांहीं वेदान्ती प्रकरणें यांचाच फक्त प्रचार केला. समाजरचनेविषयीं जे अत्यंत प्रगल्भ विचार त्यांत सांगितलेले आढळतात त्यांचा मागमूसहि देशी वाङ्मयांत दिसत नाहीं. त्या शतकांतील पुरुषांना नवीन विचार सुचले, त्यांनीं कांहीं प्रमाणांत ते प्रत्यक्षांतहि आणले पण वाङ्मयाचा आश्रय करून त्यांनीं ते चिरस्थायी करून ठेविले नाहींत. म्हणून नव्या काळाला अवश्य तें तत्त्वज्ञान, अवश्य तो नवा धर्म निर्माण झाला नाहीं व आपला अपकर्ष झाला. आजहि आपण तोच प्रमाद करीत आहोंत. सरस्वतीच्या सामर्थ्याचें महत्त्व आपण आकळिलें आहे असें वाटत नाहीं. आणि यामुळें आपले सामाजिक पुनर्घटनेचे प्रयत्न तितकेसे यशस्वी होत नाहींत. म्हणून महाराष्ट्रीय पंडितांना माझी आग्रहाची विनंति अशी आहे कीं त्यांनीं हें प्रचंड कार्य शिरावर घ्यावें आणि सामाजिक, राजकीय, धार्मिक, आर्थिक पुनर्घटनेचें तत्त्वज्ञान प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथांचा या भूमीवर अविरत वर्षाव करावा. तसें त्यांनीं केलें तर गेल्या पांचसहाशें वर्षांत जे संत होऊन गेले त्यांना निवृत्ति, संसारविन्मुखता, वैयक्तिक धर्म यांचा प्रसार करण्यांत जें यश आलें. तेंच यश आपल्याला मिळून संघटना, राष्ट्रनिष्ठा, विज्ञाननिष्ठा हीं नव्या धर्माचीं तत्त्वें समाजांतील अगदीं खालच्या थरापर्यंत पसरतील व पुनर्घटनेचें कार्य सुकर होईल.



साहित्यसम्राट नरसिंह चिंतामण केळकर, यांचेशीं

# चालू महत्त्वाचीं पांच प्रश्नोत्तरें

---

मराठी वाङ्मयांतील चालू महत्त्वाच्या कांहीं प्रश्नांविषयीं साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांनीं आपल्या स्वतःच्या अनुभवाचीं मतें येथें प्रकट केलीं आहेत. उदयोन्मुख पिढींतील साहित्यकारांनीं यांचा सूक्ष्म परामर्श घेणें अवश्य वाटतें.

---

प्र०—एकाद्या विशिष्ट विचारप्रणालीच्या प्रसारासाठीं हेतुपूर्वक निर्माण केलें जाणारें वाङ्मय आणि जातिवंत साहित्यिकांचें तत्कालिन परिस्थितींतील सहजस्फूर्त वाङ्मय यांपैकीं अधिक प्रभावी कोणतें ?

उ०—स्वयंस्फूर्त वाङ्मय म्हणजे जातिवंत योद्धा. उलट हेतुपूर्वक निर्माण केलेलें वाङ्मय म्हणजे भाडोत्री सैनिक ! अर्थात् भाडोत्री सैनिकाचाहि उपयोग लढण्यासाठीं होत नाहीं असें थोडेंच आहे ? तथापि चिरकालिन नांव टिकतें एकाद्या जातिवंत वीराचेंच ! तसेंच या बाबतींतहि म्हणतां येईल. विशिष्ट हेतु मनांत धरून अफाट वाङ्मय लोकांपुढें ठेवलें म्हणजे त्याचा परिणाम अवश्य व्हायचाच. आणि सहजस्फूर्त वाङ्मय हें

जातिवंत वीराप्रमाणें थोडेंच भेटायचें. तथापि मनाला चटका लावणारें कोणतें असें विचारलेंत तर तें सहजस्फूर्त वाङ्मय म्हणावें लागेल.

प्र०—वाङ्मयनिर्मितीमुळें देशांत क्रांति होते किंवा क्रांतीला सहाय्य होतें हें कितपत खरें आहे ?

उ०—खरें म्हटलें तर वाङ्मयापेक्षां व्यक्तीच्या अनुकरणानेंच अधिक कार्य होतें. उदाहरणें डोळ्यापुढें ठेवूनच सर्वसामान्य माणसें आपलीं मतें बनवितात. आणि मतें हीं हवेप्रमाणें संसर्गजन्य असल्यामुळें, इतरांचें पाहून-ऐकून मतें बनत जाणें हेंच अधिक. पंख्यानें वारा घेणारे आणि उघड्यावर बसून हवा खाणारे यांचें जें प्रमाण तेंच वाङ्मय वाचून मतें बनविणारे आणि वातावरणांत राहूनसवरून मतें बनविणारे यांत आहे. आणि वाङ्मय लिहिणारा तरी तें समाजांतील पुढाऱ्यांसाठींच—ज्यांचीं मतें पाहून इतर सामान्य लोक आपलीं मतें ठरवितात त्यांच्यासाठीं लिहित असतो. त्याचा हेतु तसा मर्यादितच असतो. आणि ही परिस्थिति हिंदुस्थानांत साक्षरतेचें प्रमाण कमी आहे म्हणून येथेंच केवळ आहे असें नव्हे, तर विलायतेंतहि सर्वत्र हाच प्रकार दिसून येईल.

प्र०—अलीकडे एकाद्यानें एकाच विषयाचा अभ्यास त्यांत परिपूर्णता येण्याइतका करावा असा प्रघात पडत चाललेला दिसतो. ही प्रथा कितपत इष्ट आहे ? एकाच विषयांत प्राविण्य मिळविण्याच्या नादांत इतर विषयांकडे पूर्ण दुर्लक्ष होऊन सर्वगामी असलेल्या प्रापंचिक इत्यादि व्यवहारांत अयशस्वी ठरण्याचा प्रसंग अशांवर येतो. याला आळा कसा घालतां येईल ?

उ०—'स्पेशॅलिस्ट' किंवा 'जनरॅलिस्ट' होणें माणसाच्या स्वभावावर अवलंबून असतें. त्यांतील अमूक आपण घडवूं असें म्हणून कांहीं तसा विशिष्ट प्रकारचा माणूस घडवितां येत नाहीं. आणि वरीलपैकीं कोणत्या एका बाबतीकडे मनाचा कल होण्यास तरुणास पदवीपरीक्षेपर्यंतचा तरी काळ अवश्य जावा लागतो. तोंपर्यंत हें ठरूंच शकत नाहीं. तोंपर्यंत पाया भरून दिलेला असतो; त्यावर पुढें इमारत रचावयाची असते. आतां उदाहरणार्थ मीच पाहाना.

माझा स्वभाव ‘ जनरॅलिस्ट ’ अनेकमार्गी आहे. एकाद्याच विषयाचा अगदीं खोल अभ्यास करून त्यांत परिपूर्णता निर्माण करून घ्यावी हें मला आवडत नाहीं. आणि त्यामुळें मी सर्व विषयांवर लिहिलें. अर्थात् त्या विषयाचें परिपूर्ण ज्ञान मिळविण्याच्या खटाटोपांत मी पडलों नाहीं. एकाद्या तळ्यांत पाण्यावर फेरी मारून कमळें तोडून आणण्याचें कौशल्य असणारा पोहणारा ‘ जनरॅलिस्ट ’ कोणी असेल, तर पाण्यांत खोल बुडी मारून मोती काढणारा पाणबुड्या ‘ स्पेशॅलिस्ट ’ दुसरा एकादा असेल. पण दोघांचाहि उपयोग आपापल्या परीनें आहेच. एकाद्या विषयांतला गाढा ‘ स्पेशॅलिस्ट ’ पंडित कांहीं व्यासपीठावर येऊन व्याख्यान देण्यास उपयोगीं पडत नाहीं. तर त्या ठिकाणीं अनेक विषयांची माहिती असणारा ‘ जनरॅलिस्ट ’ बहुश्रुतच आणावा लागतो.

**प्र०**—गुण आणि संख्या अशा दोन परिमाणांनीं साहित्याचें मूल्यमापन करावयाचें ठरविलें तर अलीकडच्या मराठी वाङ्मयांत संख्या पुष्कळ वाढली असून, त्या मानानें गुणांची पातळी मात्र खालीं गेली आहे, असें निदान महाराष्ट्रांत तरी दिसतें. ही परिस्थिति पालटवितां येणें शक्य आहे काय ?

**उ०**—तुलनेच्या दृष्टीनें पाहिलें तर अलीकडे वाङ्मय ग्रंथांची संख्या वाढली असल्यामुळें पूर्वीं संख्या व गुण यांचें जें प्रमाण होतें तें प्रमाण कमी झालें आहे इतकेंच. होते ते गुण कांहीं कमी झाले आहेत असें मात्र नव्हे. आणि तसा कांहीं आग्रहहि धरून चालणार नाहीं. कारण लेखक निरनिराळ्या कारणांनीं लिहित असतो. कोणी कर्तव्य म्हणून लिहिल, तर कोणी अडली मरज म्हणून लिहिल, तर कोणी अधिक किंवा दूरच्या लाभाच्या दृष्टीनेंहि आपल्या वाङ्मयकृतींत भर घालीत जाईल. तसेंच कांहीं लेखक हौसेनेंहि लिहिणारे असतातच. तेव्हां त्यांनीं फक्त उत्तमच लिहावें असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. अर्थात् एकदां एकादा लेखक चांगला ठरला म्हणजे त्याच्या नांवावर वाचकांची कित्येकदां फसवणूकहि होत नाहीं असें नाहीं. तरीपण त्याची

जबाबदारी कांहीं त्या लेखकावर टाकतां येणार नाहीं. आतां मींच चार नाटकें लिहिलीं–त्यांतलें पहिलें हौस म्हणून लिहिलें, तर पुढचीं तीन मागणी आली म्हणून लिहिलीं. पण त्यांत पहिलें हौसेनें लिहिलेलेंच सरस ठरलें.

**प्र०**—रामायण-महाभारतासारखे ग्रंथ यापुढें कधीं निर्माण होतील काय?

**उ०**—आजहि उद्यां रामायण–महाभारतासारखे महाग्रंथ निर्माण होऊं शकणारच नाहींत अशी निराशा मला वाटत नाहीं. केवळ जातिवंत लेखकामुळेंच असे मोठे ग्रंथ निर्माण होतात असें नव्हे; तर परिस्थितींतील वास्तववादित्वहि लेखकाच्या ठिकाणीं तशी स्फूर्ति उत्पन्न करूं शकतें. आणि मग तो लेखक हेतुपूर्वक वाङ्मय लिहितो. टिळकांनीं जें एवढें 'गीतारहस्या'चें पुस्तक लिहिलें तें हेतुपुरस्सरच लिहिलें. आज सुद्धां प्रयत्न केला तर भारत निर्माण होईल.

—:०:—

प्राचार्य गोपाळ रामचंद्र परांजपे, एम्. एस्सी, ए. आय्., आय्. एस्.,
एफ्. एन्. आय्., जे. पी.,
आय्. ई. एस्. ( निवृत्त ).

# विज्ञानाची उपासना शास्त्रयुक्तच हवी

आपल्या देशातहि शैक्षणिक व औद्योगिक क्षेत्रांत आधुनिक शास्त्रीय संशोधनाच्या मार्गानें सुधारणा घडवून आणण्याचे प्रयत्न चाललेले आहेत. हे प्रयत्न—मग ते सरकारनियोजित असोत किंवा लोकप्रणित असोत—योजनापूर्वक, काळजीपूर्वक व मनःपूर्वक झाले तरच त्यांतून कांहीं फळ पदरांत पडेल असें मोठें आवर्जून या लेखांत प्रतिपादिलेलें आहे.

## शास्त्रीय प्रगति अखंड चालू असते.

नुकत्याच संपलेल्या महायुद्धांत शास्त्राची जेवढी प्रगति झाली व त्याचें महत्त्व लोकांच्या निदर्शनास आलें तेवढें आतांपर्यंत कधींच आलें नव्हतें. शास्त्राची प्रगति एकसारखीच चालूं असते. युद्धप्रसंगीं जरी एका किंवा दुसऱ्या शोधामुळें चारदोन शास्त्रज्ञांच्या नांवांचा व प्रयत्नांचा उल्लेख करण्यांत येत असला तरी त्या गोष्टी त्यांना कांहीं एकाएकीं साध्य झालेल्या नसतात

किंवा त्या अनपेक्षितपणें त्यांच्या हातांत येऊन पडलेल्या नसतात. शास्त्रांतील उपपत्ति व प्रयोग या दोन्ही अंगांची वाढ सतत चालू असते आणि त्यामुळेंच कधींकाळीं एकाद्या शास्त्रज्ञाला अमुक एक गोष्ट अवगत झाली असेल असें दिसून आलें तर ती वस्तुतः मागील सर्व ज्ञानाच्या आधारावर उभारलेली असल्यामुळेंच तशी शक्य झाली हें तत्त्व दृष्टीआड करून चालणार नाहीं. एक उपपत्ति दुसऱ्या उपपत्तीवर उभारलेली असते, हा शास्त्रांतील नियम आहे. त्याचप्रमाणें एक प्रयोग नेहमीं दुसऱ्या प्रयोगावर आधारलेला असतो. याचाच परिणाम असा होतो कीं कोणतीहि नवी कल्पना किंवा कोणताहि नवा शोध हा संपूर्णपणें नवा अथवा अभूतपूर्व नसून तो अचानकपणें कोणा शास्त्रज्ञाला मिळालेला नसतो. कांहीं तत्त्वें अनुभवानें प्रस्थापित झालेलीं असतात आणि अनुभव जसजसा वाढत जातो तसतशीं पहिलीं तत्त्वें जास्त बळकट होतात अथवा खोडून काढलीं जातात.

या महायुद्धांत गाजलेलें परमाणू-शक्तीचें अस्त्रच घ्या. त्यासंबंधींच बहुतेक माहिती किमान-पद्धतींत १९०५ सालापासून म्हणजे आईनस्टाईन नांवाच्या शास्त्रज्ञानें ' वस्तु आणि शक्ति ' यांची एकरूपता ज्या नियमानें सिद्ध केली तेव्हांपासून झालेली होती. त्यानंतर १९११ सालीं रुदरफोर्ड यांनीं परमाणू-रचनेचे नियम बसविले तेव्हांपासून तीच माहिती जास्त सूक्ष्म, जास्त दृढ झाली ही गोष्ट प्रसिद्ध आहे. त्यानंतर त्याच्याहि पुढें १९३८ सालीं जेव्हां परमाणू फुटलेला प्रत्यक्ष प्रयोगांत दिसून आला तेव्हां ओटो हान ( नुकतेंच यांना नोबेल प्राइज मिळालें आहे. ) यांना त्यांत अजब असें कांहींच वाटलें नव्हतें. तरीसुद्धां त्या वेळीं परमाणू इच्छेनुरूप कसा फोडतां येईल याबद्दल फारशी माहिती उपलब्ध नव्हती.

ज्या वेळीं प्रथम परमाणूंची माहिती झाली त्या वेळीं परमाणूंतील प्रचंड शक्तीची किंवा त्या परमाणूंचा पुढेंमागें स्फोटक द्रव्य म्हणून उपयोग

करतां येईल अशी कल्पना खास नव्हती; आणि अशी कल्पना असणें शक्यहि नव्हतें. कारण त्या वेळीं उपलब्ध असलेली परमाणूसंबंधींची माहिती आतां मिळालेल्या माहितीशीं तुलना करतां अगदींच तुटपुंजी व अपुरी होती.

संशोधन वाढत गेलें. नवीन उपकरणें उत्पन्न झालीं. शास्त्रज्ञांची संशोधनशक्ति वाढीस लागली. ज्या कल्पना प्रारंभीं अगदीं अशक्य कोटींतल्या भासत होत्या त्या आतां शक्यच नव्हे तर सहजासहजीं व्यवहारांत वापरतां येण्याजोग्या होऊं लागल्या आहेत. उदाहरणें देण्याची आवश्यकता नाहीं, तरी सायक्लोट्रोन ह्या यंत्राचा जर शोध लागला नसता तर कणांचा वेग बेसुमार वाढविण्याचें साधन इतक्या लवकर आपल्या आटोक्यांत आलें नसतें व त्यामुळें कदाचित् 'ॲटम बॉंब' (परमाणू अस्त्र) निर्माणहि झाला नसता.

## शास्त्रीय प्रगति व आपलें परावलंबन

शास्त्राची आजची प्रगति फारच विलक्षण आहे. पण ती तशी राहिली पाहिजे आणि ती आपण चालू ठेविली पाहिजे. शास्त्रापासून फायदे आहेत, ही गोष्ट निःसंशय आहे. परंतु आपण स्वतः आपल्या अकलेनें तें शास्त्रीय ज्ञान आपल्या आटोक्यांत आणून मिळविलेलें पाहिजे. तरच आपल्याला त्यांचा पुरा फायदा होऊं शकेल, नाहींतर नुसतेंच परावलंबन !

गोड्या तेलाचे दिवे, मेणबत्ती, केरोसिनचे दिवे, गॅसचे दिवे आणि विजेचे दिवे हे शास्त्रीय सुधारणेमुळें झालेले प्रकाश-साधनांचे टप्पे आहेत. आपण त्यांचा बहुतेकांचा अनुभव घेतला असल्यामुळें ते आपल्या चांगले माहितीचे झाले आहेत. आपणाला त्यांतला खरा फायदा फारच थोडा होतो. या दिव्यांच्या बाबतींतील आपल्या परावलंबी जीवनाचा अनुभव आपण अद्यापि घेतच आहोंत. सर्व गोष्टींत आपण परदेशांतील शास्त्रज्ञांनीं मिळविलेल्या ज्ञानावर व तेथील कारखानदारांनीं उत्पन्न केलेल्या सुखसोयींवर

अवलंबून असल्यामुळें शांततेच्या काळीं आपल्याला ज्या सोयी म्हणून वाटत होत्या त्याच आतां कष्टमय अडचणी वाटूं लागल्या आहेत.

दुसरें उदाहरण. हातगाडी, बैलगाडी, घोडागाडी, आगगाडी, सायकल व मोटारगाडी—वाटल्यास त्यांत विमानाचाहि समावेश करावा-अशी आधुनिक सुधारणेची व वाढत्या संस्कृतीची परंपरा आहे. पहिल्यापेक्षां जास्त सुखाचें साधन टप्प्याटप्प्यानें आपले हातांत आलें म्हणून आपण आनंदांत होतों व त्यामुळें आपला असा समज होई कीं आपल्या देशाची सुस्थिति एकसारखी वाढत आहे. जास्त स्पष्टीकरण करण्याची आवश्यकता नाहीं. परंतु या महायुद्धांत आपल्या सर्व सुखाच्या कल्पनांना व आकांक्षांना एकदम हरताळ फांसला गेला. पहिल्या उदाहरणांत जें कारण दाखविलें तेंच कारण याहि उदाहरणांत लागू पडतें. शास्त्रीय ज्ञानांत जें आपलें परावलंबन तेंच औद्योगिक उत्पत्तींतहि. वाहनाच्या बाबतींत याचा परिणाम असा झालेला दिसतो कीं शेवटीं रिक्षा-गाड्या येऊन संस्कृतीची गुलामगिरीकडे दिशाभूल झाली; मग त्या रिक्षा माणसांनीं ओढलेल्या असोत किंवा सायकलद्वारां खेंचलेल्या असोत. यांत सुधारणा म्हणण्यासारखें कांहींच नसून ही शुद्ध वाढती गुलामगिरीच आहे. खरोखरी मनुष्याला त्याची शक्ति अशा हीन कामीं खर्च करावी लागूं नये हा तर शास्त्रीय ज्ञानाचा मुख्य उद्देश. पण आपली सध्यांची संस्कृति मात्र तो उद्देश साफ झुगारून देत असून त्यास आपण निमूटपणें संमति देत आहों !

शास्त्रीय सुधारणांमुळें यांत्रिक शक्तीचा जो फायदा आपणास मिळतो व त्यापासून जें सुख लाभतें त्याचा जर संपूर्णपणें उपभोग घ्यावयाचा असेल तर तें शास्त्रीय ज्ञान आपल्या देशांतच वाढीला लागलें पाहिजे व सर्व प्रकारची शास्त्रीय ज्ञानावर उभारलेली यंत्र-निर्मिति आपल्या देशांतच झाली पाहिजे. नाहीं तर तें ज्ञान, तीं यंत्रें ( साधनें ) आपणाला नीटपणें लाभणार नाहींत यांत संशय नाहीं.

आपल्या देशांत शास्त्रीय ज्ञानाची पुष्कळ प्रगति झालेली आहे, परंतु तेवढ्याचा देशांतील औद्योगिक वाढीला फारसा उपयोग होणार नाहीं. एकदोन ठळक नांवें घेतलीं म्हणजे आपलें समाधान होतें. जगदीशचन्द्र बोस, प्रफुल्लचन्द्र रॉय, चन्द्रशेखर रमण किंवा होमी भाभा. हे पुरुष कितीहि विद्वान असले व त्यांचें संशोधन जगांत कितीहि महत्त्वाचें ठरलें तरी केवळ त्यांची नुसती मूर्तिपूजा करून भागणार नाहीं. हिंदुस्थानाच्या प्रगतीला त्या दर्जाचे शेंकडों विद्वानहि पुरे पडणार नाहींत. त्याशिवाय त्यांच्या हाताखालीं काम करण्यालायक अशीं हजारों माणसें निर्माण झालीं पाहिजेत.

शास्त्रीय ज्ञानाची वाढ फार वेगानें घडवून आणली पाहिजे ही गोष्ट निर्विवाद आहे. त्यासाठीं संघटित प्रयत्न झाले पाहिजेत. एकेका माणसानें आपल्या प्रयोगशाळेंत स्वतःला रुचेल तसे प्रयोग करीत राहाण्याचे दिवस आतां उरले नाहींत. फ्रँकलीनला वीज सांपडली. फॅरेडेनें विजेचें उत्पादक-यंत्र केलें. एडिसननें ग्रामोफोन बनविला. अशा तऱ्हेचे प्रयोग करणाराला शास्त्रीय वातावरणांत फार महत्त्व येई. त्या वेळीं कदाचित् परिस्थितिच तशी असेल. परंतु आज मात्र शास्त्रीय ज्ञान मिळविणें आणि संशोधन करणें हें फार गुंतागुंतीचें झालेलें आहे व त्यामुळें तें काम अगदीं एकटच्या-दुकटच्याला झेंपण्यासारखें राहिलेलें नाहीं.

प्राचीन काळीं सर्व शास्त्रें बाल्यावस्थेंत होतीं. त्या वेळीं फार थोडे सृष्टिनियम परिचित झालेले होते. कोणाहि नेटानें प्रयत्न करणाऱ्या विद्वानाला कोणच्याहि क्षेत्रांत स्वतंत्रपणें काम करण्यास वाव मिळे. व त्या प्रयत्नांचें त्याला भरपूर यशहि प्राप्त होई. आजकाल परिस्थिति निराळी आहे. अगदींच एकादा शास्त्रज्ञ एकलकोंडेपणानें संशोधन करूं म्हणेल तर तें त्याला फारसें शक्य होत नाहीं. ज्याच्या अंगांत धमक असेल त्यानें अद्यापिहि तसें करण्यास हरकत नाहीं; परंतु संघटित कार्य केल्यास यश मिळण्याचा एकंदर संभव जास्त असतो.

आतांपर्यंतच्या शास्त्रीय ज्ञानाचा सांठा इतका मोठा व विस्तीर्ण आहे कीं त्याचा सर्व शास्त्रज्ञांनीं जुटीनें संशोधन करण्यांत उपयोग करावा हें निःसंशय जास्त हितकर ठरेल. या दृष्टीनें, अगदीं अलीकडचा प्रयत्न म्हणजे अमेरिकेनें व इंग्लंडनें 'ॲटम बॉम्ब' निर्माण करण्याकरितां कित्येक शास्त्रज्ञ एकत्र करून मोठा संघटित व यशस्वी प्रयत्न केला तो होय.

## शास्त्रीय शिक्षण हें एककल्ली नसावें

प्रगति दोन प्रकारांनीं करतां येण्यासारखी असते. एकाद्या माणसाला शिक्षण व अनुभव घेऊन कोणत्याहि एका क्षेत्रांत प्राविण्य मिळवितां येईल. स्थापत्यशास्त्रज्ञ, रसायनज्ञ, पदार्थविज्ञानी, प्राणिशास्त्रज्ञ वगैरेपैकीं कोणीतरी एक त्याला होतां येईल. सर्व शास्त्रांत त्याला सूक्ष्म ज्ञान मिळवितां येण्यासारखें असलें तरी तें सर्व मिळवून व एकाच वेळीं सर्व शास्त्रांत अधिकारी म्हणून गणला जाणें इतकी लायकी त्याच्यांत उत्पन्न होईल ही गोष्ट अशक्यच वाटते. याच्या उलट एका शास्त्रांतील जाणत्या माणसाला दुसऱ्या शास्त्रांतील पारंगत माणसाचा वेळोवेळीं सल्ला घेऊन कोणतींहि अवघड प्रमेयें सोडवितां येतील. जी गोष्ट एकाला शक्य नसते ती निरनिराळ्या चार विषयांत पारंगत असलेल्या माणसांना अशक्य राहाण्याचा संभव अगदीं कमी. ह्या नियमानुसार शैक्षणिक प्रगतीला दुसरा मार्ग जास्त सोयीचा पडेल.

शास्त्रीय शिक्षण व शास्त्रीय ज्ञानावर उभारलेले धंदे वर दर्शविलेल्या दुसऱ्या मार्गावरच आधारलेले असावेत असें वाटतें. ही गोष्ट जर मान्य झाली तर शिक्षणक्रम कसा असावा याचीहि कल्पना येऊं शकेल.

शास्त्रीय शिक्षण अगदीं विशाल पायावर उभारलेलें असावें; म्हणजे एक शास्त्र जाणणाऱ्या माणसाला दुसऱ्या शास्त्रांतील अधिकारी माणसाशीं समंजसपणें विचारविनिमय करतां आला पाहिजे. आपल्याकडील डॉक्टर लोकांना ( वैद्यांना ) रसायनशास्त्राची, वनस्पतीशास्त्राची जरुरी भासते. त्यांना

हीं सर्व शास्त्रें कांहीं एका मर्यादेपर्यंत अवगत असतात. परतु ते त्या त्या शास्त्रांत प्रवीण समजले जात नाहींत. आपल्याकडील शिक्षणक्रम नवीन आंखला जाणार आहे अशा वेळीं शास्त्रांतील बहुतेक अंगें प्रत्येक विद्यार्थ्याला माहिती होतील अशी तयारी ठेविली पाहिजे. अलीकडे एकानें एकाच विषयांत पारंगत व्हावें व त्यासाठीं फक्त एकाच विषयाचें अध्ययन करावें अशी प्रथा पडत चाललेली आहे. आणि त्यामुळें त्याचें इतर विषयांतील अज्ञान त्याला वेळोवेळीं अडतें. शिक्षणांत सुधारणा घडवून आणणाऱ्यांनीं व पुढील शास्त्रीय शिक्षणाची रूपरेखा तयार करणारांनीं या मुद्याकडे लक्ष ठेविलें तर फार उपयुक्त ठरेल.

## भारतांतील उपयुक्त संस्था

प्रत्येक शास्त्रविशारदाला आपलीं स्वतःचीं उपकरणीं तयार करण्याचें शिक्षण व अनुभव अवश्य मिळावयाला पाहिजे. नाहींतर तें ज्ञान निरोपयोगी ठरण्याची वेळ येते. किंबहुना त्याच्या प्रगतिसहि अटकाव होतो. गेल्या महायुद्धाच्या वेळीं एका शास्त्रीय खात्यानें दर्शविलेली समयसूचकता व कार्यक्षमता अप्रतिम होती. त्या खात्याचें नांव ' इंडियन मिटिऑरॉलॉजिकल डिपार्टमेंट '. हवामान निश्चित करणें व त्यासंबंधींची सर्व माहिती उपलब्ध करून देणें हीं त्या खात्याचीं मुख्य कामें. आज हवा कशी आहे, वादळ केव्हां होईल, पाऊस केव्हां व कितपत पडेल, वारे कसे सुटतील, उष्णमानांत काय काय फरक पडतील हें ठरविण्याचें व त्याबद्दल अनुभवानें थोडेंबहुत आगाऊ भविष्य वर्तविण्याचें अशीं जोखमीचीं दोन कामें त्या खात्यामार्फत सदोदित होत असतात. युद्धप्रसंगीं विमान-वाहतुकीला चालू व भविष्यकाळांतील हवामानाची बिनचूक माहिती असावी लागते. त्यासाठीं हवामान खात्याच्या प्रयोगशाळेंत वायूनें भरलेले फुगे हवेंत उंचावर सोडण्यांत येतात त्या फुग्यांत उष्णमापक, आर्द्रतामापक, वायुभारमापक आणि कालमापक अशीं चार सूक्ष्म यंत्रें

बसविलेलीं असतात. व त्यांत काय काय दर्शविलें जातें तें ठराविक कालांतरानें फुग्यांतच बसविलेल्या बिनतारीच्या विद्युत्प्रेषकांतून संदेशद्वारां कळविलें जातें. सांगण्याचा मुद्दा एवढाच कीं एकंदर यंत्रसामुग्री इतकी उत्कृष्ट, सूक्ष्म आणि गुंतागुंतीची असते त्यांत शास्त्रज्ञाच्या कल्पकतेची व कारागिराच्या यंत्रकौशल्याची कमाल झालेली दिसते. ही सर्व यंत्रसामुग्री हिंदुस्थानांतील हिंदी शास्त्रज्ञांनीं संशोधन करून निश्चित केलेली व हिंदुस्थानांतील हिंदी कारागिरांनीं हिंदुस्थानांत तयार केलेली असते. केवळ असें होतें म्हणूनच हवामान खात्याला आपलें उपयुक्त काम अखंडपणें चालू ठेवणें शक्य झालें. नाहींतर युद्धप्रसंगीं सहज वाटणाऱ्या निरनिराळ्या सबबी पुढें करून तें केव्हांच बंद पडलें असतें! युद्ध जिंकण्यास हिंदुस्थानांतील हवामान-खात्याचा किती उपयोग झाला याची चर्चा येथें करण्यासारखी नाहीं. परंतु जर यंत्रसामुग्रीच्या अभावीं हवामान खात्याला वर दर्शविलेल्या गोष्टी खरोखरच करतां आल्या नसत्या तर आपल्या भारतीय शास्त्रीय प्रगतीवर तो एक मोठा कलंक ठरला असता. याच्या उलट हिंदुस्थानांतील इतर शास्त्रीय संस्थांची परिस्थिति दिसून आली. बीं-बियाणें मिळत नाहीं म्हणून बटाटे पुरवितां आले नाहीत. चिंकोनाची लागवड नाही म्हणून क्विनिन अपुरें पडलें. हिंदुस्थानांतील रासायनिक प्रयोगशाळांची घेतां येईल तेवढी मदत घेतली नाहीं म्हणून कित्येक वैद्यकीय रासायनिक द्रव्यें मिळूं शकलीं नाहींत. गुरांची जोपासना झाली नाहीं म्हणून दूध अपुरें पडलें. कापडाची गैरव्यवस्था अद्यापि चालूच आहे. जंगलें उध्वस्त झालीं त्यामुळें इमारती लांकूड दोन पिढ्या मिळणार नाहीं व जंगलांच्या अभावीं पावसाचें मान कमी होण्याचा भयंकर संभव आहे.

शास्त्रीय ज्ञानाची खरी उपयुक्तता व शास्त्रीय संस्थांची प्रगति अशा अडीअडचणीच्या वेळींच पणाला लावतां येते. आणि त्या वेळीं जर त्या यशस्वी ठरल्या तर तिची उपयुक्तता खरी. नाहींतर त्या संस्था आणि ती प्रगति हीं नुसतीं देखाव्याचींच आहेत असें समजावें लागतें.

## शास्त्रीय उपकरणांची वाढ म्हणजे प्रगति नव्हे !

शास्त्रीय ज्ञान ही देशाची खरी संपत्ति आहे. हा सांठा कधींच न आटणारा असतो. कधीं काळीं देशांतील कोळसा संपेल, पेट्रोल संपेल, कदाचित युरेनियम सुद्धां मिळेनासा होईल. परंतु शास्त्रीय ज्ञानाचा झरा जिवंत ठेविला तर तो कोणत्याहि देशाला, केव्हांहि आणि कसलीहि उणीव भासूं देणार नाहीं. गेल्या महायुद्धापूर्वीं आणि महायुद्धांत जे निरनिराळे बदली पदार्थ वापरण्यांत आले त्यावरून ही गोष्ट पूर्णपणें सिद्ध झालेली आहे.

अर्थात नुसत्या शास्त्रीय ज्ञानानें सर्व गोष्टी शक्य होत नाहींत. त्याचा उपयोग करून घेणारीं योजक माणसेंहि असावी लागतात. आणि त्यांमध्यें सरकार आणि आज उद्योगधंदे ज्यांच्या हातांत आहेत अशा सर्वांचा समावेश होतो.

आपल्याकडे आजकाल शास्त्रीय संशोधन बरेंच होऊं लागलें आहे. परंतु तें अगदींच एककली असतें व त्याचा व्यवहाराशीं फार थोडा सबंध आहे, असा भास होतो. त्याशिवाय अशा शास्त्रीय संशोधनाच्या जागा सबंध हिंदुस्थानाच्या मानानें अगदीं थोड्या म्हणजे एका हाताच्या बोटावर मोजण्याइतक्या आहेत. आणि त्या आहेत त्याच दुःस्थितींत—द्रव्यसहाय्य आणि सहानुभूति यांच्या बाबतींत — ठेविल्या गेल्या तर सबंध हिंदुस्थानाला अवश्य असणारी शास्त्रीय वाढ किती क्षुल्लक प्रमाणांत होईल याची आपणाला नीटशी कल्पनाहि करतां येणें शक्य नाहीं. आपणांतील पुष्कळ समंजस माणसांची मनःस्थिति फार विलक्षण झालेली दिसते. भरीव कोणचें आणि पोकळ कोणचें याची नीट प्रकारें छाननी केली जात नाहीं. कोणचींहि नवीन शास्त्रीय उपकरणें किंवा शास्त्रीय ज्ञानांतून निघालेला एकादा सिद्धांत आपणाला उपलब्ध झाला तर आपण एकदम हुरळून जातों. आपणाला वाटूं लागतें कीं आपली शास्त्रीय प्रगति जगांतील इतर देशांप्रमाणेंच जोरानें चालूं आहे.

कोणचीहि गोष्ट नुसती वापरणें व ती स्वतःची स्वतःला तयार करतां येणें यांत फार फरक आहे. त्यासंबंधीं अनेक उदाहरणें देतां येतील. आतां हा ट्रॅक्टर पाहा ! ट्रॅक्टर म्हणजे जणुं शेतकामांतील सुधारणेचें शिखर. हिंदुस्थानांत नुकतेच शेंकडोंशें ट्रॅक्टर आणविलेले आहेत, असें आपण वर्तमानपत्रांत वाचतों. परंतु त्यावरून लगेच आपल्या देशांत शेती-सुधारणा झाली अशी कोणी कल्पना करून घेऊं नये. कारण, त्या ट्रॅक्टरना लागणारीं कित्येक आवश्यक उपकरणें ( स्पेअर पार्टस् ) अद्यापि येथें आलेले नाहींत. ते विलायतेंतल्या देशांतून लवकर मिळण्याचा संभव नाहीं असेंहि वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेलें आहे. एवढ्याच एका उदाहरणावरून ट्रॅक्टररूपी शास्त्रीय सुधारणेचा व हिंदुस्थानामधील शेतकामांतील त्याच्या उपयुक्ततेचा अंदाज करतां येईल. बरें, ट्रॅक्टर सुरू झाले तरा ते नेहेमीं चालविणार कोण ? त्यांची दुरुस्ती कोण करणार ? आणि ते चालविण्याच्या लायकीची विस्तीर्ण शेती आहे कोणाकडे ? मुळांतच जेथें अज्ञान व दारिद्य आहे तेथें या सुधारणांचा तरी उपयोग काय ? दुसरें उदाहरण ' पेनिसिलिन 'चें. हें औषध उत्कृष्ट आहे. आपल्याकडे कित्येक असाध्य दुखण्यांतून तें वापरण्यांतहि आलेलें आहे. परंतु महर्घतेमुळें व दुर्मिळतेमुळें त्याचा आपणाला व्हावा तसा अद्यापि उपयोग करून घेतां येत नाहीं. हिंदुस्थानांतील कित्येक शास्त्रीय प्रयोगशाळांतून ' पेनिसिलिन ' तयार केल्याचेंहि ऐकू येतें; परंतु हवी तेवढी उत्पत्ति सुरू नसल्याकारणानें दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहाण्याखेरीज इलाज नाहीं.

डी. डी. टी. या जंतुनाशक द्रव्याची हीच अवस्था आहे. पदार्थ उत्तम आहे. हिंदुस्थानांतील प्रयोगशाळेंत करण्यासारखाहि आहे, असें सांगतात. रासायनिक खतांची साधी गोष्टहि अशीच आहे. हीं सर्व खतें इकडे करतां येण्यासारखीं आहेत. आणि आपल्याकडे जेथें तीं करण्यांत येतात तेथें त्या बाबतींत अगदीं उत्तम अनुभव आलेला आहे. परंतु हिंदुस्थानांतील

शेतीवाढीच्या दृष्टीनें आवश्यक तेवढी शास्त्रीय सुधारणा घडवून आणण्याच्या मार्गांतील असंख्य अडचणी अजून कमी झालेल्या दिसत नाहींत.

## शास्त्रीय प्रगतीच्या दिशा

शास्त्रांचा व शास्त्रीय ज्ञानाचा कसा पुरेपूर उपयोग करून घ्यावयाचा याबद्दल जोंपर्यंत सरकाराची किंवा उद्योगधंदे ज्यांच्या हातांत आहेत त्यांची एकजूट नाहीं व तयारी झालेली नाहीं तोंपर्यंत फारशी आशा नाहीं. या अडचणींतून सुटका करून घ्यावयाची म्हणजे निदान पक्षीं खालील गोष्टींकडे लक्ष पुरविलें जावें अशी विनंती आहे.

अस्तित्वांत असलेल्या विश्वविद्यालयांत शास्त्रीय ज्ञानाचीं नवीं दालनें उघडलीं पाहिजेत व त्यांत संशोधनाला जास्त महत्त्व दिलें पाहिजे. ज्या शास्त्रीय शाखांचा आपल्या विश्वविद्यालयीन संस्थांमध्यें समावेश झालेला नाहीं त्यांचा झपाट्यानें समावेश करून घेण्याचे प्रयत्न झाले पाहिजेत. उदाहरणार्थ, भूगर्भशास्त्र, धातुशास्त्र, वैमानिकशास्त्र, नौकानयनशास्त्र इत्यादि.

वैयक्तिक संशोधनाकडेहि दुर्लक्ष करून भागणार नाहीं. कांहीं संशोधन अमुक ठिकाणींच होतें, तें विश्वविद्यालयाच्या किंवा इतर शास्त्रीय संस्थांच्या कक्षेबाहेर आहे असे कृत्रिम भेदभाव करून त्या संशोधनाची उपेक्षा करून चालणार नाहीं. जेथें जेथें संशोधन-कार्य सुरू असेल व जेथें जेथें काम करणारी लायक मंडळी हौसेनें झटत असतील तेथें तेथें त्यांना सर्व प्रकारच्या सोयी करून देऊन इतर प्रकारेंहि सहाय्य करण्यास सरकारानें व उद्योगधंद्यांतील पुढारी मंडळींनीं तत्पर असलें पाहिजे.

कोणच्याहि संशोधनाचा औद्योगिक प्रगतीसाठीं कसा उपयोग करून घेतां येईल याकडे अधिकारी वर्गानें सदोदित लक्ष पुरविलें पाहिजे. मुख्यतः ही जबाबदारी देशांतील सरकारावरच पडते. कारण भिन्न भिन्न ठिकाणीं व भिन्न भिन्न परिस्थितींत झालेलीं शास्त्रीय संशोधनें एकत्र करण्याची व त्यांचा

योग्य तो उपयोग करून घेण्याची शक्ति — इच्छा असल्यास — सरकाराच्या अंगांतच असूं शकते.

## शास्त्रीय प्रगतीसाठीं होणारे प्रयत्न

अन्नाचा तुटवडा पडला म्हणून 'ग्रो मोअर फुड' नांवाचा प्रयत्न चार दोन शोभेच्या बागांत चालूं ठेवणें आणि दुधाचा पुरवठा होत नाहीं म्हणून परदेशांतून निःसत्त्व ( स्कीम्ड ) दुधाची पूड आणवून पुरविण्याची खटपट करणें इत्यादि प्रयत्न वरवर पाहातां जरी शास्त्रीय वाटले तरी त्यांची येथें त्या दृष्टीनें चर्चा करण्याची आवश्यकता नाहीं. कारण हे सर्व प्रयत्न तत्त्वतः नुकसानकारकच आहेत. तहान लागल्यावर विहिरी खणून पाहाण्याइतकेंसुद्धां त्या प्रयत्नांना यश येण्याचा संभव नाहीं. कारण एकदां खणलेल्या विहिरी मुद्दाम बुजविल्या गेल्या नाहींत तर त्या — निदान आपल्या देशांत तरी — कायमच्या तशाच राहाण्याची शक्यता शिल्लक उरते. या किंवा असल्या प्रकारच्या विलक्षण आणि धरसोडीच्या प्रयत्नांचा देशाला कायमचा फायदा कितपत होईल याबद्दल जरी दुमत असलें तरी ते प्रयत्न जोंपर्यंत चालूं आहेत व जनतेची हलाखीची स्थिति जास्त जास्तच खालावत चाललेली आहे तोंपर्यंत पुष्कळ समंजस माणसांची निष्कारण दिशाभूल होण्याचा संभव मात्र जास्तच दिसतो. अर्थात, मूलभूत व चिरकाल टिकणाऱ्या सुधारणा घडवून आणण्याकडे पुढारी वर्गाची दृष्टि तोंपर्यंत एकसारखी वेधलेली राहाणार नाही. असो.

आपल्या देशांतील शैक्षणिक व औद्योगिक क्षेत्रांत आधुनिक शास्त्रीय संशोधनाच्या सहाय्यानें सुधारणा घडवून आणल्या पाहिजेत एवढी गोष्ट साधारणपणें मान्य झाल्यासारखी वाटते. त्या दिशेनें सरकाराचे व औद्योगिक क्षेत्रांतील पुढारी माणसांचे अनेक प्रयोग चालूं आहेत. वर वर्णन केलेल्या प्रयत्नाना यश येण्याची जरी वानवा असली तरी कांहीं चांगले प्रयत्न होत असून ते यशस्वी होण्यासारखे आहेत. आतां ते तसे यशस्वी होण्यासाठीं त्यांची

आंखणीहि करणें आणि त्यांना मूर्त स्वरूप देणें या गोष्टी फार काळजीपूर्वक व मनापासून करावयास पाहिजेत. तसें न झालें तर मागच्या प्रयत्नांप्रमाणेंच याहि बाबतीत आपलें दुर्दैव पुन्हां निःसंशय आड येईल!

सध्यां नवीन आंखलेल्या आणि चालूं केलेल्या कांहीं प्रयत्नांचा येथें उल्लेख करणें अवश्य आहे.

## ( अ ) शास्त्रीय मनुष्यबळ वाढविणें

सर षण्मुखम् चेट्टी यांनीं गेल्या वर्षीं सूक्ष्म चौकशीअंतीं हिंदुस्थान सरकारामार्फत शास्त्रीय व औद्योगिक प्रगतीवर एक मोठा अहवाल प्रसिद्ध केला. त्यामध्यें, प्रगति कोणत्या मार्गानें करावी व ती यशस्वी होण्याचा कितपत संभव आहे याबद्दल तात्त्विक व व्यावहारिक चर्चा केलेली आहे. प्रगति घडवून आणण्याचे जे अनेक मार्ग त्या अहवालांत दाखविलेले आहेत, त्यांपैकीं एक मार्ग म्हणजे, हिंदुस्थानांतील निरनिराळ्या चालू असलेल्या व भविष्यकाळांत निर्माण होणाऱ्या औद्योगिक क्षेत्रांत अवश्य लागणारें, परंतु सध्यां फार थोड्या प्रमाणांत अस्तित्वांत असलेलें शास्त्रीय ज्ञानांत पारंगत असें, मनुष्यबळ शक्य तितक्या थोड्या काळांत तयार करण्यासंबंधींचा होय. त्या अनुरोधानें चारपांचशें तरुण होतकरू विद्यार्थी पुढारलेल्या देशांत आधुनिक भौतिक विद्या संपादन करण्यासाठीं दरवर्षी पांठविण्याचें हिंदुस्थान सरकारानें व निरनिराळ्या प्रांतिक सरकारांनीं मुक्रर केलें.

हा प्रयत्न यशस्वी होण्यासाठीं काय योजना करावी यासंबंधीं कांहीं सूचना गेल्या वर्षींच लेखकानें प्रसिद्ध केलेल्या होत्या. त्या सूचनांचा मुख्य हेतु हा कीं, या सर्व प्रयत्नांची, विद्यार्थ्यांच्या शिक्षणक्रमांची व त्यांची सांघिक शक्ति कायम ठेवून उपयुक्तता वाढविण्याची आंखणी कांहीं एका पूर्वनिश्चित तत्त्वावर केलेली असावी. परंतु तसें कांहीं झालेलें दिसत नाहीं.

हिंदुस्थानाचें दुर्दैव येथेंहि आड आलेलें असावें यांत शंका नाहीं. गेल्या वर्षी विद्यार्थी पाठविण्यांत सरसकट धरसोडीची वृत्ति दिसून आली व त्या सर्वांचा परिणाम असा झाला कीं जसें कित्येक नालायक माणसांची शास्त्रीय व औद्योगिक ज्ञान संपादन करण्यासाठीं मोट बांधण्यांत आली, तसेंच कित्येक लायक व होतकरू तरुणांस बाजूस सारण्यांत आलें. बरें, इतकें करून तरी सर्व विद्यार्थ्यांची परदेशांतील नामांकित व उत्कृष्ट शिक्षणसंस्थांत सोय करण्यांत आली काय ? तशी ती झाली नसल्याच्या पुष्कळ तक्रारी ऐकूं येत आहेत. निरनिराळ्या शाखांतील शेंकडोंशें विद्यार्थी अपरिहार्य (!) कारणामुळें अजून हिंदुस्थानांतच अडकून पडलेले आहेत.

झाड चांगलें यावें ह्या चांगल्या हेतूनें परंतु जर डोळे मिटून खडकावर निष्काळजीपणे बीं पेरण्यांत आलें तर त्याचा दोष कोणाकडे ? अशा दिरंगाईनें आपल्या देशांत घडवून आणलेली कोणचीहि शास्त्रीय योजना आतांपर्यंत तरी आपणांस फार महागांत पडलेली आहे. शिवाय त्यामुळें आपला शास्त्रावरील विश्वास ढांसळला आहे.

सुधारणा घडवून आणणाऱ्यांची तीव्र इच्छा व चिकाटी असल्याखेरीज कोणचेहि राष्ट्रीय कार्यक्रम उपयुक्तपणें व यशस्वीपणें पार पडूं शकत नाहींत. उलटपक्षी नुकसानच पदरीं येतें. जी गोष्ट रशिया करूं शकला, चीननें अमेरिकेच्या सहाय्यानें जी गोष्ट घडवून आणली तीच गोष्ट हिंदुस्थानांत आंखली गेली असूनहि येथें ती यशस्वी होण्याचा संभव मात्र फार कमी वाटतो.

## (ब) राष्ट्रीय प्रयोगशाळा

शास्त्रीय औद्योगिक प्रगतीच्या मार्गांतील प्रवास व्यवस्थितपणें व्हावा म्हणून सुमारें दीड कोट रुपये खर्च करून हिंदुस्थान सरकारानें राष्ट्रीय (नॅशनल) आणि सर्वस्वीं शास्त्रीय संशोधनाला वाहिलेल्या पांच नवीन संस्था अस्तित्वांत आणण्याचें ठरविलें आहे. १ नॅशनल केमिकल लॅबोरेटरी, २

नॅशनल फिजिकल लॅबोरेटरी, ३ नॅशनल लॅबोरेटरी फॉर ग्लास अँड सेरॅमिक्स ४ नॅशनल फ्यूअल लॅबोरेटरी, ५ नॅशनल मेटॅलर्जिकल लॅबोरेटरी अशीं त्या योजलेल्या संस्थांचीं नांवें आहेत. पहिली संस्था रसायनाला वाहिलेली आहे; दुसरी विज्ञानाला, तिसरी कांचकामाला, चवथी ज्वलनाला आणि पांचवी धातुशास्त्राला. आतांपर्यंतच्या योजनेप्रमाणें या पांचहि प्रयोगशाळा हिंदुस्थानांतील निरनिराळया औद्योगिक व शास्त्रीय केंद्रांच्या जागीं स्थापण्यांत येतील. खरोखर पाहिलें तर विमानविद्या, अन्नशास्त्र, वास्तुशास्त्र, वैद्यक, नौकानयन हीं शास्त्रेंसुद्धां भविष्यकालीं प्रगतीला फार उपयुक्त व आवश्यक आहेत. अर्थात् आजच त्यांची सोय झाली नसली तरी पुढें मागें ती उणीव भरून काढण्यांत येईल असें वाटतें.

औद्योगिक धंदे वाढवून देशाची संपत्ति वाढविण्याकडे व मनुष्याचें जीवन जास्त जास्त सुखमय करण्याकडे पाश्चिमात्य देशांत शास्त्रीय ज्ञानाचा सर्रास उपयोग करण्यांत येतो. व्यवहारांत लागणाऱ्या सर्व गोष्टी जास्त सोईच्या व जास्त कार्यक्षम करण्यांत त्या देशांतील शास्त्रीय संशोधनाला वाहिलेल्या पुष्कळशा प्रयोगशाळा मग्न असतात. या प्रयत्नांमुळें नवीन नवीन द्रव्यें उत्पन्न करतां येऊं लागलीं आहेत व त्यामुळें पाश्चिमात्य देशांत कोणचीहि गोष्ट उत्पन्न करण्यासाठीं लागणारा खर्च दिवसेंदिवस कमी कमी होत आहे. सर्वसाधारण जनतेला अत्यावश्यक असणाऱ्या व ऐषआरामासाठीं लागणाऱ्या सगळ्या गोष्टी आटोक्यांतल्या वाटूं लागतात. अशी विलक्षण क्रांति घडवून आणण्याचें श्रेय तिकडील राष्ट्रीय प्रयोगशाळांनाच आहे. शास्त्रीय संशोधन, औद्योगिक निर्मिति, सरकाराच्या गरजा आणि जनतेला अवश्य असलेल्या गोष्टी या सर्वांची त्या देशांत उत्तम प्रकारें सांगड घालण्यांत तेथील राष्ट्रीय प्रयोगशाळांनीं कसलीहि कसूर केलेली नाहीं.

खरोखर पाहातां आपल्या देशांत असेंच झालें पाहिजे. शास्त्रीय

संशोधनाचा उद्योगधंद्याच्या दृष्टीनें शक्य तेवढा जास्ती उपयोग कसा करून घेतां येईल हें पाहाण्याचें सर्व राष्ट्रीय प्रयोगशाळांचें मुख्य ध्येय असतें. विश्वविद्यालय किंवा इतर शास्त्रीय संस्था यांत चालविलेलें संशोधन बऱ्याच प्रमाणांत एका ठराविक मार्गानें होत असतें. कांहीं प्रकारचें संशोधन विश्वविद्यालयीन प्रयोगशाळांतच होऊं शकतें तर कांहीं प्रकारच्या संशोधनासाठीं मोठमोठ्या कारखानदारांना स्वतःच्या प्रयोगशाळा चालवाव्या लागतात. आपल्या देशांत कारखान्यांना जोडलेल्या आणि ज्यांत संशोधन चालूं ठेविलें आहे अशा प्रयोगशाळा फारच थोड्या आहेत. अशा परिस्थितींत होऊं घातलेल्या राष्ट्रीय प्रयोगशाळा औद्योगिक क्षेत्रांत इष्ट ती प्रगति घडवून आणतील अशी आशा वाटते.

## (क) पुणें येथें होऊं घातलेलें विश्वविद्यालय

ज्ञानाची वाढ व्हावी म्हणून शिक्षण-क्षेत्रांतील निरनिराळ्या प्रकारें ज्ञानार्जन करणाऱ्या संस्थांचीहि वाढ योग्य प्रमाणांत व्हावी हें उघड आहे. अशाच उच्च हेतूनें प्रेरित होऊन पुणें येथें नवीन विश्वविद्यालय काढण्याचें घाटत आहे. खरोखरी ही कल्पना कांहीं नवीन नाहीं. निदान पंधरा वीस वर्षें तरी त्या कल्पनेला वेळोवेळीं चालना मिळून एकदां रीतसर मूठमातीहि मिळालेली आहे. परंतु महाराष्ट्रांतील विद्वानांच्या व शिक्षणप्रेमी जनांच्या मताला मान देऊन सरकारानें नामदार डॉ. जयकर यांच्या अहवालानुसार एक नवें विश्वविद्यालय पुणें येथें उघडण्याचें आतां निश्चित केलें आहे. या विश्वविद्यालयाची रचना कशी असेल, त्यांत नेहमींचेच परीक्षांचे अभ्यास शिकविले जातील किंवा उच्च संशोधन करण्याचीं तेथें मुबलक साधनें उपलब्ध होतील याबद्दल अद्यापि संपूर्णपणें एकमत नाहीं. सध्यां उपलब्ध असणाऱ्या माहितीवरून आणि मनुष्यस्वभावाच्या एकंदर अनुभवावरून असें वाटतें कीं मुंबई विश्वविद्यालयाचा किंवा हिंदुस्थानांतील कोणत्याहि नव्या वा जुन्या

विश्वविद्यालयाचाच एक लहानमोठा नमुना पुण्यांत उभारण्यांत येईल. बहुतांशीं अशीहि भीति वाटते कीं नवीन विश्वविद्यालय जुन्या व अस्तित्वांत असलेल्या कार्याचीच नक्कल करण्यांत गर्क होईल. अशा प्रसंगीं म्हणजे ज्या वेळीं आपल्या प्रांतांत लाखों रुपये खर्चीं घालून एक आदर्श विश्वविद्यालय करण्याचें घाटत आहे त्या वेळीं नवें विश्वविद्यालय जुन्याचीच हुबेहूब किंवा सुधारलेली प्रतिमा होऊं नये, असें सुचवावेंसें वाटतें. संशोधन ही अतिशय खर्चाची बाब असते. शिक्षणक्रम पुरविण्याला त्या मानानें कमी खर्च लागतो. जें शिक्षण आपल्याकडे अद्यापि मिळत नाहीं म्हणजे ज्या शिक्षणाची काडीमात्र सोय आपल्या देशांतील कोणत्याहि विश्वविद्यालयांत समाधानकारक रीतीनें अद्यापि होत नाहीं, त्याची सोय प्रथमतः करणें हें जुन्याचीच पुनरावृत्ति करण्यापेक्षां बरें असें वाटतें. जें शिक्षण औद्योगिक प्रगतीसाठीं अवश्य आहे व जें शिक्षण मिळविण्यासाठीं आपल्याकडील होतकरू विद्यार्थ्यांना परदेशी संस्थांकडे अवश्य धांवत जावें लागतें तें शिक्षण आपल्यांतील लायक मुलांना खात्रीनें मिळूं शकेल अशी व्यवस्था आपल्याच देशांत जरूर झाली पाहिजे. जोंपर्यंत अशी सोय झालेली नाहीं तोंपर्यंत असें वाटतें कीं येथून पुढें होणाऱ्या सर्व विश्वविद्यालयांनीं आपला शिक्षणक्रम मुख्यत्वें त्याच दिशांनीं आंखावा. जयकर-कमिटीच्या सभा होत असतांना वर दर्शविलेली इच्छा लेखकानें प्रकट केली होती. परंतु दुर्दैवाची गोष्ट कीं आपल्याकडील सुशिक्षित मंडळींची दृष्टि जितकी विशाल व्हावयाला पाहिजे तितकी अद्यापि झालेली दिसत नाहीं. भाषा, इतिहास, संस्कृति या विषयांचें महत्त्व बिलकुल कमी लेखण्याची लेखकाची इच्छा नाहीं. तरी पण इतर अवश्य विषयांची जोंपर्यंत देशांत किंवा प्रांतांत मुळींच सोय झालेली नाहीं, तोंपर्यंत तरी नवीन होणाऱ्या विश्वविद्यालयानें प्राचीन विषयांच्या अभ्यासावर खर्च करण्याचें कांहीं कालपर्यंत टाळलें तरी चालण्यासारखें आहे. प्राचीन विषयांची आबाळ व्हावयाची नाहीं, अशी खात्री वाटण्याइतकें त्या विषयांतील आपलें शिक्षण व संशोधन वाढीला

लागलेलें आहे. नवीन व अपरिचित विषयांची प्रथमपासून जोपासना करणें व त्यांना जोमानें वाढीला लावणें हेंच आपलें आद्य कर्तव्य ठरतें. शिवाय त्यांची वाढ झाली तर देशांतील संपत्तींत निःसंशय भरच पडेल.

भविष्यकाळीं सुधारणा कशा घडवून आणावयाच्या हें निश्चित करण्याचें काम कधींच सोपें नसतें. परंतु त्यांत दुराग्रह व अदूरदर्शीपणा यांना मात्र वाव मिळतां कामा नये.



दिनकर विनायक काळे, संपादक 'सह्याद्रि'

# इतिहास-वाङ्मय आणि लोकशिक्षण

---

इतिहास विषयाचें वाङ्मय या देशांत प्रथम कां व कसें निर्माण झालें आणि त्याच्या प्रगतींतून सद्यःस्थिति काय परिणत झाली याचा अभ्यासपूर्वक आढावा तर या लेखांत आहेच. शिवाय महत्त्वाचें म्हणजे, राष्ट्रोत्थानासाठीं उत्सुक असलेल्या समाजांत इतिहासाचें लेखन स्पष्टदर्शी, स्फूर्तिप्रद, सत्यान्वेषक आणि तरीहि आत्मीयबुद्धीनें होण्याची आवश्यकता नि इष्टता कां आहे आणि तें कसें करता येईल हें या निबंधांत सुस्पष्ट केलेलें सांपडेल.

---

### इतिहास आणि लोकशिक्षण

इतिहास आणि लोक यांचे आजच्या अर्थाचे संबंध छापण्याची कला प्रगत होईपर्यंत येणें शक्यच नव्हतें. लोकशिक्षणांत इतिहासाला त्यामुळेंच निरपवाद स्थान पूर्वीं नव्हतें. इतिहास या संज्ञेचा निश्चित व शास्त्रीय अर्थ युरोपांतहि अठराव्या शतकाच्या अंतापर्यंत निश्चित कोठें होता ? आणि इकडच्या प्रमाणेंच तिकडे देखील इतिहास म्हणतां येण्यासारख्या कांहीं बखरीवजा गोष्टी राजे व राजपुरुष यांनाच वाचावयाला ऐकावयाला मिळत.

राज्यकारभाराचें शिक्षण देणारी अशी ही राजपुत्रांसाठीं विद्या होती, प्रजाजनांसाठीं नव्हती. आपल्याकडे कीर्तन-पुराणांत धार्मिक नैतिक शिक्षणासाठीं फक्त रामायण-महाभारताचा उपयोग होई. तात्या पतोजीच्या शाळांत हस्ताक्षर, पाढे, थोडें प्राथमिक गणित आणि थोडेसे हिशेब एवढेंच कारकुनी शिक्षण होई. बखरी या राजपुरुषांसाठीं. सामान्य लोक श्रीसकलगुणालंकरणादि मायन्यांचेच किस्से काढीत. इंग्रजी राजवटींत सुरू झालेल्या सरकारपुरस्कृत शाळा–कॉलेजांत इंग्रजांच्या अनुकरणानें प्रथम इतिहास आला. इंग्रजांना आपल्या गौरवार्थ तो शिकवावासा वाटला, दूरदर्शी देशभक्तांना त्याचा देशभक्तीसाठीं उपयोग होईल, अशी आशा वाटली. प्रथम इतिहास देशी भाषांत आला इंग्रजीच्या भाषांतराच्या रूपानें. पुढें हळूहळू थोडी स्वतंत्र रचना झाली. आणि अर्थात् तिचा आत्माहि बदलला.

### इतिहासाचा रास्त उपयोग

इतिहासाचें शास्त्रीय स्वरूप उत्क्रांत झालें त्याबरोबरच इतिहासाचा रास्त उपयोग काय याबद्दलहि ‘ शास्त्रीय ’ चिकित्सा होत राहिली. पण ही शास्त्रीय चिकित्सा आणि लोकमत यांत नेहमींच तफावत राहिली. मानवी व्यवहार आणि वर्तनक्रम यांना मार्गदर्शक असे त्रिकालाबाधित म्हणजे निरपवाद नियम इतिहासावरून काढतां येत नाहींत, येणार नाहींत; नीति-शिक्षणासाठीं देखील त्याचा उपयोग करणें रास्त नाहीं, असें शास्त्रीय चिकित्सकांनीं कंठरवानें सांगितलें. परंतु लोकांनीं के. विष्णु कृष्ण चिपळुणकरांसारख्यांवर विश्वासून जिज्ञासातृप्ति, सदुपदेश, मनास प्रसन्नत्व व उन्नति, मनोरंजन, नीतिज्ञान आणि मनाचें पोषण ( निबंधमाला अंक ६, ७ ) असे कांहीं गोलमाल उपयोग ध्यानांत धरून इतिहासाचें स्वागत व वाचन केलें. शास्त्रीय चिकित्सक झाले तरी ‘ इतिहासाचा कांहींच उपयोग नाहीं ’ असें एकांतिक विधान करीत नाहींत; ‘ इतिहासांतून वाटेल तें काढतां येईल ’ असें फार

तर म्हणतील. पण लोकशिक्षणांत त्याचा फार मोठा भाग आहे हें कोणीच नाकबूल करणार नाही. आजकालची स्थिति कां आली याचा कार्यकारणभाव इतिहासच सांगतो. पूर्वानुभव व पूर्वज्ञान यांच्याशिवाय कोणतीहि सामाजिक काय पण शुद्ध शास्त्रीय प्रगतिहि अशक्य होईल. आणि कांहींहि झालें तरी बुद्धि कमावण्याचें एक साधन म्हणून ह्या विषयाचा उपयोग नाकारण्यासारखा नाहीं. सत्यान्वेषणाच्या पद्धति यशस्वी होण्यास म्हणजे खरें कोणतें व खोटें कोणतें हें कळण्यास कांहीं तत्त्वानुसार शोधन करावें लागतें. या गोष्टीचें ज्ञान हें मनाला आरोग्यदायक वातावरणासारखें हितप्रद आहे. कोणावरहि भोळसटपणानें विश्वास ठेवणें बरें नाहीं हें इतिहासपद्धतीची थोडीबहुत माहिती झाल्यावर अवश्य ध्यानांत येईल. अनेक तऱ्हेच्या प्रगत वा अप्रगत समाजांचें दर्शन इतिहासांत घडत असल्यानें थोड्याशा भिन्न आचार-विचारांबद्दल असहिष्णुता किंवा अस्वस्थता दर्शविण्याचा समाजविद्रोही गुण मनुष्य सोडून देण्यास शिकेल असें वाटतें. जगांत स्थिर असें कांहींच नव्हतें व नाहीं हें इतिहासवाचनानें ध्यानांत आल्यास साहजिकच बदलण्याचें, प्रगतीचें भय नाहींसें होणें आणि आपण स्वतः नवीन आचार-विचारांचें स्वागत करून अगदीं 'सनातनी' न राहणें या गोष्टी शक्य कोटींत येतील. समाजाच्या शिक्षणाच्या परिवर्तनाच्या योजनेंत इतिहासाकडून कोणतें लोकशिक्षणात्मक कार्य करून घेणें शक्य आहे याचा हा व्यावहारिक आराखडा झाला. यासाठीं ऐतिहासिक सत्याची फारशी ओढाताण करावी लागणार नाहीं. पण अशा रंगरहित निरुपद्रवी आत्मविकासपर शिकवणीनें लोकांचें समाधान होत नाहीं, होणार नाही. आणि म्हणून जेव्हां स्वजनांकडून आणि स्वदेशांत म्हणजे हिंदुस्थानांत नेहमीं असाच उपयोग केला गेला आहे काय असें आपण पाहूं लागतों तेव्हां आपल्याला अगदीं निराळें उत्तर मिळतें !

पण तें पाहण्यापूर्वीं महाराष्ट्रांत झालेली इतिहास व इतिहास-वाङ्मय यांची उत्क्रांति थोडक्यांत समजावून घेतलेली बरी.

## मराठी भाषेंतील इतिहास-लेखनाचे इतिहास

सुदैवानें मराठी भाषेंतील इतिहास-लेखनाचा इतिहास बऱ्यापैकीं लिहिलेला उपलब्ध आहे. **अर्वाचीन मराठी साहित्य** (१८७५–१९३५) या पुस्तकांतील ' मराठी इतिहास व इतिहास संशोधन ' हा प्रा. द. वा. पोतदार यांचा विस्तृत लेख आणि **मराठी साहित्य समालोचन** (१८१८–१९३४) या ग्रंथाच्या पूर्वार्धांतील ग्रंथकार श्री. सरवटेलिखित ' चरित्रें, इतिहास, प्रवासवर्णनें ' (१८१८ ते १८८५) हें प्रकरण सर्वसाधारण वाचकाची जिज्ञासा भागवतील. **प्रदक्षिणा** या लेखसंग्रहांतील (प्रकाशन १९-१-४१) ' गेल्या दीडशें वर्षांतील ऐतिहासिक वाङ्मय ' या प्रा. पोतदारांच्या व्याख्यानाचें इतिवृत्त आणि पुण्यास ' इंडिअन हिस्टरी कॉंग्रेस ' चें प्रथम अधिवेशन भरलें त्या प्रसंगानें प्रा. नरहर रघुनाथ फाटक यांनीं भारतांतील इतिहास-संशोधनाचा ' नवाकाळ ' दैनिकांत मे-जून १९३५ मध्यें घेतलेला जरा व्यापक दृष्टीचा आढावा हीं दोन्ही धांवतीं दर्शनें म्हणून चटकदार आहेत. ध्येयनिष्ठ ' केसरीची महाराष्ट्रेतिहास-विषयक कामगिरी ' प्रस्तुत लेखकानें १९३१ त प्रकाशिलेल्या **केसरी-प्रबोध** ग्रंथांत (पृ. ४९८-५१९) वर्णिली आहे, तिचाहि महाराष्ट्रांतील इतिहासविषयक राजकारण समजून घेण्यास उपयोग होण्यासारखा आहे.

या मराठी भाषेंतील आढाव्यांइतकेंच कै. न्या. मू. रानडे यांच्या इंग्रजींतील समालोचनाचें वाचन लाभदायक होईल. ग्रेटब्रिटन व आयर्लंडच्या रॉयल एशियाटिक सोसायटीनें भारतमंत्र्यामार्फत हिंदुस्थान सरकाराकडून संस्कृत व देशी भाषांत हिंदुस्थानांत १८१८ पासून प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांच्या याद्या करविल्या. पहिली यादी ३१ डिसें. १८६४ पर्यंतच्या प्रकाशनांची निघाली; व पुढें दर तिमाहींत झालेल्या पुस्तक-प्रकाशनाची पुरवणी यादी काढण्यांत येई. मराठी पुस्तकांची (हींत इतिहास पुस्तकें येतात)

पहिली यादी न्यायमूर्तींनीं तयार करून तिजवर मूल्यमापनात्मक टिपणी लिहिली. फिरून विद्यापीठांत मराठीचा प्रवेश व्हावा म्हणून मुंबई विद्यापीठाच्या फेलोंचें मन वळविण्यासाठीं १८९८ पर्यंतच्या पुढील सुमारें ३० वर्षांच्या वाङ्मय-प्रगतीचा आढावा दुसऱ्या एका विस्तृत निबंधांत त्यांनीच घेतल्यामुळें त्यांच्यासारख्या निरीक्षकाचे हातून उतरलेला आरंभापासूनच्या ८० वर्षांच्या वाङ्मयविकासावरील सखोल परंतु सहानुभूतीचा अभिप्राय आपल्याला उपलब्ध आहे. 1

## समालोचनांचा निष्कर्ष

या सर्वांवरून, ( १ ) १८६४ पूर्वी चरित्रें, इतिहासादि गंभीर विषयावर ग्रंथ नव्हतेच; त्यानंतर वर्षानुवर्षे बरेच झाले आणि ( २ ) या ग्रंथवाढीचें काम बहुतांशीं विद्यापीठ (युनिव्हर्सिटि) बाह्य वा विद्यापीठपूर्व-शिक्षित लेखकांच्या हातून झालेलें आहे. हे न्या. मू. रानड्यांचे मुद्दे त्या वेळीं जसे खरे होते तसे ते आजहि आहेत, हें सहज स्पष्ट होण्यासारखें आहे. यांपैकीं पहिली गोष्ट साहाजिकच आहे. पाश्चात्य शिक्षणाच्या फैलावाबरोबर पाश्चात्य विद्या आणि ग्रंथलेखन यांचा परिचय झाल्यामुळें अनुकरणानें व भाषांतरांमुळें मराठींतील ग्रंथलेखन वाढणारच. परंतु दुसऱ्या गोष्टीबद्दल मात्र खेद वाटल्याशिवाय राहात नाहीं. ‘ प्रचलित शिक्षणपद्धति मातृभाषेबद्दल उदासीन आहे ’ हा के. रानड्यांचा मुद्दा आज देखील बहुधा तितक्याच प्रमाणांत खरा आहे. पण त्याशिवाय विद्यापीठांत शिक्षण मिळविलेला सर्वसाधारण पदवीधर विद्यार्थिदशेंतील ज्ञानलालसादि आवश्यक गुणसंपदा आपल्या पुढील आयुष्यांत टिकवूं शकत नाहीं; किंबहुना त्याच्या विद्यार्जनकालांत तसली त्याची तयारीच

1. The Miscellaneous Writings of the Late Hon'ble Mr. Justice M. G. Ranade, Vol. I, pp. 1 to 56.

होत नाहीं अशी आणखी तक्रार करण्याची पाळी आलेली आहे. इतिहासापुरतेंच बोलावयाचें तर वर्षांत प्रसिद्ध होणारीं पुस्तकें, इतिहासाला वाहिलेलीं नियतकालिकें आणि अशा नियतकालिकांत किंवा इतरत्र प्रसिद्ध होणारे निबंध, टिपणें, इतिहासाच्या प्राध्यापकांचे शिक्षणवर्ग व त्यांनीं वर्गाबाहेर इतिहासासाठीं केलेले प्रयत्न —फार कशाला, इतिहास परिषदांतून घेतलेला बौद्धिक भाग— इतिहास विषय घेऊन पदवी घेणारे विद्यार्थ्यांचा अभ्यास व पात्रता आणि त्यांच्या हातून पुढें होणारें इतिहासविषयक कार्य, विद्यापीठांचे निरनिराळे परीक्षांसाठीं ठरविलेले अभ्यासक्रम आणि देशांत संशोधनासाठीं होणारा खर्च आणि झालेली व्यवस्था, या सर्वांचें निरीक्षण केलें तर सर्वसाधारण सर्वच बाबतींत सुधारणेला कितीतरी अवसर आहे हें तेव्हांच ध्यानांत येईल. या सर्वच बाबतींत साधार माहिती मिळवून कितीतरी लिहितां येण्यासारखें आहे.

प्रगतिपर सुस्थितींतील देशांशीं तुलना करतांना आपल्याकडील काम मनांत भरत नाहीं याला आपली राजकीय वगैरे परिस्थिति कारणीभूत आहे यांत शंका नाहीं. पण याबद्दल यापुढें थोडेसें विवेचन करावयाचें असल्यामुळें त्यासाठीं थोडें तपशिलाचें पाठबळ घेऊं या.

## ऐशीं वर्षांत घातलेला पाया ( १८१८-१८९८ )

कै. न्या. रानड्यांच्या गणनेप्रमाणें—आणि अशा तऱ्हेची निवळ गणना त्यांच्यामागून कोणीच केलेली नाहीं — १८१८ ते १८६४ पर्यंत शालेय पुस्तकें सोडून जे एकूण ३२५ गद्यग्रंथ झाले त्यांपैकीं फक्त २३ म्हणजे शेंकडा ७ इतकेच इतिहासावर होते. पैकीं १४ हिंदुस्थानाविषयक, ६ इंग्लंडविषयक व ३ इतर. त्यांतले चांगले म्हणण्यासारखे ते सर्वभाषांतरितच— एल्फिन्स्टन ( मंडलिक ), ग्रँट् डफ ( केपन ), मरे ( ओक, पंडित ). मराठी बखरी वगैरे प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न नव्हता. ग्रीस, रोम, युरप, अमरिका यांचे इतिहास तर मुळींच नव्हते.

१८६५ ते १८९६ या तीस वर्षांत प्रगति वाढली. बखरी, कैफियती, पत्रव्यवहार काव्येतिहास-संग्रहासारख्या नियतकालिकांतून प्रकाशित झाल्या. क्रमशः प्रसिद्ध झालेल्या बखरी वगैरेंचीं स्वतंत्र पुस्तकें सुमारें ४० झालीं. कांहीं घराण्यांचे इतिहास, अॅक्वर्थ-शाळिग्रामसंग्रहित पोवाडे इतिहासाची समृद्धि वाढवूं लागले. माल्कमकृत 'मध्य हिंदुस्थानचा इतिहास' (कीर्तने), 'तुर्की रशियन युद्ध', 'फ्रेंच राज्यक्रांति' युरोपांतील देशांचे बहुधा भाषांतरित व हिंदुस्थानांतील गोवा, सीलोन, कूर्ग अशा प्रदेशांचे अनुवादरूप इतिहास या कालांत बरेच झाले. लोकहितवादी (१८२३-१८९२) हे मोठे उद्योगी, उपहासविरोधानें चैतन्य निर्माण करणारे पुरुष या कालखंडाचे, या कालखंडांत दिसून येणाऱ्या जागृतीचे प्रतीक म्हणतां येतील. काव्येतिहाससंग्रह (माला), ऐतिहासिकलेखसंग्रह, ग्रंथमाला, भारतवर्ष, भाषांतर हीं मासिकें देशीय इतिहासांत व अस्सल साधनांच्या प्रकाशनांत बुद्धचा लक्ष घालीत. इतरहि त्यांना आदरून स्थान देत. खरे-पारसनीस-राजवाडे-आपटे यांनीं या काळांत अस्सल पत्रें प्रकाशित करण्याचा ओनामा केला खरा. परंतु त्यांचा बहर या पुढील कालखंडांतील (१८९८-१९३५) होय. या कालखंडांत आपल्या बासनांतील बखरी आदिकरून वाङ्मयाची तपासणी झाली. पण त्यांत अपुरेपणाच आढळला. आणि ऐतिहासिक जिज्ञासा मात्र तीव्र झाली.

## इतिहास मंदिराचा मालमसाला (१८९८–१९३५)

इतिहास संशोधन हें सत्य-संशोधन खरें. परंतु हिंदुस्थानांत व विशेषतः महाराष्ट्रांत तें ग्रॅन्ट डफादि परकीय इतिहासकारांनीं लिहून ठेवलेल्या विकृत इतिहासाचा प्रतिशोध घेण्यासाठीं, देशाभिमानाच्या, स्वजनांच्या कैवाराच्या पोटीं प्रथम जन्मास आले हें विसरतां कामा नये. परकीय इतिहासकारांचीं तेजोवध करणारीं विकृत विधानें बिनतोड खोडून काढतां येण्यासारखीं आहेत, तीं खोडण्यासाठीं अस्सल कागदपत्रें शोधून काढलीं पाहिजेत अशी ही

विंचारप्रणाली असल्यामुळेंच कै. राजवाड्यांनीं १८९८ तच आपल्या पहिल्या खंडाच्या नामांकित प्रस्तावनेंत "तेव्हां पुढील दहावीस वर्षांतील इतिहास–जिज्ञासूचें पहिलें काम म्हटलें म्हणजे अस्सल कागदपत्रें शोधून काढून तें छापण्याचें आहे" अशी निःसंदिग्ध घोषणा केली आणि आपल्या उदाहरणानें एक नवा संप्रदायच घालून दिला. कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे (१८६३–१९२६) हे या कालखंडाचे नायकच होत. १८९८ पासून हयातभर खपून त्यांनीं एकूण अस्सल साधनांचे २२ खंड प्रसिद्ध केले. या युगांतिल कै. पारसनीस व कै. खरे हे दुसरे चिकाटीचे संशोधक होत. फाळके, लेले, आपटे यांचीं नांवेंहि सर्वश्रुत आहेत. सरकारमार्फत प्रकाशित झालेले पेशवे दप्तराचे खंड (१९३२) हेहि त्याच पंथांतील मोठ्या गटानें प्रसिद्धिलेले कागद होत. अनेक संशोधकांच्या कार्याला स्थिरपद देणाऱ्या भारत इतिहास संशोधन मंडळ (स्थापना १९१०), राजवाडे संशोधन मंडळ (स्थापना १९२७) इत्यादि संस्था साहजिकच या कालांत पडतात. या संस्थांमुळें संशोधन व संशोधक यांचें संघटन व सहकार्य हीं शक्य झालीं व उपलब्ध साधनांचा परामर्श घेण्याची शास्त्रीय पद्धति उत्क्रान्त होऊन त्या साधनसामग्रीचा उपयोग निबंध-प्रबंध-लेखनासाठीं करतां आला व सलग इतिहासाची पूर्वतयारी करण्याचा कांहीं मार्ग खुला झाला. घराण्यांचे, संस्थानांचे, जातीय, प्रांतीय, देवस्थानीय व फुटकळ चरित्रात्मक इतिहासांचें लेखन होऊं लागलें. पाश्चात्यांच्या सुसूत्र ग्रंथांच्या उदाहरणामुळें स्फूर्ति मिळून लष्करी, आर्थिक, सामाजिक, कलाविषयक अशीं समाजाच्या विविध कर्तृत्वाचीं अंगें अगदीं अल्पस्वल्प प्रमाणांत कां होईना, पण सजविण्यांत आलीं. विकृत विधानांना प्रत्युत्तर देणारे इतिहास व इतिहासाचे तत्त्वज्ञानपर 'हिंदुपदपातशाही', 'मराठे व इंग्रज' असे विचारपरिप्लुत ग्रंथ झाले नाहींत असें नाहीं. पण या सर्वांवर फुटकळपणाचीच छाया होती. महाराष्ट्रेतिहासाचें दर्शन सांगोपांग शास्त्रीय पद्धतीनें करून देणारा इतिहासलेखक आजपर्यंत कोणी निघाला

नाहीं. आणि कोणी निघाला असता तरी त्याला अवश्य ती सर्व सामग्री जमाहि झालेली नाहीं. खरें म्हटलें तर मालमसाला जमविण्याचेंच काम अनेक हातांनीं चाललेलें आहे. महाराष्ट्राची जी स्थिति तीच इतर प्रांतांची. आणि अखिल भारतीय इतिहासाबद्दल तर बोलावयासच नको.

सुप्रसिद्ध रिसायतकार सरदेसाई यांच्या विस्तृत ग्रंथकर्तृत्वाचें स्थान पूर्वतयारीच्या प्रयत्नांतच धरावें लागतें, हें त्यांच्याच उद्गारावरून सिद्ध होईल. आतां साधनें इतकीं पुढें येत आहेत कीं कोणत्याहि एकट्या व्यक्तीला त्यांचा योग्य परामर्श घेणें अशक्यप्राय आहे. यामुळें कै. दत्तोपंत आपटे यांनीं श्री शिवचरित्र कार्यालयरूपानें केलेल्या संघटित प्रयत्नांत हें वैगुण्य काढून टाकण्यासाठीं विद्वज्जनसहकार्याच्या पाश्चात्य जगांत रूढ होत असलेल्या अनुकरणीय पद्धतीचा अल्पप्रमाणावर जो प्रयोग करून पाहिला, त्याचाच भावी कालांत अधिकाधिक अवलंब करावा लागेल, असें दिसतें. कारण आतांपर्यंत झालेल्या संशोधनाचा परिपाक या पद्धतीनें करण्याची वेळ आलेली आहे.

## सहकार्यासाठीं संघटणा १९३५

आणि त्याचें गमक हें कीं सुमारें १९३५ पासून अलीकडे सर्व देशभर इतिहास साधनांची कांहीं एका सीमेपर्यंत जमवाजमव झाल्यामुळें अखिल भारतीय सहकार्याची आवश्यकता व भारतवर्षीय इतिहास लिहिण्याइतपत आत्मविश्वास वाटूं लागल्याचीं चिन्हें दिसत आहेत. या वर्षीं 'इंडियन हिस्टरी काँग्रेस' (भारतेतिहासपरिषदे) ची स्थापना झाली आणि तिचें प्रथम अधिवेशन पुण्यास झालें, या योगें ह्या सहकार्याच्या उत्सुकतेला मूर्त स्वरूप आलें. भारतवर्षांतील विद्यापिठांतील व भांडारकर इन्स्टिटयूट, भारतीय विद्याभवन, अशा संस्थांतील संशोधन खातीं, इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स् कमिशन, प्रांतिक, विभागविषयक व देशव्यापी इतिहास परिषदा या सर्वांचें कार्य

महाराष्ट्रांत चाललेल्या कार्याशीं समांतरच आहे. फरक इतकाच कीं महाराष्ट्राला उज्ज्वल अर्वाचीन इतिहास असल्यामुळें महाराष्ट्रानें मराठशाहीचें विशेष संशोधन केलें, तर इतरांनीं मोगली वा प्राचीन इतिहासाचें संशोधन केलें. सर जदुनाथ सरकार, गौरीशंकर ओझा, उत्खनन करणारें सरकारचें पुराणवस्तु संशोधन खातें अशा सर्वांच्या सहकार्यावर अखिल भारतीय इतिहासविषयक दृष्टिकोन तयार होत आहे, याचें प्रत्यंतर हें कीं गेल्या दोनचार वर्षांच्या दरम्यान असा सर्व भरतखंडाचा इतिहास निर्माण करण्याच्या दोन योजना आपल्यापुढें आलेल्या आहेत.

### कल्पनेची मजल

अर्थात् स्वदेशाचा इतिहास स्वदेशांतील इतिहासकारांनी स्वदेशहिताच्या दृष्टीनें लिहून स्वदेशांतील देशबांधवांना अर्पण करावा, येथपर्यंत कल्पनेनें तरी आपली मजल जाऊन त्याची अंमलबजावणी कांहीं प्रमाणांत होऊं लागली आहे, हें सुचिन्ह समजलें पाहिजे. कांहीं प्रमाणांत म्हणण्याचें कारण प्रस्तुत दोन्ही योजनांत हा इतिहास प्रथम इंग्रजी भाषेंत प्रसिद्ध व्हावयाचा असून मागाहून — शक्य तितक्या लौकरच — त्याचीं देशी प्रमुख भाषांतून भाषांतरें व्हावयाचीं आहेत. भाषेची निवड हा प्रचलित परिस्थितींत जितका जिव्हाळ्याचा तितकाच अडचणीचा प्रश्न झालेला आहे. आणि कांहींसा तो बिकटच आहे. याची जाणीव राखणाऱ्यांनीं या विषयाबद्दल कांहीं अधिक लिहून कालापव्यय करावयास नकोच.

येथपर्यंतच्या विवेचनावरून आधुनिक तऱ्हेच्या गद्येतिहासलेखनाचा महाराष्ट्रांतील इतिहास नजरेसमोर आणला. त्यावरून यासंबंधीं स्फूर्ति पाश्चात्य विद्येच्या व पाश्चात्यांनींच लिहिलेल्या हिंदुस्थानविषयक व इतरदेशविषयक इतिहासग्रंथावरूनच झाली, त्यांतील चुका व अपविधानें यांचा समाचार घेण्याच्या बुद्धीनेंच बहुतांशीं स्वदेशांतील कागदपत्र-बखरी यांच्या संशोधनाला

व प्रकाशनाला सुरुवात झाली, हें काम शास्त्रीय मार्गांनीं प्रथम होऊन त्याचा पसारा वाढूं लागल्यामुळें तें लौकरच संस्थानिविष्ट होऊन त्याला स्वतंत्र कार्यपरंपरा व अल्पप्रमाणांत अभ्यासपरंपरा निर्माण झाली. त्यामुळें या कार्याला एकप्रकारें सातत्य आलें आणि शास्त्रीय इतिहासाची पूर्वतयारी म्हणून अनेक प्रबंध व चर्चात्मक ग्रंथ होऊं लागले. याच तऱ्हेनें अखिल भारतखंडांत काम चालू राहून त्या सर्वांचें संकलित स्वरूप म्हणून प्रथम 'अखिल भारतीय आधुनिक इतिहास परिषद्' नियमानें भरतखंडांतील इतिहासाभ्यासकांना एकत्र आणण्याचें कार्य करती झाली आणि अशा प्रयत्नांतून या सर्व उत्क्रांतीचा कळस म्हणून 'भारताचा जगन्मान्य व चिरस्थायी असा बृहद् इतिहास' सिद्ध व्हावा अशासाठीं दोन मोठ्या योजना करण्यांत आल्या, अशा तऱ्हेचें सामान्य स्वरूप वाचकांच्या लक्षांत आलें.

इतिहास-वाङ्मयसंवर्धनाच्या या वर्तमानकालीन इतिहासाचें स्वरूप त्यांच्या गुणदोषांसह त्यांतच प्रतिबिंबित झालें असल्यामुळें सद्यःस्थितीचा म्हणून निराळा विचार करण्याचें अर्थाअर्थीं कारण नाहींच. आणि तत्संबंधींची कांहीं निर्णायक पार्श्वभूमि कांहीं अंशीं यापुढील विवेचनांत दिग्दर्शित व्हावयाची असल्यानें एतद्विषयक पुनरुक्ति फिरून येथें करीत नाहीं.

## इतिहास शास्त्र कीं कला ?

इतिहास-वाङ्मयाचा यापुढील कालांत विकास कोणत्या प्रकारें व्हावयाचा आहे म्हणजे होणें शक्य आहे ही गोष्ट आजपर्यंतच्या त्याच्या वाढीचा इतिहास आणि त्या इतिहासानें घडविलेली सद्यःस्थिति यांवर अवलंबून असणें साहजिक आहे. इतिहासाला अवश्य असणारा मालमसाला हा इतिहासाचा भौतिक पाया होय; तर त्या मालमसाल्याचा उपयोग कोणत्या भावनांच्या छायेखालीं केला जावा, कोणत्या कल्पनांचा परिपोष त्यानें व्हावा, कोणत्या उद्दिष्ट-पूर्तीसाठीं त्याचा प्रपंच थाटला जावा हा इतिहासाच्या आत्मिक

सजावटीचा भाग होय. इतिहासाकडे शास्त्र म्हणून पाहावें का कला म्हणून पाहावें हा वाद येथें काटेकोरपणें न करतां या दोन्ही दृष्टिकोणांचें यथारुचि संमिश्रण करूनच आजपर्यंत सर्व इतिहासलेखकांनी आपलें कार्य चालविलेलें आहे, असें सामान्य विधान करण्यास हरकत दिसत नाहीं. इतिहासाचीं नानाविध साधनें हीं शास्त्रनिष्ठांना काय किंवा कलानिष्ठांना काय दोघांनाहि लागतात. त्यांच्या विश्वसनीयतेबद्दलचे दंडक दोघांनाहि सारखेच मान्य असले पाहिजेत. या साधनांचा उपयोग करतांना म्हणजे त्याचा सुसूत्र इतिहास लिहितांना त्यांत उपलब्ध साधनांचेंच तेवढें प्रतिबिंब पडेल, त्याला लेखकाच्या भावना-कल्पनांचा कमींतकमी संपर्क लागेल, तो शक्य तितक्या अधिकाधिक प्रमाणांत वस्तुनिष्ठ ( objective ) राहील, त्यांत निर्भेळ* सत्याचें सम्यक् दर्शन होईल असा कटाक्ष राखील तो शास्त्रीय इतिहास होय. असा इतिहास लिहितांना लेखकानें तो मनोरंजक केला, सत्याचा विपर्यास अगर अन्यथादर्शन न करतांना त्यांत रोचकता निर्माण केली तर तो शैलीचा विशेष समजावा. या रोचकतेंत ‘ वाङ्मयीन कला ’ दिसेल. इतिहास हें शास्त्र आहे कीं कला आहे या प्रश्नांत कला या शब्दाचा जो अर्थ अभिप्रेत आहे त्या अर्थानें ‘ इतिहासकला ’ दिसणार नाहीं. इतिहासांतील कला म्हणजे इतिहासाचें दर्शन, इतिहासांतील घडामोडींचें स्वरूप, उद्दिष्ट एका विशेष प्रकारानें वाचकाच्या मनावर बिंबावें यासाठीं उपयोजिलेला रचना-विशेष. या प्रकारांत इतिहासाचें ज्या विशेष प्रकारचें दर्शन त्या लेखकाला झालें असेल, ज्या प्रकारचा साक्षात्कार त्याला स्वतःला झाला असेल तसा तो इतरांना झाला पाहिजे असा कांहींसा प्रचारात्मक आग्रह असतो. यांत व्यक्तिनिष्ठ विवेचन ( subjective ) येतें. यामध्येंच सर्व इतिहासांतून एखाद्या विशेष प्रकारचें

---

*निर्भेळ सत्य म्हणजे **सत्य, सर्वच्या सर्व** सत्य आणि ज्यांत **सत्याव्यतिरिक्त अन्य कांहीं नाहीं** असें सत्य.

तत्त्वज्ञान वा निष्कर्ष काढण्यांचा भाग धरला पाहिजे. स्वदेशाच्या इतिहासांतून स्वाभिमानाचा परिपोष व्हावा, हिंदु राष्ट्रीयत्वाच्या परंपरेचा आग्रह निर्माण व्हावा, नाहींतर अखिल भारतवर्षव्यापी राष्ट्रीयत्वाची कल्पना सिद्ध व्हावी; अथवा जगांत वारंवार होणारीं युद्धें थांबून त्याऐवजीं सर्व जगभर स्नेहभाव वाढून शांततासंवर्धनाला मदत होईल अशा कल्पनांचा उदय व्हावा अशा रीतीनें गतकालीन गोष्टींचें दर्शन घडवावें अशी कलाकुसर –निदान निवड व उठाव– करण्याकडे कित्येकांची प्रवृत्ति होते, ही इतिहासांतील कला होय.

कल्पनेच्या स्पष्टतेकरितां एक उदाहरण घेऊं. एक व्यक्ति आहे. तिचें कॅमेऱ्यानें काढलेलें छायाचित्र हें शास्त्रीय इतिहासाचें प्रतीक समजलें तर निरनिराळ्या कलावंतांनीं त्याच व्यक्तीचीं काढलेलीं निरनिराळीं रंगचित्रें हीं त्या त्या चित्रकारांच्या कलात्मक प्रतिकृति होत. कित्येक इतिहासांत व्यंग्यचित्रांच्यासारखी विकृति निर्माण होते असाहि अनुभव येतो. परंतु तो जाणून बुजून केलेला विपर्यास म्हणून सोडून दिला तथापि प्रामाणिकपणानें म्हणून जें इतिहासाचें दर्शन एकादा लेखक करील तेंहि वैयक्तिक दृष्टिकोणाच्या उपयोगामुळें शास्त्रपूत सत्यापासून थोडेंसें दूरचें दिसणें अपरिहार्य आहे, हें या उदाहरणावरून ध्यानांत येईल व कलात्मकतेचें नेमकें स्वरूप समजण्यास मदत होईल. प्रचारक, व्याख्याते, महात्मे, देशभक्त यांना जो इतिहास पटतो त्यांत शास्त्रापेक्षां कलेकडे विशेष कल असतो; ‘ ज्यांचा गतेतिहास उज्ज्वल आहे त्यांचा भविष्यकाळ उज्ज्वल होणारच ’ हें प्रमेय कदाचित शास्त्रशुद्धतेच्या कसोटीला उतरणार नाही. आणि ‘ मुसलमान राजकर्त्यांनीं शुद्ध मुस्लिम परंपरा संभाळली, धर्मच्छल केला नाहीं ’ असा प्रचार करण्यासाठीं लिहिलेले इतिहास हे केवळ इतिहासाचीं ‘ कार्टून्स ’ होत. हें विवेचन तसें अंगदीं कांटेकोर समजण्यांत हांशील नाहीं. प्रस्तुत निबंधाची ढोबळ चौकट, निदान लेखकानें मनांत योजिलेले कांहीं संकेत, यावरून स्पष्ट होतील, एवढ्यापुरतेंच त्याचें स्वारस्य आहे.

इतिहासाचे हे दोन प्रकार ध्यानांत घेतल्यावर शास्त्र या दृष्टीची इतिहासाची वाढ आजपर्यंत जशी झाली तशीच अत्यंत मंदगतीनें म्हणजे केवळ कांहीं अल्पसंख्य ध्येयनिष्ठ, ज्ञानप्रिय आणि व्यासंगी अभ्यासकांच्या प्रयत्नानें हळूहळू होत राहील, सर्वसामान्य जनतेशीं त्याचा फारच थोडा प्रसंग येणार असल्यामुळें व्यापक लोकशिक्षणाशीं त्याचा तसा संबंध राहणार नाही, हें सांगावयास नको. स्वराज्याचें अभिनव युग अवतरलें तथापि लोकशाहींतील गुणदोषयुक्त भावी सरकार निःपक्षपाती, व वस्तुनिष्ठ इतिहास व इतिहास संशोधन यांचा कितपत मनापासून पुरस्कार करील याची वानवाच आहे.

## हिंदुस्थानांतील विषमय परंपरा

प्रस्तुत बाबीसंबंधाचा हिंदुस्थानांतील इतिहास हिंदुस्थानाच्या दुर्दैवानें विषमय परंपरेनें दूषित आहे. इतिहासादि संशोधनाची प्रगति एकोणिसाव्या शतकांत फारच झाली; पण तिचें लेण आपल्या देशांत आलें तेव्हांच भरतखंडांत परकी इंग्रजाचें राज्य चालू झालेलें होतें. यामुळें इंग्रजविरोधी सत्याला राजद्रोहाचें स्वरूप आलें. इंग्रजांनींच उठविलेला हिंदु-मुस्लीम दुहीचा भस्मासुर राईपासून पर्वताएवढा वाढल्यानें हळूहळू मुस्लिमांचें दोषदर्शन करणारें सत्य हें जातीजातींत वैमनस्य वाढविणारें होय, असें त्याला समाजविद्रोही स्वरूप प्राप्त होऊन, पीनल कोडाचे तशा लेखनावर कोरडे बसूं लागले. आणि त्यानंतर पुढें हिंदुस्थानाच्या गतकालीन विषमय 'पापी' परंपरेतून मुक्त करण्यासाठीं अवतरलेल्या महात्म्याचें अहिंसायुग सुरू झाल्यापासून तर इतिहासांतल्या कोणत्या घटितापासून या फक्त 'आंतल्या आवाजा' ला अवगत होणाऱ्या 'सत्या' विरुद्ध अत्याचार होईल याचें ज्ञान कोणालाच होईनासें झालें! स्वसत्ताभिलाषी इंग्रज आणि स्वमतदुराभिमानी राष्ट्रभक्त या दोघांच्या रेट्यानें अशा प्रकारें ऐतिहासिक सत्याची दोहोंकडून दामटी वळत राहिल्यामुळें इतर देशांत या सत्यान्वेषक ज्ञानशाखेला सहजप्राप्त होणारा

सरकाराचा पुरस्कार हिंदुस्थानांत भरपूर प्रमाणांत मिळूं शकणार नाहीं, आणि खरें संशोधनाचें काम रुटूखुटूच चालेल हें उघड आहे.

## कलात्मक इतिहास हें राजकीय चलन

लोकशिक्षणाशीं सबंध येतो तो दुसऱ्या प्रकारच्या इतिहास-वाङ्मयाचा. किंबहुना निर्भेळ सत्य-सुवर्णाचा असा कांहीं आकर्षक दागिना बनविल्याशिवाय त्याचा बौद्धिक उपभोग देखील घेतां येत नाहीं हें स्पष्ट आहे. मुलांच्या नीति-शिक्षणासाठीं, शाळा-विद्यापीठांच्या विद्यार्थ्यांच्या बौद्धिक विकासासाठीं, सर्वसाधारण सुशिक्षिताला मनुष्यानें केलेल्या प्रगतीची दिशा व स्वरूप समजण्यासाठीं, मुत्सद्दी, राजकारणी, प्रचारक यांना आपलें मत व धोरण यांचें समर्थन करण्यासाठीं, महात्मे व उपदेशक यांना आपलें प्रवचन सयुक्तिक भासविण्यासाठीं, पंथप्रवर्तक आणि तथाकथित जगदुद्धारक यांना आपलें तत्त्वज्ञान निरपवाद आहे असें मंडन करण्यासाठीं इतिहाससागरांतून इतस्ततः वेंचलेल्या चिजांचें पाटबळ नेहमींच घ्यावें लागतें. आणि इतिहासाला ‘ हें घडलें आहे ’ अशा स्वरूपाचें प्रत्ययप्रमाण भासणारें असें विशेष प्रकारचें सत्यरूप असल्यामुळें हें नाणें सदैव चलनी राहणार यांत शंका घेण्याचें कारण नाहीं.

आणि चलन म्हटलें म्हणजे देशकालवर्तमानाप्रमाणें म्हणजे परिस्थितिप्रमाणें तें बदलावें हें अगदीं साहजिक आहे. देशावरील राजसत्ता बदलल्याबरोबर देशांतील वस्तुविनिमयाला साधनीभूत असलेलें चलन बदलतें. त्याचप्रमाणें जनमतावरील अधिराज्य चालविणाऱ्या नेतृत्वांत बदल होण्याबरोबर विचारसंक्रमणाचें वाहन असणारी भाषा, त्यांतील वाक्प्रचार, आवेश, जोर म्हणजे देण्यांत येणारा भर ( एम्फसिस ), इतिहास, इतिहास-पुराणांतील उदाहरणें आणि त्याच उदाहरणांवरून काढावयाचे निष्कर्ष यांत सहजासहजीं फरक होतो. इतिहासाकडे पाहावयाचा आपलाच दृष्टिकोण घेतला

तर त्यामध्यें निरनिराळ्या प्रसंगांनी फरक झालेला आढळून येईल. आणि आपल्या देशावरील परकी सत्तेच्या अधिराज्याशींच त्याचा निकटचा संबंध असलेला दिसेल.

## अभ्यासविषयक दृष्टिकोणाची उत्क्रांति

इतिहासाच्या अभ्यासविषयक दृष्टिकोणाबद्दलच पाहिलें तर प्रथम प्रथम ग्रँट् डफ-मालकम-एल्फिन्स्टनादि इंग्रज राज्यकर्त्यांनीं लिहिलेल्या इतिहासांतील आपल्या पूर्वजांचें रेखाटलेलें विकृत स्वरूप पाहून अस्वस्थ झालेल्या देशप्रेमी माणसांनी त्यावर उतारा पाहण्यासाठीं शोध करावयाला सुरुवात केली असें दिसून येईल. या शोधांतून अफाट साधनसामग्री अभ्यासकांना हस्तगत झाली आणि तिची सुव्यवस्था लावून तिला बोलकी करण्यासाठीं म्हणून पाश्चात्य अभ्यासकांत त्याच सुमारास वाढीस लागलेल्या संशोधनशास्त्राचे साहाय्यानें आपल्या इकडेहि निर्भेळ सत्यसंशोधनाचे आधुनिक दंडक अवतरले. त्याला अनुकूल अशी अभ्यासकांनी संस्थापरिषदादि संघटना केली आणि इतिहास-संशोधनाचे मंदिरावर संपूर्ण – साधार – सत्यवादी भारतेतिहासनिर्मितीचा कळस चढविण्याची साक्षेपानें तयारी चालविली आहे, वगैरे गोष्टींचा प्रपंच वर येऊन गेलाच आहे.

इतिहासांतील उपलब्ध घटनांच्या आपल्या देशांत करण्यांत आलेल्या उपयोगांतहि असाच कालमानाप्रमाणें फरक झालेला आढळून येईल. प्रथम आपल्याला शिकविण्यांत येणारे इंग्रज इतिहासकारांचे इतिहासांत राजकर्त्यांचा म्हणजे लेखकांच्या बांधवांचा उदोउदो करण्याच्या भरांत हिंदी लोकांसंबंधीं तुच्छतेची भावना व्यक्त होत असे. तिची प्रतिक्रिया म्हणून पारतंत्र्य येण्यापूर्वीं आपले पूर्वज कसे वैभवशाली होते यांतच स्वप्नरंजन करून घेण्याची संधि घेण्यासाठीं आपण आपल्या प्राचीन व मध्ययुगीन इतिहासांतील दाखले इंग्रजांच्या व आपल्या निराश झालेल्या बांधवांच्या तोंडावर फेंकूं लागलों;

आणि आपला भावी काल आशादायकच आहे हें पटविण्यासाठीं गतेतिहासाच्या उज्ज्वलतेचें प्रमाण पुढें ठेवूं लागलों. राष्ट्रजागृतीचें व आपसांतील ऐक्यभावना वाढविण्याचें साधन म्हणून आपल्या प्राचीन व ऐतिहासिक प्रवरांचे उत्सवसमारंभ करून लोकमान्य टिळकांनीं आपला राष्ट्रीय पक्ष गाजविला. त्या वेळीं अशा किती तरी प्रेरक ग्रंथांना, नाटकांना, काव्यांना सरकारानें बंदी करून त्यांच्या प्रखर प्रचारसामर्थ्याची ग्वाही दिली.

परंतु थोड्या काळानें लोकमान्यांच्या नंतरचें नेतृत्व हें निराळ्या स्वरूपाचें आलें. लोकमान्यांनीं चालू केलेले राष्ट्रपुरुषांचे उत्सव, तत्संबंधीं सुरू केलेलीं जीर्णोद्धारमंडळें आणि स्मारकें मागें पडलीं. देशभक्तीच्या प्रचारमालिकांतून इतिहास, शिवाजीसारखे वीरपुरुष आणि त्यांच्या आश्रयानें वाढीस लागणारी वीरवृत्ति यांचें वावडें वाटावयास लागून शिवाजी हा ' मार्ग चुकलेला देशभक्त ' ठरूं लागला. कारण आपल्या देशाच्या उन्नतीचा मार्ग असमाधानकारक वाटून अखिल भारताला व्यापणाऱ्या राष्ट्रीयत्वाचा प्रचार करण्यासाठीं अकबराचा राजमार्ग, भौगोलिक म्हणजे सर्व जमातींचें ऐक्य समर्थनीय ठरविणारा ' हिंदी ' प्रवण राष्ट्रवाद साध्य ठरविण्यासाठीं इतिहासाचा उपयोग करण्याचा प्रघात शिष्टसंमत वाटूं लागला. पीनल कोडानें दंडार्ह ठरविलेला जातीय वैमनस्याचा आक्षेप आतां राष्ट्रनेत्यांनीं स्वेच्छेनें टाळण्यासाठीं कमर बांधली आणि ' हिंदु मुस्लीम भाई भाई ' ही घोषणा दुमदुमूं लागली. राष्ट्रीय ऐक्यासाठीं कांहीं सत्यें दडविण्यासहि हरकत नाहीं असा युक्तिवाद ध्येयदृष्टीनें पुढें येऊं लागला. आणि महात्मा गांधीप्रणीत वर्धा योजनेंत आजच्या आपल्या सांस्कृतिक जीवनाचे जेवढे प्रेरक व एकीकरण-प्रवण घटक असतील तेवढ्याच फक्त प्राचीन सामाजिक जीवनेतिहासाचा अभ्यास आग्रहानें शिकविण्यावर कटाक्ष ठेवण्यांत आला. इतिहासाची परंपरा वाटेल ती असो. आपण सजीव, स्वतंत्र बुद्धीचे, सारासार विचारी मानव आपल्या

हितावर नजर ठेवून वाटेल तें ध्येय पुढें ठेवून आपला स्वभाव बनवूं शकूं, त्या तऱ्हेचें शिक्षण देऊन गतकाल विसरण्यास लावूं, सर्व प्रतिसृष्टि नवी बनवूं, अशा हिरीरीनें उद्योगाला लागणारा हा अभिनव एकतेचा भारतीय राष्ट्रवाद इतिहासाला देखील आपल्या कामाला जुंपूं पाहात आहे. रशियांतील जुनी समाजरचना पार उखडून टाकून (' ह्युमॅनिटी अपरूटेड ') तिच्या जागीं अगदीं अभिनव असें नव्या भावना, नवीन विचार, नव्या कल्पना यांचें भव्य भिन्न जग निर्माण करण्याचा लेनिन-स्टॅलीन प्रभृतींनीं चंग बांधला होता तशाच प्रकारचा चंग महात्मा गांधींनीं बांधल्याचें स्पष्ट दिसत आहे. आपल्या देशाला परिचित असलेली भाषा वापरावयाची तर नवा धर्म, नवी भाषा, नवा इतिहास, नवा राष्ट्रधर्म, नवा राष्ट्रवाद, नवें राजकारण, नवें धोरण सर्व कांहीं क्रांतिकारक नवें करण्याची, स्वतःच्या रूपानें नव्या अवताराचें जनतेला दर्शन घडविण्याची महत्त्वाकांक्षा महात्मा गांधी मनांत बाळगीत असावेत असें दिसतें.

## जगदैक्य-प्रचारकांची भूमिका

पण या विचारांत अगदीं असामान्य किंवा अभिनव असें कांहींच नाहीं. इतिहास हा प्राचीन वैमनस्यें उगाळीत बसतो आणि जाती-जातींच्या अभिमानपोषणाच्या संकुचित दृष्टीमुळें देशांत दुही व राष्ट्रांराष्ट्रांत युद्धें होण्यास कारणीभूत होतो. तेव्हां त्यांतील ती नांगी काढून टाकून दिवसेंदिवस भौतिक प्रगतीनें एकरूप होणाऱ्या भूप्रदेशांमध्यें आत्मिक एकी वाढीला लागावी अशीच इतिहासाची रचना करण्यांत यावी असें प्रतिपादन करणारा जागतिक, शांततावादी व ऐक्य-बुद्धियोगी म्हणजे जगदैक्य-प्रचारकांचा मोठा प्रभावी लेखकवर्ग केव्हांपासूनच उत्पन्न झालेला आहे.

सुप्रसिद्ध ध्येयवादी लेखक एच्. जी. वेल्स यांनीं आपला ' दि आउटलाइन ऑफ हिस्टरी ' हा बृहद्ग्रंथ गेल्या महायुद्धानंतर (१९२०)

याच हेतूनें लिहिला व प्रकाशिला. त्याच्या प्रस्तावनेंत त्यांनीं आपला उद्देश प्रगट केला आहे. ते म्हणतात —

" समान ऐतिहासिक कल्पनांशिवाय एकरूप शांतता व समृद्धि नांदूं शकणार नाहीं. गोडीगुलाबीच्या सहकार्याची प्रेरणा देणाऱ्या अशा कांहीं परस्परांत बंधन उत्पन्न करणाऱ्या कल्पना नसतील, आणि संकुचित, आप्पलपोट्या, आणि विरोधी राष्ट्रीय परपरा जागृत राहातील तर वंश काय किंवा समाज काय आपसांत दुहीच्या मार्गानें नाशाप्रत गेल्याशिवाय राहणार नाहींत. हें सत्य...आतां सर्वसाधारण माणसाला स्पष्टपणें दिसलें आहे. आपल्या समाजांतल्या निरनिराळ्या वर्गांचे उगम आणि त्यांचे परस्परांतील इतिहासनिर्मित संबंध यांच्याबद्दलच्या चुकीच्या आणि वेडगळ कल्पनांमुळें आमचीं अंतर्गत धोरणें आणि आपल्या आर्थिक व सामाजिक कल्पना ह्या फारच दूषित झालेल्या आहेत. आणि म्हणून राष्ट्राच्या अंतर्भागांतच केवळ नव्हे तर राष्ट्रांराष्ट्रांमध्यें सलोखा नांदावयाचा असेल तर सर्व मानवतेचा समान सहानुभव म्हणजे इतिहास अशी जाणीव फैलावण्याची फार मोठी आवश्यकता आहे. " ( प्रस्तावना, पृ. ५, ..ाना २ )

या उताऱ्यांत मि. स जें म्हणत आहेत तें सत्याचे विकृत दर्शनाचे विरुद्ध आहे. सत्य दडपून टाकण्याच्या समर्थनार्थ यांत कांहींच आधार सांपडण्यासारखा नाहीं. इतिहासांतील घटितांचें स्पष्टीकरण कसें करावें, त्यांतहि सहभावनेला पोषक अशाच कल्पना कशा प्रामुख्यानें मांडाव्या अशांवर भर आहे. याच गोष्टींवर भारतीय इतिहासाच्या संपादक मंडळाचे नाणावलेले अध्यक्ष सर जदुनाथ सरकार आणि त्या परिषदेचे प्राणच डॉ. राजेंद्रप्रसाद यांचेमधील पत्रव्यवहारांत भर दिलेला दिसेल. या इतिहासांत संपूर्ण सत्य यावें ( The fullest truth ), आपण प्रकाशित करणार तो ' राष्ट्रीय इतिहास ' घटितांसंबंधीं सत्यवादी व मल्लिनाथीमध्यें सारविवेकी ( true as regards the facts and reasonable in the interpretation

-of these ) असावा, पूर्वींच्या परदेशी इतिहासकारांनीं वगळलेले आपल्या राष्ट्रजीवनाचे सर्व पैलू त्यांत यावे आणि इतिहासलेखकानें आपल्या पूर्वजांचे गुणदोष बरोबर अजमावणाऱ्या निःपक्षपाती न्यायाधिशाची भूमिका स्वीकारावी, आपल्या राष्ट्रस्वभावांतील दोष दाखविण्याचें टाळूं नये, तर त्यांतील गुणदर्शनहि सांगोपांग करून सर्व गुणदोषांनीं घडविलेलें एकंदर व्यक्तिमत्त्व चित्रित करावें, अशी सर जदुनाथ सरकारांनीं जी कल्पना मांडली ती राजेंद्रबाबूंनीं सर्वस्वीं मान्य करून, 'ज्यामध्यें खऱ्या गोष्टी दाबून टाकल्या जातात किंवा विकृत स्वरूपांत येतात तो इतिहास या नांवाला लायकच नाहीं' या तुमच्या म्हणण्याला माझा पूर्ण पाठिंबा आहे, असेंच आश्वासन दिलेलें आहे.

इतिहासाचार्यांतील आपआपसांत मान्य झालेला हा शास्त्रशुद्ध चोखंदळपणा अभिनव राष्ट्रवादानें भारलेल्या बहुसंख्य इतरेजनांना कितपत पटलेला आहे किंवा तो त्यांच्या एकंदर जीवनांत व व्यवहारांत कसा काय अंमलांत येणार आहे याची आतांच कांहीं आलेल्या घृणास्पद अनुभवांवरून कल्पना करणें बरें नव्हे. सर जदुनाथ सरकारांच्या राष्ट्रीय इतिहासाविषयींच्या कल्पना इतक्या तपशिलानें देण्याचें कारण त्यांत दिलेल्या इतिहासाच्या व्यापाच्या कल्पनेकडे लक्ष वेधणें होय. "पूर्वींच्या परदेशी इतिहासकारांनीं वगळलेले आपल्या राष्ट्रजीवनाचे सर्व पैलू ( The aspects of our nation's life in the past usually ignored by foreign writers ) आपल्या राष्ट्रीय इतिहासाच्या बृहद्ग्रंथांत आले पाहिजेत " हें त्यांचें विधान अत्यंत महत्त्वाचें होय.

## अभ्यास-प्रगतीची अपरिहार्य दिशा

आपल्याकडील इतिहासाचा अभ्यास या धोरणानें यापुढें प्रगट होणें अपरिहार्य आहे. आजपर्यंत हे पैलू वगळले गेले हा परकीय इतिहासकारांचा व आपल्याहि इतिहास संशोधकांचा दोष नाहीं. परकीय इतिहासकार

हिंदुस्थानाचें, मराठ्यांचें नांव घेऊन इतिहास लिहित असतांना आपल्यांचें राष्ट्रगौरवाप्रीत्यर्थ आपण जिंकलेल्या लोकांची माहिती कुतूहलानें गोळा करून लिहित होते. अभ्यासविषयाची सांगोपांग माहिती मिळविण्याचीं साधनें त्यांना मर्यादित प्रमाणांतच उपलब्ध होतीं व जीं हातांत येण्यासारखीं होतीं त्यांचाहि समरसनेनें अभ्यास करण्याची ( भाषाभेद, परंपराभेद इत्यादि भेदांमुळें ) त्यांना पात्रताहि नव्हती. त्यांना उत्तरादाखल स्वकीयांनीं संशोधन व इतिहासलेखन सुरू केलें तेव्हां तर उपस्थित केलेल्या आक्षेपांना व तुच्छतापूर्ण उल्लेखांना प्रतिक्रियारूपच सर्व कांहीं केलें गेल्यामुळें इतर मौलिक कार्य करण्याकडे लक्ष कमीच दिलें गेलें. इतिहास म्हणजे सर्वांगीण जीवनाचा आढावा ही कल्पना पाश्चात्य अभ्यासकांतहि हळूहळूच फैलावत आहे. तेव्हां इतिहास म्हणजे केवळ राजघराणीं व युद्धें यांची जंत्री नव्हे ही कल्पना रूढ झाल्यावरच पुढें येणारी ही व्यापक कल्पना आतांशा कुठें लोकांना पटूं लागलेली आहे. हिंदी राजकारणाची जसजशी प्रगति होईल तसतसा इतिहासाविषयीं संकुचित दृष्टिकोण आपोआप सोडला जाईल. भावी भरतखंडाचा, सुदैवानें स्वतंत्र झालेल्या भरतखंडाचा, नागरिक आपल्या ध्वजाप्रमाणेंच आपल्या राष्ट्रपुरुषांना, शिवाजीसारख्या वेंचक राष्ट्रपुरुषांना, आपले मानबिंदु मानील यांत संशय नाहीं. परंतु स्वतंत्र हिंदवासियाचें राष्ट्रजीवन पारतंत्र्यांतील कुचंबणेंत कुंथत पडलेल्या हिंदपुत्राचे जीवनापेक्षां इतक्या पटीनें सखोल, व्यापक, स्वयंपुष्ट, स्वयंप्रेरित आणि नानाविध अनिर्बंध-कृतिप्रवण होईल कीं त्याला आपल्या पूर्वजांच्या कर्तृत्वाबद्दल वाटणारा अभिमान तो आपल्या स्वतःच्या कृतींतून थबथबणाऱ्या आत्मगौरवांत रूपांतरित करण्याच्या व्यवसायांत पूर्णपणें गढून जाईल. पूर्वजांनीं घडविलेल्या इतिहासाप्रमाणेंच किंबहुना अधिक प्रगत स्वरूपांत, आपण स्वतःच इतिहास घडविण्याची त्याला विवंचना लागेल. स्वतंत्र जीवन जगणार सुपुत्र वडिलांचें श्राद्ध करण्यापुरताच त्यांचा आदर बाळगून दैनंदिन व्यवहार करीत राहातो आणि

त्या वेळीं वडिलांच्या छायाचित्राचा रात्रंदिवस ध्यास बाळगण्याऐवजीं वडिलार्जित घरदार, इस्टेट, जमीनजुमला, त्यांनीं मिळविलेलीं सुधारणेचीं साधनें यांच्याच जोपासनेसाठीं आपलें कर्तृत्व उपयोजितो, तसाच कांहींसा प्रकार त्याचाहि होईल, आणि गतेतिहासावरील त्याचें लक्ष व त्याची भक्ति विरळ होईल. राष्ट्राचें व्यावहारिक जीवन बहुतच समृद्ध होईल. आणि त्यासाठीं स्वदेशांतील अप्रगत कृषिविद्या, मागासलेलें वैद्यक आणि अप्रगल्भ यंत्रविज्ञान अपुरें पडून, परदेशांतील भौतिक प्रगति आणि आर्थिक व सामाजिक मूल्यें यांचा स्वीकार अपरिहार्य होईल. ज्या कारणांनीं व प्रक्रियेनें प्रांतिक वैशिष्ट्यें व प्रांताभिमान यांना मुरड घालून अखिल भारतीय नागरिकत्वाची पात्रता मिळविण्यासाठीं आपल्याला स्वप्रांतीय इतिहास व भारतीय नागरिकत्वासाठी आवश्यक असणारीं स्वाभिमानी मूल्यें यांचा समन्वय करावा लागतो, तींच कारणें व प्रक्रिया वाढत्या भौतिक सुधारणांमुळें अपरिहार्य होणारें जागतिक समन्वयाचें ध्येय व साधन आपल्यासमोर उभें करून, आपल्या इतिहासाबद्दलचें आपलें धोरण ठरविण्यास कारणीभूत होतील. पारतंत्र्याचा अनुभव घेत असतांना आपल्या मनोमंदिरावर साम्राज्य चालविणारा शिवाजी हा जागतिक समन्वयाच्या नवयुगांत अखिल भूमंडळाला प्रकाशित करणाऱ्या सूर्यमालेंतील एक, आपल्या हाडामासाचा दैदिप्यमान ग्रह, इतकाच जिव्हाळ्याचा संबंध राखूं शकेल. मानवी कर्तृत्वांतील राजघराणीं, युद्धें यांचें महत्त्व साहजिकच कमी झाल्यानें पृथ्वीची वसाहत, लागवड, उत्पादनासाठीं प्रयत्न, जीवन सुखी करण्यासाठीं लावलेले अग्नि, चक्की अशासारखे सांस्कृतिक शोध, टोळ्या, जमाती, नगरराज्यें, राष्ट्रें अशा तऱ्हेची जगांत कोठेंहि झालेली वाढ, त्या संघटनेची प्रगति, धान्य-संवर्धन, वैद्यक-संशोधन, यांत्रिक व रासायनिक शोध, भौतिक व तात्त्विक शास्त्रांतील वाढतें सूक्ष्मत्व अशासारख्या पशुरूप मानवाला पायरीपायरीनें देवत्वाप्रत नेऊन पोहोंचविणारे विविध व चमत्कृतिजनक प्रयत्न अशांचा चित्रपट प्रेक्षणीय व

अभ्यसनीय ठरेल. इतिहासच नाहीं का हा ? गतकालांत हजारों वर्षांपूर्वी पृथ्वीतलावर मनुष्यरूपानें अवतरल्यापासून मानवानें आजच्या सुधारलेल्या दर्जापर्यंत ओलांडलेल्या प्रगतिपथावरच्या पायऱ्या आणि त्यांची परंपरा हाहि इतिहासच आणि तोच विविध प्रकारें अभ्यासिला जाईल. पण या अफाट इतिहासाच्या मानानें आज ज्याला आपण ‘ आपला इतिहास ’ मानतों तो केवढा लहानसा भाग आहे ! नवयुगाचा इतिहास हा आजच्या सर्व इतिहासांच्या बेरजेच्या संभारापेक्षां कदाचित लहान होईल; परंतु मनुष्य ज्या चित्रपटाचा नायक आहे त्या विविध चित्रपटाचें सम्यक् दर्शन त्यावरूनच एकदम आणि प्रभावी रीतीनें होऊं शकेल. आजच्या संशोधनांत गढून राहिलेल्या माणसांना हें भवितव्य अस्वस्थ करावयाला कदाचित कारणीभूत होईल, परंतु विचार करून पाहील त्याला या भवितव्याचें स्पष्ट आणि इष्ट दर्शन झाल्याशिवाय राहणार नाहीं.

### तत्त्व आणि व्यवहार

आतांपर्यंत अगदीं विद्यापूत ( अॅकॅडेमिक ) म्हणजे कोणत्याहि तात्त्विक अगर व्यावहारिक अडथळ्याचा संपर्क न लागूं देतां केवळ भौतिक व इष्टमान प्रतिपादक ( नॉर्मेटिव्ह ) शास्त्रांच्या अनिर्बंध वाढीमुळें संभाव्य वाटूं शकणाऱ्या जगदैक्याच्या स्वप्नरंजनाच्या रोखानें आकाशांत विहार करणाऱ्या कल्पनासृष्टींतील ( युटोपिअन ) प्रगत विचारसरणींचें चित्रण केलें. परंतु तत्त्व आणि व्यवहार यांमध्यें अगदीं पुरातन काळापासून छत्तिसाचा आंकडा असल्याचें जगजाहीर आहे. सत्यसृष्टींत अशा प्रकारचें ध्येय सहजपणें अवतरेल हें शक्य नसल्यानें प्रत्यक्ष व्यवहार पाहूनच वाङ्मयविकासाबद्दलच्या आपल्या अटकळी व सूचना आंखल्या पाहिजेत. ज्या अर्थीं वेल्सच्या इतिहासानंतर वीसच वर्षांत महायुद्ध उद्भवलें आणि त्यापूर्वीं शंभर वर्षें कॉंटनें जागतिक शांततेची सदिच्छा सप्रमाण व्यक्त करूनहि युद्धें थांबलीं नाहींत, ‘ इस्लामी ’ म्हणजे शांततावादी धर्माचे व ख्रिस्ताचेच अनुयायी युद्धें आणि रक्तपात यांत

अहमहमिकेनें सहभागी होतांना दिसतात, आपल्या सुवर्णभूमींतहि आत्मौपम्य-दृष्टींची महान शिकवण देणारे भगवान आणि अहिंसाचार्य महात्मे अवतारांसारखे आदरणीय मानले जाऊनहि त्याचा नित्यक्रमावर कांहींच परिणाम होऊं शकला नाहीं असें इतिहासच सांगतो, आणि ज्या अर्थी शांततावादाची तुतारी फुंकण्यासाठीं कटिबद्ध झालेल्या ख्रिस्त व बुद्ध यांचा अवतारच शोभेल असा महत्तम पुढारी ज्या पक्षाचा नेता म्हणून वावरत आहे, त्या पक्षाच्या अनुयायांमध्यें त्याच्या उच्च शिकवणीचा अंशहि उतरला नाहीं असें सिद्ध होण्यासारखे प्रसंग डोळ्यांसमोर घडत आहेत, त्या अर्थी हा ध्येयवाद गतकालांत जितका आणि जसा निकामी ठरला तितका आणि तसाच तो सदैव निकामी ठरणारा आहे आणि त्यामुळें त्यावर विश्वसून राहणें म्हणजे चोरांच्या दुनियेमध्यें आत्मौपम्यबुद्धीनें आपलें धनसर्वस्व उघड्यावर बाळगण्याइतपत शहाणपणाचें ठरणार आहे. तत्त्ववेड्या लोकांच्या दृष्टीनें 'आपलें राखून दुसऱ्यांना यश देण्याचें व्यावहारिक तत्त्वज्ञान' हेंच इतरांच्या आक्रमणबुद्धीला आवाहन (!) आणि म्हणून त्यांच्या आवडत्या तत्त्वज्ञानाच्या अपयशाचें कारण असें वाटण्याचा संभव आहे. परंतु त्यांच्या या उलट्या तत्त्वज्ञानाबद्दल कींव करण्यापलीकडे आपण दुसरें कांहींच करूं शकत नाहीं, अशी कठोर वस्तुस्थिति आहे. आणि वर वर्णिलेल्या 'महान' तत्त्वज्ञानाच्या जोडीला जसें अधिक व्यावहारिक तत्त्वज्ञान सदैव जिवंत राहिल्याशिवाय राहाणार नाहीं तसेंच त्या व्यावहारिक तत्त्वज्ञानाचें समर्थन करणारे इतिहासहि दुनियेंतून नाहींसे होण्याचा संभव नाहीं. व तसल्या इतिहासांचें समर्थनच काय पण प्रत्यंतर आपल्याला चालू व्यवहारांतहि मिळत आहे. सर्व तऱ्हेनें समझौता करण्याला अनुकूल वातावरण उत्पन्न होत असतांहि आजच्या प्रगतिशिखरावर विराजणाऱ्या विसाव्या शतकांतहि जनाब जीनासारख्या अडेलतट्टाचें हें महान तत्त्वज्ञान समाधान करूं शकत नाहीं, हींच गोष्ट वरील तऱ्हेच्या वेडपट नादानपणावर पुरेशी आणि विदारक टीका नाहीं काय ?

म्हणून आणि मनुष्यस्वभाव जो एकदां निर्माण झाला आहे त्याचे नानाविध स्वार्थी, अहंकारी, आक्रमक, चढेल, अडेल आणि क्रूर-भीषण नमुने या जगांत कालाच्या अंतापर्यंत असेच राहणार असल्यामुळें त्यांचें सत्यस्वरूप ध्यानांत घेण्यासाठीं, त्यांवर समाजहिताच्या दृष्टीनें जरूर तीं बंधनें आजपर्यंत कोणतीं व कशा प्रकारें घालण्यांत आलीं व त्यांपैकीं कोणतीं यशस्वी झालीं हें समजण्यासाठीं, खरें समाजहित कशांत आहे आणि त्यासाठीं करावयाच्या त्यागाच्या आणि दानाच्या यथायोग्य मर्यादा कोणत्या हें समजण्यासाठीं, जगतांत सुष्ट आणि दुष्ट या दोन्ही प्रकारचे समाज नांदत आहेत हें सत्य असल्यामुळें कोणत्या सुष्ट परंपरेचा कोणता अनुकूल विशेष आहे आणि कोणत्या दुष्ट परंपरेचा कोणता प्रतिकूल विशेष आहे हें नमूद केलेल्या अनुभवाच्या आधारें पडताळून पाहण्यासाठीं, सत्य, कांटेकोर आणि कठोर इतिहासाचा दीपप्रकाश सदैव पाजळत ठेवणें सर्वश्रेष्ठ लोकशिक्षणाच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे. ध्येयवादाची मुरड कितीहि घातली तरी ती केवळ लेखकाच्या व वाचकाच्या मनावर तेवढ्यापुरती मोहिनी घालूं शकेल; प्रत्यक्ष व्यवहारांत तिचा काडीभरहि उपयोग होण्यासारखा नाहीं.

## राष्ट्रवाद आणि आंतरराष्ट्रीय वाद

म्हणून प्रादेशिक अभिमानाला डावलून, उखडून काढून त्याचे जागीं व्यापक नागरिकत्वाची भावना रुजविणें हा खटाटोप सिद्धीस जाईल असें वाटत नाहीं. मूळचें आहे तें स्वाभाविक आहे. तें उपटून काढून त्याचे जागीं अस्वाभाविक आणि दूरचें, डोक्यावरून जाणारें, महत्तत्त्व रुजविण्याच्या खटाटोपांत ‘ आहे तें उपटलें आणि दुसरें मात्र रुजलें नाहीं ’ असा गोंधळ होईल. राष्ट्रवाद पक्का पचनीं पडलेला निखळून किंवा स्थिरपद झालाहि नाहीं तोंच त्याला तसाच सोडून आंतरराष्ट्रीय वादाचा तेथें आरोप करूं पाहणें हें सर्वथैव अशक्य आहे. जागतिक शांततापरिषदा, होली रोमन एम्पायर,

राष्ट्रसंघ आणि आतां जगापुढें येत असणारी 'युनायटेड नेशन्स ऑर्गनायझेशन, या कल्पना विशिष्ट राष्ट्रीय स्वार्थांचें संरक्षण करीत राहतील तोंपर्यंतच त्यांना पाठबळ मिळतें, त्यानंतर त्या उधळून जातात, नव्हे कांहीं सबबी काढून उधळून लावल्या जातात, हें सत्य कटु असलें तरी अनिवार्य आहे. यासाठीं इतिहासाचें आजचें स्वरूप बहुतांशीं तसेंच राहूं देणें हें राज्यशास्त्र, समाजशास्त्र आणि खुद्द इतिहासशास्त्र या दृष्टीनें योग्यच होय.

मागें वर्णन केलेला व्यापक आंतरराष्ट्रीयवाद किंवा समावेशक राष्ट्रवाद हा अनन्यसाधारण असें ध्येय म्हणून देखील ठेवण्यानें एक प्रकारें हानि होते असें मानणारांपैकीं प्रस्तुत लेखक आहे. कारण प्रादेशिक आणि वांशिक वैशिष्ट्यें जीं असतील त्यांची म्हणजे त्यांतील उत्तम गुणांची प्राचीन ऐतिहासिक परंपरेच्या पार्श्वभूमीवर जोपासना करून तीं वैशिष्ट्यें अखिल भारतीय राष्ट्रीयत्वाच्या परिपोषाला जेणेंकरून उपकारक होतील, अखिल भारतीय श्रेष्ठत्वाला निरनिराळ्या प्रांताचा तो तो परंपरेनें वाढीला लागून परिणत झालेला, हवामान, परिस्थिति व समाजसंवर्धनाचे अनुभव यांतून सिद्ध झालेला गुणविशेष कारणीं लागेल अशी समाज, देश, राष्ट्र व शासन-पद्धति यांची रचना झाली पाहिजे, असें त्याचें मत आहे. स्वत्व दडपून टाकण्याऐवजीं तें जोपासून त्याहून अधिक व्यापक दृष्टीच्या व अधिक विस्तृत प्रमाणावरच्या राष्ट्राभिमानांत आवश्यकतेप्रमाणें त्याचा प्रवाह मिळवून दिला तर पहिलें सामर्थ्य दुसऱ्याचें सामर्थ्य वाढविण्यास कारणभूत होतें. अनेक लिबलिबीत व्यक्तिमत्त्वांतून कणखर व्यक्तिमत्त्व निर्माण होणार नाहीं. म्हणून आधींच प्रगत झालेलीं अनेक प्रखर व्यक्तिमत्त्वें परस्परांच्या संमतीनें एकत्र येऊं शकलीं तर त्यांचा प्रभाव अधिक पडूं शकेल. अनेक काड्या एकत्र बांधून त्यांची जुडी एकेक काडीपेक्षां केव्हांहि मोडण्यास कठीण होते हें खरेंच आहे. पण प्रत्येक काडी व्यक्तिशः अधिक जाड म्हणजे विशिष्ट प्रकारें जोपासलेली घेतली तर केव्हांहि त्यांचें सामर्थ्य अधिकच ठरेल. आज ज्या

जगांत आपण राहात आहोंत त्याच जगांतील दंडक आपल्याला पाळले पाहिजेत. आणि जगांतील जे इतिहास आपण पाहातों व वाचतों तसेच इतिहास आपल्याला स्वदेशाबद्दलहि निर्माण केले पाहिजेत.

## राष्ट्रभाषेचा विकृत प्रचार

हिंदुस्थान आजपर्यंत अनेक कारणांमुळें आत्मनिष्ठ राहिला. त्यामुळें सर्व जगतामध्यें त्याला आपलें स्थान सिद्ध करून घेतां आलें नाहीं. आपल्य परतंत्र सरकाराकडे या गोष्टीच्या दोषाचा फारच मोठा वांटा येतो. परंतु या पारतंत्र्याच्या शृंखला सोसूनहि आज केवळ जगाचीच परिस्थिति बदलल्यामुळें हिंदुस्थानाला जें स्थान जागतिक भवितव्यतेच्या आराखड्यांत प्राप्त झालेलें आहे, त्याचा पुरेपूर फायदा घेण्याचा आपण जबरदस्त प्रयत्न केला पाहिजे. केवळ राजकारण लढविणाऱ्या पक्षांवर अवलंबून न राहातां राजकीय जीवनाव्यतिरिक्त इतरहि सामाजिक, बौद्धिक, विशेषतः वाङ्मयीन जीवन समृद्ध करण्याचा चंग बांधून प्रथम जगांतील नानाविध, परंतु त्यांतल्या त्यांत सर्व स्वातंत्र्य उपभोगणाऱ्या आणि कर्तबगार देशांचे, सविस्तर इतिहास आपल्या मातृभाषांतून आणविले पाहिजेत. या दृष्टीनें राष्ट्रभाषा कीं मातृभाषा असा अस्वाभाविक वाद माजविण्याच्या भरीस न पडतां, कृत्रिम गौरवानें किंवा लोकसंख्येच्या किंवा बहुसंख्याकांच्या व अल्पसंख्यांच्या समाधानाच्या मृगजळापाठीमागें न लागतां, प्रत्येक मातृभाषेनें म्हणजे देशी भाषेनें आपापली ग्रंथसंपत्ति समृद्ध करण्याच्या मार्गाला लागण्यामध्यें प्रांताच्या, वर सांगितलेल्या धोरणाप्रमाणें, स्वतंत्र कर्तृत्वाच्या संवर्धनाला पूर्ण अवसर मिळणार आहे. ज्या प्रांताचा मूळ स्वभाव ( जीनिअस ) जो असेल, त्याला अनुसरून तो भाषांतराकरितां या रूपांतराकरितां देशोदेशींचे इतिहास निवडील. ज्याची साधनसंपत्ति वाढेल, जो प्रांत या आत्मसातीकरणाच्या चढाओढींत सर्वश्रेष्ठ ठरेल त्याला आपसुखच राष्ट्रभाषानिर्णयाचा मान मिळेल. असल्या प्रश्नांवर

वादाचीं रणें माजविण्यापेक्षां आपआपली पात्रता वाढविण्याला पूर्ण अवसर देत राहावें. ही राष्ट्रसंवर्धनाची फार मोठी कामगिरी ठरेल. या दृष्टीनें पाहिलें तर निरानिराळ्या भाषांतील एतद्विषयक ग्रंथसंपत्तीची योग्य दखल घेण्यासाठीं परभाषांचा थोडासा अभ्यास करावाच लागेल. आणि आपल्या महाराष्ट्रांतून हिंदुस्थानाचा राज्यकारभार हांकला जात असतांना आपल्याकडे अनेक भाषी लोक होते ती परंपरा फिरून निर्माण होईल. इंग्रजांच्या आगमनामुळें व इंग्रजीच्या सररहा रूढ होण्यामुळें आपली ती पूर्वपरंपरा अनुपयोगानें मागें पडली आणि इंग्रजीच्या उदाहरणामुळें एकराष्ट्रभाषेचा प्रश्न एकमेकांचीं मनें कलुषित करण्यापर्यंत वादविषय ठरला.

## कांहीं सूचना

परभाषेंतील इतिहासाचीं रूपांतरें व स्वभाषेंतच मौलिक इतिहास लिहिण्याचा प्रश्न विचारांत घेत असतांना, कोणत्याहि विषयाला ग्रांथिक रूप प्राप्त होण्यापूर्वीं चर्चेला उपकारक म्हणून नाना प्रकारचे स्फुट लेख व पुस्तिका यांचें महत्त्व नजरेआड करून चालणार नाहीं. त्या योगें विषय थोडक्यांत व थोडक्या प्रमाणांत पुरा करण्याची सुलभता लाभून प्रचाराचें एक नित्याचें साधन सहजासहजीं हातीं लागतें. आज मराठीमध्यें केवळ इतिहासविषयाला वाहिलेलीं मासिकें नाहींतच म्हटलें तरी चालेल इतकी थोडीं आहेत. आणि इतर मासिकें इतिहासाला फारच थोडें स्थान देतांना दिसतात. त्याचें एक कारण म्हणजे राज्यकर्ते व राजकारणकर्ते यांचा विरोध हें वर दाखविलेंच आहे. अधिक समंजसतेचा काल पुढें दिसत आहे. त्यांत या गोष्टींत सुधारणा होण्याची आशा करूं या.

ऐतिहासिक स्फुट लेख व पुस्तिका प्रसिद्ध करण्याला अनुकूल वाक्यें लिहितांना दुसऱ्या एका तत्सदृश गोष्टीचा म्हणजे विनाकारण इतिहाससाधनें

म्हणून वापरल्या जाणाऱ्या सटरफटर कागदपत्रांच्या भरमसाट छपाईचा निषेध करण्याचें कटु कर्तव्य येथें करावें लागत आहे. छापण्याच्या कलेचा दुरुपयोग करून अलीकडे एकंदरींत पांचपन्नास लोकांपेक्षां जास्त लोक जें वाचण्याची इच्छा करणार नाहींत आणि जे इच्छा करतील त्यांत दहापांच देखील वाचण्याला वेळ काढून ज्याचा उपयोग करणार नाहींत असलें बिनपद्धतीचें, विनासंक्षेप, पत्रवाङ्मय छापून तें ' शास्त्रीय वाङ्मय ' म्हणून लोकांच्या गळ्यांत बांधण्याची व कोणी न घेतील तर त्यांवर असहानुभूतीची टीका करण्याची घाई करण्यांत येते. असें वाङ्मय आज लोकप्रसिद्ध असलेल्या संस्थांत सुंदर हस्ताक्षरांत छापण्यासाठीं हस्तलिखित तयार करतों त्या स्वरूपांत अनुक्रमांक, सूचि इत्यादि सर्व साधनांनीं युक्त असें सांभाळावें व अभ्यासकांना माफक फी घेऊन देखरेखीखालीं वाचावयास द्यावें. म्हणजे राष्ट्राचा इतका पैसा व छपाईला लागणारा कागद वांचूं शकेल !

आपल्या देशामध्यें शाळाकॉलेजांतील विद्यार्थ्यांसाठीं मुकर करावयाच्या अभ्यासपुस्तकांविषयीं आणि सरकाराच्या कित्येक पुस्तकांना बंदी करण्याच्या धोरणाविषयीं पुष्कळच तक्रार करावयास जागा आहे. परंतु जनतेचीं मतें शाळाकॉलेजांतच काय तीं बनत असतात व पाठ्यपुस्तकांच्या बाहेर कोणतेंच वाचन विद्यार्थी देखील करीत नाहींत, ह्या गोष्टींवर लेखकाचा विश्वास नाहीं. परतंत्र देशामध्यें सरकार व सरकारी पद्धति यांवरच विसंबून राहणारे लोक नांदत असतील तर त्यांनीं आपल्या देशाचें भवितव्य आपल्या कल्पनांप्रमाणें बनविण्याची आशा कधींच धरूं नये. स्वतःच्या प्रयत्नांनीं साक्षरता, शिक्षण, वाचनीय वाङ्मय व कांहीं राष्ट्रोद्धारक कल्पना यांची वाढ करण्याचे सतत उद्योग केले पाहिजेत, करविले पाहिजेत. या दृष्टीनें आणि कोणताहि एक विवक्षित पक्षपाती दृष्टिकोण न पत्करतां खालील सर्वसाधारण प्रगतीच्या दिशा सुचविण्यासारख्या आहेत.

## अनुकरणीय धोरण

( १ ) उपलब्ध साधनांच्या आधारें आपले प्रादेशिक वैशिष्ट्याच अभिमान वाटेल आणि त्या वैशिष्ट्याचा अखिल भारतीय स्वसंरक्षणक्षम आणि विरोधसामर्थ्यसंवर्धक राष्ट्रीयत्वाला उपयोग होईल अशा दृष्टीचे सत्यदर्शी इतिहास निर्भयपणें निर्माण करावे.

( २ ) अशा इतिहासांचे नमुने म्हणून आणि जगांत काय चाललें आहे याचें योग्य ज्ञान व्हावें म्हणून स्वतःच्या स्वभावाला जमतील व आवडतील ते परदेशांचे प्रभावी इतिहास स्वभाषेंत आणावे.

( ३ ) या इतिहास-वाङ्मयाचें वाचन लोकप्रिय व्हावें म्हणून चालू मासिकांतून फुटकळ ऐतिहासिक लेख अधिक यावेत: पण शिवाय याच विषयाला वाहिलेलीं चर्चात्मक ऐतिहासिक मासिकें काढावीं. स्वतंत्र पुस्तिकाहि स्वस्त व विविध विषयांवरील काढाव्या. राष्ट्रजीवनाला आवश्यक वाटणाऱ्या गोष्टी व कल्पना या सर्वांचे इतिहास निर्माण व्हावे.

( ४ ) बहुसंख्याकांना पचनीं पाडतां येणार नाहीं असें साधनवाङ्मयाचें अवडंबर माजवून त्याचे छापील प्रकाशनापायीं निरर्थक खर्च होणारा कागद व पैसा वांचवावा.

( ५ ) ज्यांना आनंद वाटत असेल त्यांनीं संशोधन-कार्य तसेंच चालू ठेवावें; तें तसें चालू राहणें अपरिहार्य आहे. परंतु त्यावरून तयार होणारे सिद्धेतिहास यांबद्दल तुच्छताबुद्धि न ठेवतां त्यांचेशीं नेहमीं व आवडीनें संपूर्ण सहकार्य करून संशोधकांनीं आपली इतिहासाची सेवा थोडीशी अधिक जनतासन्मुख करावी.

( ६ ) ध्येयनिष्ठ व विकृतस्वरूपी शांततावादी मृगजळाचा पाठलाग करणारें वाङ्मय व विचार यांचें आपल्या मनावर योग्य मर्यादेपलीकडे

अधिक वजन पडूं न देतां समाजांतील वडामोडींकडे पाहण्याची व्यावहारिक दृष्टि सोडूं नये. खऱ्या इतिहासाचा हाच धडा आहे.

( ७ ) लोकशिक्षणाचें खरें कार्य करूं इच्छिणाऱ्या माणसानें विशेषतः हिंदुस्थानांत तरी नजीकच्या भविष्यकाळांत प्राचीन परंपरेंतील सर्व गोष्टी मोडून क्रांतीच्या नादीं लागूं नये. मानवी स्वभावाच्या व मानसशास्त्राच्या शिकवणीसाठीं इतिहासाबरोबर पुराणांचाहि भरपूर उपयोग करण्यास शिकावें व तसल्या कथांचा फैलाव करावा.

( ८ ) आगामी लोकशाहीच्या युगांत संस्कृतीच्या विविध अंगोपांगांच्या इतिहासांची आपल्याला फारच जरूर लागणार असल्यामुळें तशा समृद्ध जीवनाला उपयुक्त वाङ्मयाची अर्थात् इतिहास-वाङ्मयाची निर्मिति करावी आणि तसें समृद्ध जीवन जगणें हें उदात्त ध्येय समाजापुढें राहील असा वैभवशाली इतिहास लोकांपुढें अवश्य ठेवावा.

## कांहीं तपशिलाचीं कलमें

( ९ ) परंतु तत्पूर्वीं अशा समृद्ध जीवनाचे अनेक पैलू असतात तद्विषयक संशोधन आणि ग्रंथनिष्पत्ति अजून व्हावयाची आहे. तिजवर कोणत्याहि प्रकारचें बंधन न घालतां ती होऊं द्यावी. प्रथम आग्रहपूर्वक संशोधन उत्साहानें होऊं शकतें. मागाहून त्यांत सारासार विचार निर्माण करतां येतो.

( १० ) या कामाचा व्याप इतका वाढलेला आहे कीं आतां एकएकट्या माणसाच्या आंवाक्याच्या बाहेरचें हें काम झालें आहे. यामुळें अनेकांचे सहकार्यानें इतिहासनिर्मिति झाली पाहिजे.

( ११ ) बक्षिसें जाहीर करून त्यासाठीं चढाओढ लावण्याचा एक मार्ग अवलंबिला जातो. अशा चढाओढींत अपेक्षित लायकीचे लेखक उमेदवार म्हणून भाग घेतील हें शक्य नाही. त्यापेक्षां प्राथमिक कांहीं पद्धतीनें

निवड करून कां होईना, पण कोणा एकाच्या हातीं तें काम देऊन त्याला द्रव्यादि पुरवून त्याचा पाठपुरावा करावा. अशानें श्रमांची काटकसर होऊं शकते. आजच्या संशोधन-संस्था ह्या तऱ्हेनें हळूहळू पुष्कळच काम करून घेऊं शकतील.

( १२ ) अशा कामांपैकीं प्रसिद्ध साधनांच्या उपलब्ध संग्रहाच्या एकीकरणाची व एकत्रित संग्रहाच्यासंदर्भसूची सिद्ध करून अभ्यासकांना उपलब्ध करून देण्याची आवश्यकता आहे. थोड्याशा उत्साहानें कोणी इतिहासाचा अभ्यास अंगावर घेईल तर तो थोड्याच वेळांत संदर्भादि साधनग्रंथांच्या अभावीं व अशा ग्रंथांच्या सुलभ सूच्यादि मदतीच्या अभावीं अल्पावधींत निराश होऊन पराङ्मुखच होतो. ही परिस्थिति बदलली पाहिजे.

( १३ ) इतिहासकोश, चरित्रकोश अशासारखे संदर्भग्रंथ तयार झाल्यास इतिहास व एकत्रित ऐतिहासिक व्यक्ति यांमधील लोकांचें लक्ष दृढमूल होण्याचें तें एक अधिक साधन होऊं शकेल. पण अशा सिद्धान्ताच्या यशस्वितेला पोषक अशी अनेक दृष्टींची पूर्वतयारी अजूनहि अस्तित्वांत आलेली नाहीं. निरनिराळ्या इतिहासाच्या शाखोपशाखांमध्यें निरपवाद आधारांनीं निश्चित झालेलीं घटितें कांहीं तिमाही, सहामाही, एक वर्ष अशा नियत कालखंडानें अधिकृत रीत्या प्रकाशित करणारी एकहि कार्यपद्धति आपल्याकडे अस्तित्वांत आलेली नाहीं. आज चाललेलीं शाळाकॉलेजांचीं नियतकालिकें व विद्यापीठ व संशोधन-संस्था अशांचीं मुखमासिकें यांनीं सहकार्यानें हीं कामें हातीं घेतलीं पाहिजेत.

( १४ ) इतिहासविषयक संशोधनासाठीं युनिव्हर्सिटी व संशोधन-संस्था शिष्यवृत्त्या देत असतात. इतर कोणी इतिहासप्रेमी संस्था व व्यक्ति यांनीं अशा तऱ्हेच्या सूची, संदर्भसूत्रें वगैरे निर्माण करण्यासाठीं म्हणून शिष्यवृत्त्या देणें जरूर आहे. आपला उच्च परीक्षांचा अभ्यास करतांना अशीं संदर्भसाधनें

निर्माण करण्यांत कांहीं वेळ घालविणें हें त्या खुद्द अभ्यासकाला व इतरांसहि उपकारक झाल्याशिवाय राहणार नाहीं.

(१५) इतिहासविषयक वादांचा निर्णय बहुधा आधारांच्या उत्तम-कनिष्ठत्वावर अवलंबून राहावा. आग्रहाला त्यांत फार थोडा अवसर असावा. परंतु उभय पक्षांचीं मतें अगदीं प्रामाणिक विश्वासानें धारण केलीं असण्याचा संभव आहे. अशा वेळीं विनाकारण भावनांच्या आहारीं जाऊन होणारे कटु वाद व त्यांचे दुष्परिणाम शक्य तितके कमी व्हावे म्हणून विद्याव्यासंगी व सेवानिवृत्त अनुभवी उच्च दर्जाचे न्यायाधिशांचें एक मंडळ नेमून त्यांचे पुढें पुराव्याच्या ग्राह्याग्राह्यतेची चर्चा चालावी. आंतरराष्ट्रीय राजकारणांतील रक्तपात टाळण्यासाठीं राष्ट्रसंघाची योजना सूचित होती. त्यासारखाच व्यर्थ कटु वादविवाद व निष्कारण वैरें टाळण्यासाठीं (व बौद्धिक प्रमाणांनीं चालवावयाच्या वादांचा दर्जा योग्य त्या उंचीवर संभाळण्यासाठीं) या लवाद-योजनेचा उपयोग होईल.

(१६) ह्या सर्व सूचनांचा यथायोग्य अमल झाला तर भव्य इतिहास-मंदिराच्या उभारणीला उत्साहानें हात घालणें सुलभ होईल. इतिहासांतील विवक्षित घटनांवर छोटे छोटे प्रबंध, आधीं लिहिलेल्या इतिहासांच्या नवीन उपलब्ध साधनांचा उपयोग करून काढलेल्या नव्या आवृत्त्या आतां निघण्यास हरकत नाहीं. आणि असल्या सर्व प्रकरणांचा उपयोग करून नंतर साकल्यरूप इतिहास — अशा या क्रमानें योग्य तें काम होईल, व्हावें, होणें अवश्य आहे.



" मनुष्य हा सामाजिक प्राणी आहे. तेव्हां समाजाच्या धडपडीचा इतिहास कळून घेण्याची इच्छा त्याचे ठायीं स्वाभाविक आहे. ... ... उच्च प्रतीची करमणूक हाच केवळ इतिहासाचा उपयोग नाहीं. स्वसमाजाचें सबीज व सकारण चरित्र कळलें असतां, सामाजिक गुणदोष दृष्टोत्पत्तीस येतात आणि दोषांचा त्याग व गुणांचा परिपोष करण्याकडे प्रवृत्ति होते. दोषत्याग व गुणपरिपोष हा इतिहास-ज्ञानाचा मुख्य उद्देश आहे. परसमाजांचें चरित्र कळलें असतां, त्याच्यापासूनहि गुणदोष विवेचनद्वारां बोध घेतां येतो. उदाहरणार्थ शक १२०० पासून १७७९ पर्यंतचें महाराष्ट्रसमाजचरित्र पाहिलें व तदाश्रयभूत कारणांचा शोध केला म्हणजे असें कळून येतें कीं, हीं ५७९ वर्षे महाराष्ट्रसमाज तात्त्विक स्थितींत आहे आणि त्याची गांठ परस्वापहरण करणाऱ्या पाश्चात्यांशीं पडली आहे. संन्यासप्रवण व समाजद्वेष्ट्या तात्त्विक स्थितींत राष्ट्रीभवन व शत्रुनिर्दलन अशक्य होतें. ह्या दोन गोष्टी साधण्यास प्रपंचप्रवण व समाजसाधक अशा रामदासी तत्त्वज्ञानाचा उपयोग फार होतो. परंतु शास्त्रीय स्थितींत असलेल्या शत्रूंचें उच्चाटन करण्यास स्वतःचा समाज शास्त्रीय स्थितिप्रत नेला पाहिजे. अशा अनेक बीजभूत सिद्धांतांचें ज्ञान समाजचरित्र, समाजशास्त्र व समाजतत्त्वज्ञान यांच्यापासून होत असतें."

**कै० इतिहासाचार्य राजवाडे**

( ऐतिहासिक प्रस्तावना पृ. ३५९-३६० )

जयंत गणेश देवकुळे

# मराठी पुस्तकांवरील मुखपृष्ठांची सजावट

---

निर्मात्यांनीं जनसमुदायाप्रमाणें आपली रुचि पालटूं न देतां जनसमुदायाच्या रुचीला देशकालस्थितिनुरूप इष्ट तें वळण देणें अवश्य असतें. पण त्यासाठीं त्यांच्याजवळचें कर्तृत्व मोठ्या दर्जाचें असावें लागतें. आणि या दृष्टीनें मराठी पुस्तकांवरील मुखपृष्ठांच्या रचनेंत कल्पनाचतुर्य, चित्रकौशल्य, उच्च अभिरुचि आणि कमींत कमी खर्च याकडे प्रयत्नपूर्वक लक्ष पुरवावयास हवें असें या लेखांत सांगितलेलें आहे.

---

गेल्या दहाबारा वर्षांच्या काळांत मराठी पुस्तकांच्या बाह्यांगांत अनेकविध बदल नि सुधारणा होत गेल्या आहेत. आज पुस्तकांचें बाह्यांग प्रकाशन क्षेत्रांत आवश्यक व अती खर्चाचें सदर होऊन राहिलें आहे. इतर गोष्टींची काळजी करण्यापेक्षां आज प्रकाशकास प्रथम मुखपृष्ठांची दाद घ्यावी लागते आणि आपल्या परिश्रमांचा व खर्चाचा मोठा वांटा मुखपृष्ठांकारणीं अर्पण करावा लागतो. अनुभवी प्रकाशकांचे मतें हा खर्च एकंदर खर्चांत ३०-४० टक्क्यांनीं भर घालतो. तेव्हां साहजिकच हें मुखपृष्ठांचें लेणें इतकें

आवश्यक अथवा महत्त्वाचें आहे काय अथवा याची खरोखरच इष्टानिष्टता काय असा विचारी वाचकाला प्रश्न पडणें अगदी स्वाभाविक आहे. कारण हा बोजा खरोखरीनें प्रकाशकांवर अथवा ग्रंथकर्त्यावर पडत नसून पुस्तक विकत घेणाऱ्यांवर—वाचकांवरच अप्रत्यक्षरीत्या पडत असतो.

याबाबत विद्वानांकडून दोन्ही टोंकांचीं मतें ऐकूं येतात. एक म्हणतात कीं, ‘ या बाह्यांग शोभेला फारसें महत्त्व न देतां आंतील विचारसंपत्तीचें मूल्य अधिक मानावें.’ उलटपक्षीं कांहीं म्हणतात कीं, ‘मराठी वाचकांच्या वृद्धिंगत होत जाणाऱ्या रसिकतेची ही साक्ष आहे. तेव्हां बाह्यांगाबाबत प्रकाशकांनीं दक्ष राहिल्यास वावगें ठरणार नाहीं, तर विचारक्षम बुद्धीच्या वाढीबरोबर कलासक्त बुद्धीलाहि उत्तेजन दिल्यासारखें होणार आहे.’

पण कसेंहि असलें तरी एक गोष्ट अगदीं निर्विवाद आहे कीं मुखपृष्ठांचा बडेजाव फारच वाढला आहे आणि त्याकरितां प्रकाशकाला प्राथमिक खर्चाचें अंदाजपत्रक आंखतांना या कलमासाठीं पैशाची पिशवी बरीच ढिली सोडावी लागते. त्या खर्चाची साधारण कल्पना सर्वांना यावी यासाठीं आपण मुखपृष्ठासाठीं होणाऱ्या सर्वसाधारण खर्चाचें तपशीलवार कोष्टक मांडूं :

मुखपृष्ठावरील चित्र तयार करण्यासः ३० रु. ( सर्वसाधारण चित्रकार घेतो.)
दोनरंगी चित्राचा उत्तम ब्लॉक
करण्यास ७० रु. ( नामवंत ब्लॉकमेकर घेतो. )
छपाईसाठीं पूर्ण आवरणास
लागणारा कागद व दोनरंगी छपाईस ५० रु. ( पहिल्या १००० प्रतींस. )
१५० रु. अंदाजीं खर्च १००० प्रतींस.

अर्थात हे खर्चाचे आंकडे सद्यःकाळांतील आहेत. बाजाराची ही स्थिति अजून ३-४ वर्षे फारशी बदलणार नाहीं अशा खात्रीपूर्वक जाणिवेनें हे आंकडे दिले आहेत. त्याचप्रमाणें हे आंकडे केवळ सरासरीनें दिले आहेत. क्वचितप्रसंगीं यापैकीं कांहीं तपशिलांत कमी येईल, कांहीं जास्ती येईल. छापखान्यानुसार खर्चाचें

हें प्रमाण कमीअधिक राहील, पण तो फरक १०-१५ रुपयांनींच पडेल. तसेंच हा फक्त पहिल्या १००० प्रतींचा खर्च आहे. दुसऱ्या हजारास याची दामदुप्पट होणार नसून फक्त कागदाचा व छपाईचा खर्च वाढेल. जसजशा जास्त प्रती घ्याव्यात तसतसा सरासरीनें दरप्रतीमागील खर्च कमी होत जाईल. परंतु एक गोष्ट आपणास पूर्ण लक्षांत ठेविली पाहिजे कीं, मराठी पुस्तक-व्यवसायांत एक आवृत्ति जास्तींत जास्त २००० प्रतीपेक्षां अधिक निघत नाहीं. म्हणूनच सरासरीनें एक आवृत्ति हजार प्रतींचीच निघते असें मानण्यास प्रत्यवाय नाहीं.

तेव्हां मुखपृष्ठांचा हा नवा जमाना सुरू होण्यास अथवा आपल्या संस्कृतीनें पुरस्कृत केलेल्या साधेपणास रसिकतेचा, कलाप्रियतेचा अथवा शोभेचा साक्षात्कार होण्यास कारण तरी काय आहे हा प्रश्न प्रथम विचारांत घेण्यासारखा आहे.

## व्यापारी चित्रकलेचें नवें दालन

सुमारें २० वर्षांपूर्वी चित्रकलेच्या क्षेत्रांत Commercial Art या इंग्रजी नांवानें ओळखल्या जाणाऱ्या कलेचें नवें दालन उघडलें गेलें. वस्तुतः शास्त्रोक्त चित्रकला ( Fine Art ) आणि ही नवी व्यापारी चित्रकला ( Commercial Art ) यांत तसा कांहींच फरक नव्हता व अजूनहि नाहीं. रंगकला, शिल्पकला, खोदकला या एकाच तंत्रावर आधारलेल्या कला आहेत व त्या सर्वांचें एकत्रित स्वरूप म्हणजेच ‘ व्यापारी कला ’ आहे. फरक जर कोठें असेल तर तो त्यांच्या निर्मितीतील हेतूंत आणि अंतिम विनियोगांतच आढळेल.

ज्यानें आपलें जीवन कलेलाच अर्पिलें आहे तो त्या कलेवर उपजीविका करणारा असला तरी प्रारंभीं त्याच्या कलाकृतीची निर्मिति अहेतुक असते. मनाला पटेल तो विषय घेऊन व रुचेल त्या पद्धतींत तो आपली कृति

निर्माण करतो. रासिकाला ती आवडली कीं ती तो मोल देऊन खरेदी करतो. पण औद्योगिक चित्रकलेचा सेवक स्वयंस्फूर्त उसळीनें कांहींच करीत नाहीं, तर प्रथमपासून दुसऱ्याच्या रुचीप्रमाणें स्वतःस अर्थप्राप्ति होण्याच्या बुद्धीनें काम करीत असतो. बरें, त्याची खरेदी करणाराहि स्वतःच्या इच्छेनुरूप हौसेकरितां हा खटाटोप करीत नसून आपल्या धंद्याच्या वाढीकरितां अथवा मालाच्या खपाकरितां त्याचा उपयोग करतो. म्हणूनच हें नवें स्वरूप धारण केलेल्या चित्रकलेस Commercial Art अथवा व्यापारी चित्रकला हें सार्थ नांव मिळालें.

या विवेचनाच्या स्पष्टीकरणार्थ मी आणखी एक दोन दाखले देतों म्हणजे वाचकांना माझें म्हणणें नीटपणें कळेल.

सध्यां संगीत व्यवसायांत काव्यगायनास ( Light Music ) विशेष बहर आला आहे. तें काव्यगायन म्हणजे काय ? तें संगीतें नव्हे काय ! तें संगीत खरेंच; पण शास्त्रोक्त संगीतांत ज्याप्रमाणें पद्यांच्या अर्थाला, श्रोत्यांच्या रुचीला इतकेंच नव्हे तर गायकाच्या आवाजालाहि महत्त्व नसतें; तर रागरागिण्यांची आळवणी हाच त्याचा आत्मा समजला जातो. तशी स्थिति काव्यगायनांत नसते. उलट काव्यगायक सभोंवतालच्या जनसमुदायाची वृत्ति व रुचि ओळखून अर्थपूर्ण कवितांची निवड चतुराईनें करतों व आरोहावरोह यांच्या वाटेला फारसें न जातां केवळ स्वरमाधुर्य व मोहक साथ यांच्या साहाय्यानें लोकरंजन शक्य तितक्या अल्प वेळांत करण्याच्या प्रयत्न करतो. आणखी एक उदाहरण घेऊं.

स्वतःच्या मतानें प्रबंधासाठीं विषय निवडून तो लालित्यपूर्ण अथवा विद्वत्तापूर्ण शब्दांत लिहिणारे लेखक प्रारंभीं लोकरुचीवर फारशी भिस्त ठेवीत नाहींत; अशा लेखकांचा एक वेगळा वर्ग असतो. आणि नियतकालिकांतून लोकांच्या आवडीनुरूप चमचमीत स्फुटें लिहिणाऱ्या लेखकांचा वर्ग वेगळा पडतो. खरें पाहातां लेखनकलेचे गुण एकाजवळ कमी आणि दुसऱ्याजवळ

अधिक असें कांही नसतें. पण त्याचा हेतु व विनियोग यांत फ़रक असल्यामुळें साहजिकच दोन्हींचें गुणधर्म वेगळे ठरले आहेत.

'औद्योगिक चित्रकला' व 'शास्त्रोक्त चित्रकला' यांची तुलना यापेक्षां फारशी वेगळी होणार नाहीं. एकींत प्रासंगिकता व लोकरंजन असतें तर शास्त्रोक्त कलेंत केवळ कलेचें रंजन असतें.

## मुखपृष्ठांचा नवा जमाना

यावरून माझ्या निवेदनाचा असा सारांश निघतो कीं चित्रकलेनें औद्योगिक प्रचाराच्या हेतूनें एका नव्या तंत्रांत प्रवेश केलेला आहे. प्रारंभीं बड्या चित्रकारांनीं या तंत्राची फारच हेटाळणी केली खरी ( जशी पट्टीच्या गवयांनीं काव्यगायनाला नाकें मुरडलीं ); परंतु या कलेनें चित्रकलेचें दालन पूर्ण व्यापलें आहे. या कलेच्या प्रसादाखेरीज आज कोणच्याहि चित्रकाराला जगाच्या व्यवहारांत संचार करतां येणार नाहीं. यासाठीं ठिकठिकाणच्या 'चित्रशाळां'नीं ( आर्ट स्कूलस ) या विषयाच्या अभ्यासाचे वर्ग मुद्दाम सुरू केले असून चित्रकलेच्या इतर विषयांपेक्षां या बाजूकडे नवशिक्षित विद्यार्थी चित्रकारांचा मोर्चा आघाडीचा आहे.

औद्योगिक चित्रकलेच्या विनियोगांत पुढील विविध विषय अतर्भूत होतात आणि त्यांचा अभ्यास मानसशास्त्राच्या अभ्यासापेक्षां वेगळा नाहीं. कारण प्रत्येक विषयाचें मूलभूत तंत्र म्हणजे 'लोकरुचि व हेतूचा प्रचार'.

ते विषय स्थूलमानानें पुढीलप्रमाणें होतील :

( १ ) जाहिराती ( Advt. Layouts ) ( २ ) बाटल्या, डबे, यांवरील लेबलस ( ३ ) पोस्टर्स ( ४ ) शो कार्डस् ( ५ ) फोल्डर्स ( ६ ) पत्रव्यवहाराचे कागदावरील कल्पनाचित्रें ( Letter headings ) ( ७ ) सिनेमांत दाखविल्या जाणाऱ्या स्लाइडस् ( ८ ) दर्शनी खिडक्यांमधील

( Show cases ) मांडणी ( Window display ) ( ९ ) पुस्तकें, सूचिपत्रें इत्यादींवर मुखपृष्ठें.

वर दिलेल्या सर्व प्रकारांच्या निर्मितीचा हेतु एकच असतो पण तंत्रांत मात्र पुष्कळच फरक असतो. आणि कोणीहि एक औद्योगिक चित्रकार या सर्व प्रकारांत प्रवीण असणेंहि त्यामुळें अशक्य असतें. या सर्वांतून सामान्यपणें अतिशय महत्त्वाची व कौशल्याची मानली गेलेली गोष्ट म्हणजे 'अक्षर रेखाटन' ( Lettering ). तसेंच या प्रकारांच्या निर्मितींत चित्रकला रेखाटण्याच्या पद्धती विविध असून प्रकाराच्या विनियोगानुरूप कुशल चित्रकार त्यांची योजना करतो.

औद्योगिक चित्रकलेंत पुढील चित्रपद्धतींचा समावेश होतो : ( १ ) तैलरंगी चित्रें ( २ ) पाणरंगी चित्रें ( ३ ) रेखाचित्रें ( ४ ) टिंबांनीं काढलेलीं ( Stiplling ) ( ५ ) कोरून काढलेलीं ( Scraperboard style ) ( ६ ) सुक्या कुंचलीनें काढलेलीं ( Dry Brush work ) ( ७ ) हवेच्या फवाऱ्यानें काढलेलीं ( Air brush work ).

आपल्याकडे वरील कित्येक प्रकारांचा उपयोग अजुनहि केला जात नाहीं. कारण तेथपर्यंत आपली प्रगति झालेली नाहीं, नाहींतर आपल्या मुखपृष्ठांच्या विविधतेंत आणखी भर पडली असती.

औद्योगिक चित्रकलेच्या वाढीबरोबर लोकरुचीलाहि अनेकविध वळणें मिळत गेलीं व म्हणूनच आज लोकरुचीचा चोखंदळपणा वाढलेला दिसतो. इतर क्षेत्रांबरोबरच औद्योगिक चित्रकलेनें वाङ्मय प्रांतांत प्रवेश केला व तेव्हांपासून मुखपृष्ठांचा जमाना सुरू झाला असें मानण्यास हरकत नाहीं.

माझ्या समजुतीप्रमाणें आतां मुखपृष्ठांच्या आगमनाचें मूळ आपणास सांपडलें. तेव्हां यापुढें मुखपृष्ठांच्या भूत आणि वर्तमान काळांतील अस्तित्वाबद्दलची व आवश्यकतेची निर्वेध चर्चा करणें सोपें जाईल. विषयाचें

स्वरूप अधिक सुलभ करण्यासाठीं तीन प्रश्न निर्माण करून त्यांचींच उत्तरें शोधणें सोयीचें ठरेल असें वाटतें. ते प्रश्न असे :

(१) मुखपृष्ठें कशीं असत ? (२) कशीं आहेत ? (३) कशीं असावींत ? या तीन प्रश्नांवर योग्य प्रकाश पडला तर मराठी मुखपृष्ठांसंबंधींचा विचार आपोआपच संकलित केल्यासारखा होईल.

## मुखपृष्ठें कशीं असावींत

आजकालच्या मराठी साहित्याचें बाह्य स्वरूप फारसें जुनें नाहीं. त्यामुळें त्यावरील मुखपृष्ठांचा इतिहासहि मोठा नाहीं — नव्हे, तो जवळजवळ नसल्यासारखाच आहे. या दृष्टीनी झकपकीचा हव्यास पुस्तकांच्याच नव्हे तर दुसऱ्या कुठल्याच बाबतींत आपल्या जुन्या लोकांनीं बाळगिला नव्हता. त्यामुळें त्यांना पुस्तकांच्या बाह्यांग शोभेची आस्था राहणें अशक्य कोटींतील होतें. पुस्तकांच्या मुखपृष्ठांचा उपयोग पुस्तकाचा खप वाढण्यासाठीं होऊं शकेल ही केवळ त्या काळीं कविकल्पना ठरली असती. अर्थात् त्या वेळीं तें मुखपृष्ठ नसून वास्तवार्थानें ' मल ' पृष्ठ असे. पुस्तक हाताळण्यानें लागणारा ' मल ' ( मळ ) आंतील विचारसंपत्तीला निदान नवेपणीं तरी लागूं नये हा हेतु असावा. त्यामुळें पुस्तक दर्शनीं आकर्षक दिसावें, कुणालाहि मोह पडेल अशी त्याची सजावट करावी असा विचार २०-२५ वर्षांपूर्वींपर्यंत फारच कमी ग्रंथकर्त्यांच्या मनांत आला असेल. नाहीं म्हणावयास आधुनिक मराठी भाषेचे आद्य जीवनाधार—कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांची अष्टपैलू नजर या दृष्टीनी नीटनेटकेपणाकडे थोडीफार वळली होती. ' टेम्पेस्ट ' ( मराठी रूपांतर ) नाटकावरील आपल्या परीक्षण-लेखांत ते लिहितात. *

* निबंधमाला, वर्ष २ रें. ' ग्रंथावर टीका, ' पान ३७८
( आवृत्ती ३ री, चित्रशाळा )

" सरते शेवटीं सांप्रत ग्रंथाच्या बाह्यस्वरूपाविषयींहि थोडेंसें लिहिणें इष्ट वाटतें. 'छापणी सुरेख', 'बांधणी मनोवेधक', 'कागद जाड', हीं स्वतः जरी केवळ क्षुल्लक होत; व प्रिन्टरसाहेबांची, बैंडरबुवांची तारीफ करणें हा ग्रंथावरील टीकेचा अवश्य भाग होय असें जरी आम्ही बिलकुल समजत नाहीं; तरी जेथें अंतर्बाह्य अशा दोहों प्रकारच्या रमणीयत्वाचा संयोग होतो तेथें दुसऱ्यासहि योग्यता येऊन त्याविषयीं केवळ उदासीन असणें हें संभवत नाहीं. उघडच आहे कीं नुसत्या पात्रास जरी स्वतःसिद्ध फारशी योग्यता नाहीं, तरी उत्तम अन्नाचा व उत्तम पात्राचा योग आला असतां तो परस्परांस शोभावह होतो ! "

अर्थात शास्त्रीबुवांच्या काळीं पुस्तकाचें मुखपृष्ठ हा विषयच नव्हता. त्यांनीं जें आपलें मत प्रदर्शित केलें आहे तें पुस्तकाच्या सर्वसामान्य बाह्यांगाविषयीं. पुस्तकाचा एकंदर नीटनेटकेपणा त्यांच्या बुद्धिप्रधान विचाराला मान्य होता इतकेंच. पण एवढाहि विचार इतरांनीं त्या काळीं ठेवला नव्हता. मुखपृष्ठ — नव्हे मलपृष्ठ बनविण्याचा सारा मक्ता जुळाऱ्याकडे ( Compositer ) असे. चित्रकारांचा ग्रंथाशीं कांहीं संबंध असूं शकेल असा कोणालाहि संशय नव्हता. नाहींतर कथामंजुषा, रासेलस, अरेबियन नाइट्स इत्यादि पुस्तकांवर त्यावेळच्या सुप्रसिद्ध चित्रकारांचीं चित्रें झळकलीं असतीं.

अर्वाचीन मराठींत ग्रंथरचना होण्यास सुरुवात होऊन ५० वर्षें होईतोंपर्यंत मुखपृष्ठांच्या विचारास स्वतंत्र अस्तित्व नव्हतें. अथवा बाह्यांग सजविल्यानें ग्रंथ खपूं शकतो ही कल्पना उदयास आली नव्हती.

पण पुढें पुढें बदलत्या काळानुरूप—अथवा ब्लॉकची कला विशेष प्रचारांत येऊं लागतांच पुस्तकाचें बाह्यांग शोभिवंत करण्याची हौस ग्रंथकर्त्यांना वाटूं लागली.

या बाबतींत पुणें येथील 'चित्रशाळा' व मुंबईतील 'मनोरंजन प्रेस' यांनीं मोठा पुढाकार घेतला. मराठी पुस्तकांवरील प्रारंभींचीं चित्रबद्ध मुखपृष्ठें या प्रकाशकांचींच बहुधा असत.

अर्थात त्यांत फारसा आकर्षकपणा अथवा स्वतंत्र कल्पना आढळत नसे. पण सुधारणा एवढीच कीं केवळ जुळणी ( Compose ) ऐवजीं एक कसलें तरी चित्र ( देवदर्शनास जाणारी बाई अथवा कथाचित्र ) असे. पुस्तकाचें नांव मात्र टाइपामध्येंच टाकलेलें असे. पुढें पुढें चित्र वेगळें व पुस्तकाचें नांव नमुनेदार हस्ताक्षरांत घालण्याची पद्धत सुरू झाली. परंतु तरीहि नवीन कल्पनांचा अभावच त्या बाबतींत होता. कुठलेंतरी चित्र व नांवासाठीं कुठलें तरी हस्ताक्षर ( Art Lettering ) एवढेंच ठराविक पद्धतीनें वापरलें जाई. त्यांत विशेष कलाकुसर, निदर्शकपणा वा चतुराई नसे.

केवळ ब्लॉकच्या कृतीच्या आगमनानें मुखपृष्ठांच्या क्षेत्रांत एक महत्त्वाची सुधारणा घडून आली यांत शंका नाहीं. पण तोंपर्यंतहि मुखपृष्ठांना स्वतंत्र स्थान प्राप्त झालें नव्हतें. पण जसजशी नियतकालिकें-मासिकें यांची संख्या वाढूं लागली, टीका, परामर्श, अभिप्राय वगैरे सदरें त्यांतून सुरू झालीं, तसतशीं मुखपृष्ठांच्या अस्तित्वाची जाणीव प्रकाशकांना अधिकाधिक होऊं लागली. त्याकडे काळजीपूर्वक पाहावें अशी आस्था उत्पन्न झाली. लोकांनीं पुस्तकाची प्रसंशा करावी, त्यांना तें बाह्यदृष्ट्याहि आकर्षक वाटावें अशी इच्छा ग्रंथकर्त्यांना होऊं लागली. या इच्छेंतूनच पुढें आजचें मुखपृष्ठ निर्माण झालें. यासाठीं आजच्या मुखपृष्ठांचें स्वरूप पाहण्याचा प्रयत्न करूं.

### मुखपृष्ठें कशीं आहेत ?

आजच्या काळांतील मुखपृष्ठांचें प्रतिनिधित्व घेऊं शकणारें पहिलें मुखपृष्ठ कोणच्या पुस्तकावर चमकलें हें सांगणें कठीण आहे. परंतु या बाबतींतील

सुधारणेचा पहिला टप्पा म्हणजे या कल्पनेचा स्वतंत्रपणें विचार होऊं लागला. ग्रंथविषयानुरूप मुखपृष्ठ असावें, निदान निरर्थक चित्राऐवजीं विषयाच्या अंतरंगाशीं स्थूलमानानें संबंध दर्शविणारी सूचक कल्पना तरी पुस्तकावर चित्रित करावी असें ग्रंथकर्त्यांच्या मनांत घोळूं लागलें. तोंपर्यंत कोठें कसलें चित्र वापरावयाचें यास कांहीं सुमार नसे. छापखानदाराच्या संग्रहीं असणारा कोणच्या तरी बाईचा अथवा देखाव्याचा ब्लॉक सर्रास वापरण्यांत येई. पुढेंपुढें ही पद्धत मागें पडत जाऊन प्रत्येक पुस्तकासाठीं मुद्दाम स्वतंत्र चित्र तयार करण्याची पद्धत प्रचारांत येऊं लागली.

या दरम्यानच्या काळांत चित्रकलेच्या प्रांतांत अनेक फेरबदल होत चालले होते. हजारों रुपये खर्चून राजघराण्यांतील मंडळींच्या सरसकट तसबिरा काढून घेणारे महाराजे आणि धनिक चित्रकलाषोकी यांची रसिकता संपुष्टांत आली होती. कारण फोटोच्या साहाय्यानें तें काम अधिक जलद आणि कमी खर्चांत होऊं लागलें होतें. त्यामुळें चित्रकलेला राजाश्रय सोडून जनताश्रय मिळविण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. परंतु सर्वसामान्य जनतेचा नागनरसोबा, जीवजीवत्या अथवा गणपतीबाप्पा यापलीकडे चित्रकलेशीं फारसा संबंध येण्याची शक्यता नव्हती; त्यामुळेंच अखेर दिवसेंदिवस व्यापक व प्रबळ होत चाललेल्या औद्योगिक क्षेत्राशीं चित्रकलेचें सख्य जमलें. या सख्यांतूनच औद्योगिक चित्रकलेचा जन्म झाला.

वाङ्मयसृष्टिहि त्यापासून निराळी राहूं शकली नाहीं. त्यामुळेंच पुस्तकाचें बाह्यांग सजविण्याची कामगिरी हळूहळू चित्रकाराकडे येऊं लागली. अर्थात हे चित्रकार त्या वेळीं ‘ कमर्शियल आर्टिस्ट ’ असे स्वतंत्रपणें समजले जात नसत अथवा तेहि स्वतःस तसें म्हणवून घेत नसत. लिथो प्रेसमध्यें काम करणारे, अंकलिप्या, नकाशे यांना लागणारीं ‘ डिझाइन्स ’ करणारे चित्रकार खरें पाहातां प्रारंभींचे ‘ कमर्शियल आर्टिस्ट. ’ पण ही कला अथवा ते तांत्रिक शब्द त्या वेळीं प्रचारांत नव्हते एवढेंच. त्याचप्रमाणें चित्रकलेचा व्यवसायहि

अगदीं स्वतंत्रपणें करण्याचें धाडस कोणाला त्या काळीं होत नव्हतें. त्यामुळें साहजिकच प्रारंभींचीं बाह्यांगाचित्रें 'फाईन आर्ट' (शास्त्रोक्त चित्रकला) क्षेत्रांतील चित्रकारांकडून काढवून घेतलीं जात. त्यांत श्री. लाड, नी. म. केळकर, पुरम, माळी, जुवेकर इत्यादींचीं चित्रें आढळतात. या चित्रकारांत मनुष्याकृति रेखाटण्याचा अभ्यास बराच परिणत झालेला असल्यामुळें, त्यांच्या चित्रांत अद्यावत् डौल नसला तरी, तीं चित्रें आकर्षक वाटत.




**२५ वर्षांच्या काळांतील मुखपृष्ठांच्या प्रक्रिया**

१९१० पासून आजपावेतों मुखपृष्ठांच्या योजनेंत साधारणपणें कसे फरक होत गेले याची वरील चित्रावरून वाचकांना कल्पना येईल.

त्यावेळच्या व आतांच्या रंगसंगतींत बरेच फरक पडले आहेत. पूर्वींचे रंग जरासे मातकट (मळकट) वाटत. तसेंच सध्यांप्रमाणें त्यांत तेजस्वीपणाहि नसे. 'तेजस्वी' हा शब्द मी चांगल्या अर्थानें वापरला आहे. इंग्रजामध्यें ज्याला 'Bright' अशी संज्ञा आहे त्यासच मराठींत तेजस्वी म्हणतां येईल.

या सुधारणेनंतर अलीकडे पुस्तकाचें मुखपृष्ठ पुस्तकाबरोबर बांधलें ( Bind ) न जातां पूर्ण आवरणाच्या ( Wrapper ) स्वरूपांत तें योजिलें जाऊं लागलें. खर्चाच्या दृष्टीनें तें बरेच महाग जात असलें तरी शोभेच्या दृष्टीनें मात्र तें विशेष परिणामकारक ठरलें आहे. त्यांतील दुसरा फायदा असा कीं, आंतील दोन्ही बाजूंस ज्या घड्या येतात, त्यांवर पुस्तक-विषयासंबंधी अथवा लेखकासंबंधीं मजकूर टाकतां येतो व तो सहजगत्या वाचला जातो.

गेल्या दहा वर्षांतील पुस्तकांच्या बाह्यांगांतील सुधारणा आपणा सर्वांच्या नजरेसमोरच्या आहेत. त्यांत हवेच्या पिचकारीनें ( Aerogrph ) रेखाटलीं अथवा रंगविलीं जाणारी चित्रें अधिक लोकप्रिय व आकर्षक होऊं लागलीं आहेत. हवेच्या पिचकारीच्या साहाय्यानें हें काम अल्प वेळांत अधिक सुबक व सफाईचें होऊं शकतें; चित्राचें तें एक प्रकारचें 'पॉलिश' आहे असें म्हणावयासहि अडचण नाहीं.

याप्रमाणें 'कमार्शियल आर्ट'च्या अनुषंगानें मुखपृष्ठांत आढळणाऱ्या नवनवीन चित्ररेखाटन पद्धति, प्रकाशकांची हौस, वाचकांची रसिकता, 'ब्लॉकमेकिंग', 'ऑफसेट' वगैरे तांत्रिक साधनांची शक्यता या सर्वांचा संगम होऊन आज मराठी वाङ्मय क्षेत्रांत मुखपृष्ठांचें नवें युग सुरू झालें आहे. पुस्तक कोणतें व कसेंहि असो – फडक्यांची लालित्यपूर्ण कादंबरी असो अथवा काकासाहेब कालेलकरांचीं 'भक्तिकुसुमें' असोत; त्यावर गुळगुळीत कागदावर छापलेलें रंगीत मुखपृष्ठाचें लेणें चढल्याशिवाय प्रकाशकाला त्याच्या खपाची खात्री वाटत नाहीं. बरें, तें सजविण्यासाठीं धडपड तरी काय कमी असते ? चित्रकाराच्या मागें चार वेळां, ब्लॉकमेकरच्या मागें सत्रा वेळां – व अखेर मुद्रकाची आराधना ! परंतु या कशाचाहि कंटाळा न करतां, प्रकाशक वा ग्रंथकर्ता तनमनधनपूर्वक प्रयत्न करतो. बाजारांत – दुकानदारांच्या 'शो केस' मध्यें इतर पुस्तकांच्या जोडीनें आपलें पुस्तक चमकावें – आणि त्यामुळें ते खपावें – हीच एक भावना त्याच्या ठिकाणीं असते.

## मु ख पृ ष्ठां ची स जा व ट

पण अजूनहि सध्यांच्या या क्षेत्रांतील मोठी उणीव चांगल्या चित्रकारांची आहे. प्रकाशक व पुस्तकें यांच्या संख्येच्या मानानें पाहातां चित्रकार थोडे आहेत. त्यामुळें अजून आपल्या मुखपृष्ठांत असावी तितकी विविधता नाहीं. अनेक मुखपृष्ठें एकछापी स्वरूपाचीं दिसतात. अर्थात प्रकाशकांची व वाचकांची आवडहि या पद्धतीला रुळून गेल्यामुळें हें ठीक आहे असें एका अर्थानें वाटतें. पण जरा प्रामाणिकपणें विचार केला असतां आपल्या चित्ररेखाटन पद्धतींत व कल्पनेंत अधिक सुधारणा होण्यासारखी आहे असें विचारी माणसाच्या ध्यानांत येईल.

कसें तें पाहा.

### मुखपृष्ठें कशीं असावींत ?

आतांपर्यंतच्या विवेचनावरून एक गोष्ट सिद्ध झाली कीं सामान्य वाचकांच्या वाढत्या रसिकबुद्धीचें कोडकौतुक पुरविण्यासाठीं प्रकाशक व लेखक चार पैसे अधिक खर्च करण्याचें धाडस करूं लागले आहेत. सर्वस्वीं बुद्धिजीवी टीकाकारहि वाङ्मयपरामर्श घेतांना बाह्यांगाबद्दल मत प्रदर्शित करण्यास मुळींच विसरत नाहींत. अर्थात त्या मताला फारशी किंमत नेहमींच देण्याची आवश्यकता नाहीं; कारण त्यांकडे पाहण्याची त्यांची दृष्टि बहुधा तांत्रिक नसते. सर्वसामान्य वाचक ज्याप्रमाणें आपलें मत प्रदर्शित करितो तितक्याच बेताची वाङ्मयीन टीकाकाराची टीका पुष्कळ वेळां असते. पुष्कळदां केवळ बाह्य देखाव्यावरच त्यांची भिस्त असते. वास्तविक मुखपृष्ठांबद्दल ( आंतील मजकूर सोडून ) स्वतंत्रपणें असा परामर्श अधिकारी चित्रकारांकडून घेतला जावा म्हणजे त्यांतील चित्रकौशल्याचा बरावाईटपणा अथवा प्रगति नीट समजून येईल.

मागील भागांत म्हटलें त्याप्रमाणें सध्यांच्या मुखपृष्ठांतला मोठा दोष म्हणजे एकछापीपणा तर आहेच. पण अजूनहि ग्रंथविषयानुरूप कल्पनेची

योजना होऊं शकत नाहीं. सामाजिक अथवा राजकीय विचारांचे प्रबंध; चरित्रें, ऐतिहासिक — भौगोलिक लेख, कादंबरी वा कथासंग्रह या बदलत्या विषयानुरूप जरूर त्या तऱ्हेच्या कल्पना योजून बाह्यांगाची रचना होणें अत्यावश्यक आहे. तसेंच सर्वांपेक्षां पुस्तकाच्या लेखकाच्या नांवास केव्हांहि अधिक महत्त्व देणें अत्यावश्यक आहे. पुस्तकांच्या दुकानांतील दर्शनी कपाटांत ठेविलेल्या पुस्तकाचें नांव रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्या माणसाच्या नजरेंत ठळकपणें भरावें ही कल्पना विशेषपणें लक्षांत ठेवून नांवांची रेखाटणी झाली पाहिजे.

ग्रंथांतील विषयास अनुरूप अशी मनोभूमिका निर्माण करण्यास मुखपृष्ठ हें फारच प्रभावी साधन आहे ही गोष्टहि ध्यानांत घेणें अवश्य आहे. आपल्यापैकीं पुष्कळशा वाचकांना माहिती असेलच कीं अमेरिकन चित्रपटाच्या प्रारंभीं त्यांतील कलावंतांची व पात्रांची यादी प्रेक्षकांना सादर करितांना चित्रपटाच्या विषयानुरूप पार्श्वसंगीताप्रमाणेंच पार्श्वचित्रें घालण्याची पद्धत आहे. शोकपर्यवसायी कथानकाप्रारंभीं शोकप्रद संगीत-योजना, पानें फुलें गळून गेलेलें झाड, ओसाड प्रदेश; गुप्तपोलीस कथा असली तर दबकत जाणाऱ्या पावलांचे आवाज, मधूनच पिस्तुलांचे बार, काळीकुट्ट आकृति अथवा दगडी रस्त्यावरील लांबवर पडलेल्या छाया — मधूनच किंकाळी; गंभीर सामाजिक चित्रपटाप्रारंभीं नुसतेच पिआनोचे स्वर, फुलांचे गुच्छ; प्रवासी वा जंगली चित्रपटाच्या प्रारंभीं जनावरांचे आवाज, झाडांच्या फांद्यांनीं रेखाटलेलें चित्रपटाचें नांव इत्यादि विषयानुकूल विविध भावना उत्पन्न करणाऱ्या गोष्टी दाखविण्याची पद्धत आहे. यामुळें चित्रपटाचें अंतरंग उघड न होतांहि प्रेक्षकाच्या मनावर चित्रपटविषयाची पकड बसते, तो खुर्चींत जरा सरसावून बसतो व पडद्याकडे विशेष आस्थेनें नजर रोंखतो.

मला वाटतें मुखपृष्ठांचें कार्य यापेक्षां फारसें वेगळें नाहीं.

## मुखपृष्ठांची सजावट

आपल्याकडे मानसशास्त्रदृष्ट्या अजून या कलेकडे पाहिलें जात नाहीं. तेथपर्यंत आपला विचार अद्याप पोहोंचलेला नाहीं. निर्मात्यांची रुचि जनसमुदायाप्रमाणें पालटतां उपयोगी नाहीं. निर्मात्यांनीं जनसमुदायाची रुचि पालटविणें, देशकालस्थितीनुरूप तिला वळण देणें अवश्य असतें. लोकाभिरुचीला केवळ सुंदर स्त्रियांचीं चित्रें आवडतात म्हणून जेथें तेथें वेगवेगळ्या 'पोझ' मधील स्त्रिया रेखाटावयाच्या व तेवढ्या कल्पनेवरच पुस्तकाची बाह्यांग शोभा वाढवावयाची ही हौस आतां पुरे झाली ! 'लोकांना आवडतें म्हणून करावें लागतें हो—' ही जुनी सबब सांगण्याची असाहाय्यता टाकून देऊन लोकांना जें आवडावयास पाहिजे तें देण्याची निर्मात्या प्रकाशकांनीं पराकाष्ठ करावयास पाहिजे.

### पाश्चात्यांतील उच्च अभिरुचि

यासाठीं ज्यांच्यापासून आपण मुखपृष्ठरचनेंतील तांत्रिक भाग थोडाफार शिकलों ते पाश्चात्य लोक काय करितात तें पाहूं.

सर्वसाधारण अशी समजूत आहे कीं, पाश्चात्य लोकांत — त्यांच्या नीतिविषयक कल्पना व बंधनें आपणांपेक्षां ढिलीं असल्यामुळें —स्त्रियांच्या अथवा तत्सम चित्रांना जास्त महत्त्व देण्यांत येतें. साधारणपणें त्यांच्या चित्रपटांत, पुस्तकांत, मासिकांत नीतीदृष्ट्या गर्हणीय असें बरेंच असतें अशा आपल्याकडील संस्कृतिरक्षक म्हणविणाऱ्या सभ्य गृहस्थांची कल्पना होऊन बसली आहे. व या कल्पनेच्या पुराव्यादाखल त्यांचीं उघडपणें होणारीं आलिंगन-चुंबनें, घटस्फोटविषयक कथा, नाच ( Ball ) इत्यादि गोष्टींकडे ते बोटें दाखवितात.

पण अशी कल्पना करून घेऊन त्यांच्या व आपल्या सामाजिक

नीतिविषयक बंधनांत फरक आहे तेव्हां त्यांच्या नैतिक शिथिलतेमुळें त्यांच्या कलेलाहि तोच काळीमा लागतो, असें म्हणणें गैर आहे.

उलट अलीकडे अमेरिकन नियतकालिकांच्या आणि पुस्तकांच्या मुखपृष्ठांत फारच विविधता दिसूं लागली आहे हें कुणाहि स्पष्टदृष्टी वाचकाला आढळून येईल. 'सॅटर्डे ईव्हिनिंग पोस्ट,' 'फॉर्च्युन,' 'कोलीअर,' 'लाइफ', 'टाइम', इत्यादि नियतकालिकांवरील बाह्यांगें नवनवीन कल्पनांनीं सजलेलीं असतात. आणि या प्रत्येक नियतकालिकानें मुखपृष्ठाबाबत स्वतःची अशी विशिष्ट दृष्टि ठेवलेली असते.

उदाहरणार्थ 'सॅटर्डे ईव्हिनिंग पोस्ट'वर कथाचित्रासारखें एकादें चित्र असतें. तें चित्र पाहिल्यावर तो एकाद्या गोष्टीचाच भाग असावा असें सहजपणें समजून येतें. एकदां त्याच्या नाताळांतील एका खास अंकावर पुढीलप्रमाणें चित्र होतें :

एका ठिकाणीं एक भलेंमोठें मेजवानीचें मेज असून चमचे, बश्या, पेले, बाटल्या यांचा त्यावर खच पडलेला असतो. त्या सगळ्या बाटल्या अर्थात रिकाम्या व उलटच्यासुलटच्या झालेल्या असतात. मेणबत्त्या पुरत्या जळून गेलेल्या असून मेणाचें थारोळे प्रत्येक स्टॅंडखालीं सांचलेलें असतें. वरून खालपर्यंत पताका लोंबत असून खुर्च्याहि उलटच्यापालटच्या पडलेल्या दाखविलेल्या असतात. आणि तेथें एकच नोकर (वेटर) अर्धोन्मीलित पेंगत्या डोळ्यांना जमिनीवरून उठण्याच्या प्रयत्नांत असतो.

या चित्रांतील प्रत्येक लहानसहान वस्तु स्पष्ट दाखविलेली असून एकंदर चित्र कलादृष्ट्या अगदीं परिपूर्ण होतें. तें पाहातांच वाचकाला प्रथम सुंदर चित्राबद्दल आनंद होईल व मग त्यांत अप्रत्यक्ष दर्शविलेल्या विनोदी कल्पनेचें मनापासून हंसूं येईल. त्यांतली कल्पना एवढीच होती कीं नाताळच्या मेजवानीचा शेवट नेहमीं कसा होतो. मेजवानीपूर्वीं सर्वत्र स्वच्छता, नीटनेटकेपणा असतो. पण भरपूर जेवण व त्यानंतर मद्यपानाचा कार्यक्रम रंगांत आला म्हणजे सभ्य

माणसेंहि नानाविध चाळे करूं लागतात व अखेर खुर्च्या उलटच्या पडतात, पताका फाटतात व मेजवानी संपते !

विषय नेहमींचाच पण सुंदर कल्पनाचातुर्यानें व चित्रकौशल्यानें त्या अंकाचें बाह्यांग मोठें नमुनेदार झालें होतें. उलटपक्षीं मेजवानीचा शेवट दाखविण्याऐवजीं चित्रकारानें मेजवानीचा प्रारंभच दाखविला असतां तर वाचकांना तो नेहेमींचाच विषय वाटला असता व त्यांत स्वारस्य उरलें नसतें.

**बाह्यांगांत अद्यावतपणा कसा येईल ?**

सारांश कल्पनेंत विविधता व नाविन्य आणि चित्रपद्धतींत कौशल्य या संयोगानें बाह्यांगांत अद्यावतपणा येऊं शकेल आणि वाचकांच्या बुद्धीला उजाळा दिल्यासारखा होईल. ' फॉर्चुन ' या अमेरिकन मासिकाचींहि बाह्यांगें मोठीं चातुर्यपूर्ण आणि कल्पनारम्य असतात. त्यांत एक प्रकारचें विचारवैभव व बुद्धीचा ताजेपणा प्रतिमासीं आढळून येतो. वाचकांनीं अशा मासिकांवरील चित्रें मुद्दाम लक्षपूर्वक पाहावींत म्हणजे माझ्या निवेदनाचें मर्म ध्यानांत येईल.

' फॉर्चुन ' मासिकांत दर महिन्यास जगांतील एका कोणच्यातरी मोठ्यांत मोठ्या उद्योगधंद्याचा संपूर्ण परिचय दिला जातो व अंकांतील तें प्रमुख सदर ( Main Feature ) म्हणून गणलें जातें. त्यामुळें साहजिकच मुखपृष्ठावर त्या अनुषंगानें एकादें कल्पनारम्य चित्र योजिलें जातें. एकाद्या पोलाद कंपनीचा परिचय जर अंकांत असेल तर लोखंडाची राक्षसी मूस तांबडा-पिवळा लोहरस सांच्यांत ओतीत असतांना वाचकांना दर्शनीं दिसेल; तसेंच रासायनिक कंपनीची ओळख ज्या अंकांत असेल त्याचें बाह्यांग शेंकडों वार लांबवर पसरलेल्या रसायनाच्या बरण्यांनीं चित्रित केलेलें असेल.

हिंदुस्थानांत सर्वांत अधिक लोकप्रिय झालेल्या ' टाइम ' नामक मासिकाचीं मुखपृष्ठें सुद्धां अशा विशिष्ट कल्पनांनीं सुशोभित झालेलीं असतात.

# मराठी पुस्तकांवरील

## इंग्रजी मुखपृष्ठांचे कांहीं उत्कृष्ट नमुने




गेल्या युद्धाच्या प्रारंभीं युद्धांत गुंतलेल्या शत्रुमित्र पक्षांतील सर्व व्यक्तींचीं चित्रें त्यावर छापलीं जात. त्यांतहि फारच चातुर्य आढळून येई. एकदां जर्मन पाणबुड्यांचा प्रमुख डोनिझ याचें चित्र त्यावर छापलें होतें व पार्श्वभूमीला लांबवर पसरलेला खवळलेला समुद्र दाखवून पाणबुडीच्या पेरिस्कोपप्रमाणें समुद्रांतून एक सर्पाचें तोंड वर आलेलें दाखविलें होतें.

मासिकांप्रमाणें त्यांच्याकडील पुस्तकांचींहि बाह्यांगें विविध कल्पनांनीं नटलेलीं असतात. 'वुद्‌रींग हाइट्स', 'जेन आयर' वगैरे कादंबऱ्यांवरचीं चित्रें अगदीं नव्या धर्तीवर केलेलीं असून 'लाइफ' साप्ताहिकांत त्यावर स्वतंत्र लेख आलेला होता. वाचकांनीं, पुस्तकें विकत घ्यावयाचीं नसलीं तरी, मुद्दाम पुस्तकांच्या मोठ्या दुकानांत जाऊन अशा नव्या पुस्तकांवरील बाह्यांगें अवश्य लक्षपूर्वक पाहवींत.

## मुखपृष्ठांची सजावट

### लोकरुचि पालटवितां येते

'लोकरुचि' या शब्दाचा आपल्याला फारच बाऊ वाटतो. पण जनसमुदायाची मनोवृत्ति हीं निसर्गतःच खुळी आहे. बुद्धिमान् माणसें लोकरुचि पालटवूं शकतात. पण त्यासाठीं आपल्या जवळचें कर्तृत्व मोठ्या दर्जाचें असावें लागतें. ज्यांना कांहींच करावयाचें नाहीं व ठराविक चाकोरींतून जावयाचें आहे ते 'लोकांना आवडतें म्हणून आम्हांला तसें वागावें लागतें', असें म्हणतात. यासाठीं लोकरुचिपेक्षां स्वतःच्या अभ्यासावर व परिश्रमांवर अधिक विश्वास ठेविला पाहिजे.

राष्ट्रोत्थानाच्या दृष्टीनें जसें तेजस्वी व निरोगी वाङ्मय आपल्या भाषेंतून अधिकाधिक निर्माण व्हावयास पाहिजे तद्वतच त्या वाङ्मयाच्या जोडीनें मिरविणारी चित्रकला अधिक हेतूपूर्ण असावी असाहि आग्रह धरिला पाहिजे.

पुढारी आणि देशभक्त यांच्या प्रयत्नांस अनुरूप व अनुकूल असेंच आपल्यां राष्ट्रांतील प्रत्येक लहानसान कलेचें अंतिम कार्य असलें पाहिजे. नाहींतर एकीकडे बाष्कळ प्रेमाचे चित्रपट पाहात बसावयाचें व अखेर उभे राहून 'वंदे मातरम्' म्हणावयाचें असा परस्परविरोधी प्रकार होतांना दिसतो. कादंबरीच्या पानांपानांतून मारे देशभक्तीच्या, राष्ट्रस्वातंत्र्याच्या गप्पा मारावयाच्या व मुखपृष्ठावर मात्र प्रणयी युगुलांची कुजबूज चाललेली दाखवावयाची. ही आपल्या पुस्तकांच्या बाह्यांगांची स्थिति आणि विसंगति यापुढें बदललीच पाहिजे.

सुवाच्य व चतुर कल्पना, निर्दोष चित्रकृति ही आपली पहिली गरज आहे. तद्वतच ग्रंथविषयानुरूप चित्राची मांडणी असावी हीहि आवश्यकता आहे. कादंबरी असेल तर त्या कादंबरींतील एकाद्या विशेष प्रसंगाचें चित्र ( प्रणय-कूजन हा विशेष प्रसंग नव्हे ), राजकारणविषयक प्रबंध असेल तर आवश्यक

तो नकाशा व सुवाच्य अक्षरांतील नांव ( Lettering ), प्रवासवर्णन असेल तर प्रवासाचा मार्ग अथवा प्रेक्षणीय स्थळाचा एकादा देखावा ( Land-scape or Seascape ), सामाजिक प्रबंध असेल तर त्यालाहि अनुरूप असें बोलकें चित्र – अशीं मुखपृष्ठें योजण्याचा चित्रकारानें प्रयत्न केला पाहिजे. मुखपृष्ठांच्या कल्पनानिर्मितीचें कार्य बहुधा ग्रंथलेखकच करीत असतात, हें ठीकच आहे. परंतु त्यांनीं ही कल्पना चित्रकला दृष्ट्या कितपत शक्य कोटींतील आहे याचा अंदाज घेण्याचीहि संवय ठेवणें आवश्यक आहे. शक्य असेल तर स्वत:जवळ असलेलें सर्व चित्रकौशल्य खर्च करून आपल्या मनांत घोळणारी कल्पना पेन्सिलीनें रेखाटण्याचा प्रयत्न त्यांनीं करावा म्हणजे कल्पनेंतील साहित्य चित्रदृष्टीनें प्रभावी आहे कीं नाहीं याचा अंदाज त्यांचा त्यांनाहि येऊं शकेल.

याप्रमाणें गुणदोषांची चर्चा करितांना आजपावेतों प्रत्यक्षांत दिसणारीं चांगलीं मुखपृष्ठें व तीं रेखाटणारे चित्रकार आपणाला विसरतां येणार नाहींत. आपल्या भाषेंतल्या अनेक पुस्तकांचीं बाह्यांगें समर्पक व आकर्षक झालेलीं आहेत व वर उल्लेखिलेले दोष विसरतां – कलादृष्ट्याहि आपलें मराठी वाङ्मय प्रगतिशीलच आहे हें कोणालाहि मान्य करावें लागेल. बाह्यांगाबाबत प्रामाणिकपणें श्रम घेणारे रसिक प्रकाशक पुष्कळच आहेत. त्यांच्या प्रगतिबद्दल आपण त्यांचें मन:पूर्वक अभिनंदन केलें पाहिजे. अशा प्रकाशकांत जुन्यांपैकीं चित्रशाळा, देशमुख कंपनी, महाराष्ट्र ग्रंथ भाण्डार, कॉन्टिनेन्टल, रामकृष्ण बुक डेपो व के. भि. ढवळे आणि नव्या प्रकाशकांत मङ्गल साहित्य प्रकाशन, पद्म प्रकाशन इत्यादि नांव घेण्यासारखे प्रकाशक आहेत. या प्रकाशकांबरोबरच श्री. दलाल, मुळगांवकर, बाम, ‘ आर्ट कॉर्नर ’ वगैरे चित्रकारांचेंहि अभिनंदन होणें जरूर आहे. कारण त्यांचाहि वांटा या प्रगतींत फार मोठा आहे.

## सजावटीचा खर्च कमी हवा

आणि अखेर मुखपृष्ठांसाठीं होणाऱ्या खर्चाबाबत आपण थोडी चर्चा करूं. पहिली गोष्ट अशी कीं सुरुवातीसच सांगितलें त्याप्रमाणें मुखपृष्ठांवर होणारा ३०-४० टक्के खर्च हा सयुक्तिक आहे किंवा नाहीं? कारण त्या खर्चाचा भार अखेर वाचकांवरच पडत असतो.

सध्यां युद्धकाळ (खरें म्हणजे आतां युद्धानंतरची परिस्थिति) असल्यामुळें हा आंकडा वाढला आहे असें सांगण्यांत येतें. परंतु ही परिस्थिति पूर्वपदावर येतांच या दराप्रमाणें इतर दरहि कमी होतील, एकंदर बाजारभावच उतरेल. तथापि सध्यांचा बाह्यांगासाठीं करावा लागणारा हा खर्च मोठा आहे यांत मुळींच शंका नाहीं. तो कमी करण्यासाठीं प्रकाशकांनीं प्रयत्न करणें जरूर आहे. कारण अगोदरच आपल्याकडे पुस्तक विकत घेऊन वाचण्याची प्रवृत्ति कमी, त्यांत पुस्तकांच्या किंमती वाढलेल्या राहिल्या म्हणजे वाचकांचें प्रमाण आणखी कमी होणार. वाचनाची प्रवृत्ति कमी होणें ही प्रकाशकाच्या दृष्टीनें कांहीं फायद्याची गोष्ट नव्हे. तेव्हां मुखपृष्ठावरचा हा भारी खर्च कमी करण्याचा मार्ग आपापल्या परीनें प्रकाशकांनीं शोधून काढणें जरूरीचें आहे.

याला एक उपाय म्हणजे जेथें एका रंगांत काम भागत असेल तेथें दोन रंगी मुखपृष्ठ न करणें, अथवा तीन रंगाशिवाय चालूं शकेल तेथें दोन रंगी चित्र वापरणें. तीन रंगी चित्राशिवाय पुस्तकच तयार होऊं शकत नाहीं ही कल्पना बाजूला सारली पाहिजे. असा कांहीं तांत्रिक दृष्ट्या विचार झाला तर खर्चाचें हें वाढलेलें प्रमाण थोडेंसें कमी करतां येण्यासारखें आहे.

पुस्तकांचा बराचसा मोठा खर्च कागदावरहि अवलंबून असतो. त्यासाठीं त्या बाबतींतहि शक्य तेवढी काटकसर साधण्याचा प्रयत्न व्हावयास पाहिजे. सारांश पुस्तकांच्या वाढत्या किंमती सोयीच्या व्हाव्या एवढाच माझ्या म्हणण्याचा अर्थ आहे. प्रकाशकांच्या त्याबाबत बऱ्याच अडचणी

असतील याची सर्वसामान्य वाचकालाहि सध्यां कल्पना आहे. पण पुस्तकांच्या किंमती कमी असणें ही आपल्या भाषेच्या दृष्टीनें फारच आवश्यक गोष्ट आहे, हें निःसंशय.

मला वाटतें आपणाला हव्या असलेल्या तीन प्रश्नांचीं उत्तरें आपणास बऱ्याच अंशानें मिळालेलीं आहेत. यांतून जर कांहीं राहिलें असेल तर वाचकांनीं स्वतःशींच विचार करून अथवा पूर्वी सांगितल्याप्रमाणें पुस्तकालयांत जाऊन नव्यानें प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें पाहाण्याची संवय ठेवावी. प्रत्यक्ष पाहाण्यानें जेवढा विषयबोध होईल तेवढा, असले विषय केवळ वाचल्यानें होणार नाहीं. कारण हा विषय फारसा साहित्याच्या कक्षेंतला नसून पुष्कळसा तांत्रिक आहे. आणि तांत्रिक ज्ञान केवळ स्वानुभवानेंच मिळूं शकतें.



रावसाहेब नारायण गोविंद चापेकर यांच्याकडून —

# साहित्यिकांना सामाजिक जोखीमदारीची जाणीव

वाङ्मय निर्माण करणारा हाहि एक समाजाचा घटक आहे. आणि त्या दृष्टीनें कांहीं सामाजिक कर्तव्यें नि बंधनें त्याच्यावर अवश्य पडतात. परंतु या किंवा इतर कलेचे निर्माते आपल्या कलेला सामाजिक हिताहिताचा निकष लावून घेण्यास तयार नाहींत ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे, असें या चर्चेत म्हटलेलें असून साहित्यिकांना त्यांच्यावरील सामाजिक-जोखीमदारीची जाणीव निस्पृहपणें करून दिलेली आहे.

प्र०—भारतीय सर्वसामान्य जनतेची राष्ट्रीय दानत वाढल्याशिवाय कोणतीहि चळवळ येथें चिरयशस्वी होऊं शकत नाहीं. या परिस्थितींत आज केवळ उच्च ग्रंथ-वाङ्मयाच्या मागें लागून, लोकजागृतीच्या हेतुपूर्ण वाङ्मयाची हेळसांड करणें हा सामाजिक अपराध आहे, हें विधान आपल्याला कितपत बरोबर वाटतें ?

उ०—जनतेची दानत वाढल्याशिवाय कोणतीहि राष्ट्रीय चळवळ, कोणतेंहि सार्वजनिक कार्य यशस्वी होणार नाहीं हा निरपवाद सिद्धांत आहे.

परंतु दुर्दैवानें आज आमच्या राष्ट्राची दानत शून्य बिंदूवर आहे ह्यांत संशय नाहीं. परकी सत्तेच्या अमलाखालीं ज्या समाजांना राहावें लागतें ते समाज नैतिकदृष्ट्या अधोगतीला गेलेले असतात हें ऐतिहासिक सत्य आहे. दांभिकपणा, ढोंगीपणा ह्यांना परसत्तेंत वरभाव येतो. चांगल्यावाइटाच्या कल्पना विपर्यस्त होतात. चांगलें तें वाईट ठरतें; वाइटाला चांगलेपणा येतो. थोडक्यांत म्हणजे मूल्यें बदलतात. परकी सत्ता पावलेंपावलीं नडत असल्यामुळें आपल्या मनाचें समाधान होईल अशा रीतीनें दुष्कृत्यांचें समर्थन करितां येतें; अतिक्रमाला सोज्ज्वल स्वरूप देतां येतें. आज हिंदी समाज ह्या कोटीला पोहोंचला आहे.

अशा रीतीनें दानत वालवून बसलेल्या समाजाचा उद्धार करण्याचीं जीं साधनें आहेत त्यांपैकी, ग्रंथनिर्मिति हें एक आहे. ही ग्रंथनिर्मिति कोणत्या प्रकारची असावी हा प्रश्न सध्यां समाजांत चर्चिला जात आहे. ही चर्चा करितांना उच्च व अनुच्च वाङ्मय असा एक भेद केला जातो. मला वाटतें हा भेद शास्त्रशुद्ध नाहीं. प्रचलित वादविवादांत ललित वाङ्मय — विशेषतः कादंबऱ्या व लघुकथा — हें उच्च वाङ्मयांत मोडत नाहीं असें मानतात. माझ्या समजुतीनें ही चूक आहे. शास्त्रीय वाङ्मय तेवढेंच उच्च वाङ्मय असा आग्रह टिकणार नाही. ललित वाङ्मय आपल्यास हीन वाटतें ह्याचें कारण त्यांतील कामुकता हें होय. कोणताहि मनोविकार — मग तो काम असो कीं क्रोध असो; लोभ असो अगर मत्सर असो — ज्या वाङ्मयप्रकारानें उद्दीप्त केला जातो तो सर्व वाङ्मयप्रकार हीन स्वरूपाचा समजला पाहिजे. मनोविकार हे सहज आहेत. त्यांच्या उद्गमाकरतां उपदेश करावा लागत नाहीं. उलट त्यांचें नियंत्रण करण्याचा उपदेश करावा लागतो. मनुष्य हा स्वार्थी आहे तेव्हां 'तुम्हीं स्वार्थी व्हावें' ही शिकवण अथवा त्यांचा स्वार्थ प्रज्वलित होईल असें लिखाण हें निंद्यच गणलें पाहिजे. ललित वाङ्मय जेव्हां वाचकाचें मनोरंजन करून त्याला उदात्त व उच्च वातावरणांत नेऊन सोडतें तेव्हां तें उच्च वाङ्मयाच्या पंक्तीला बसलेंच पाहिजे. मानसशास्त्र हा या वाङ्मयाचा पाया आहे; सामाजिक

चालीरीतींचा अभ्यास ही त्याची उभारणी आहे व मानसिक शुद्धता हें त्याचें छप्पर आहे. अशा वाङ्मयाला हीणकस म्हणतां येणार नाहीं. सध्यां जें ललित वाङ्मय निर्माण होत आहे तें उच्च वाङ्मयांत मोडणार नाहीं हें खरें; परंतु त्यामुळें ललिताला दोष देतां येणार नाहीं. तरुणतरुणींचें लग्न लावणें हा एकच हेतु मनांत बाळगून कादंबरी थाटली जाते. राजकारण, समाजकारण, धर्मकारण इत्यादि विषयांत विद्यमान लेखक अनभ्यस्त असतात. समाजाच्या विविध अंगांचा अभ्यास ज्यानें केला नाहीं त्याच्याकडून विचारप्रवर्तक गोष्टी लिहिल्या जातील अशी आशा बाळगणें व्यर्थ आहे. समाज सुधारण्याच्या कामीं ज्यांचा तादृश उपयोग नाहीं अशा आशुकमाशुकांच्या गोष्टींना उच्च वाङ्मयांत कोणीहि स्थान देणार नाहीं.

वाङ्मयाचें दुसऱ्या तऱ्हेनें वर्गीकरण करितां येण्यासारखें आहे. कांहीं वाङ्मय चिरंतन स्वरूपाचें तर कांहीं तात्कालिक स्वरूपाचें असतें. समाजापुढें नेहमींच दोन प्रकारचे प्रश्न असतात. एक क्षणिक महत्त्वाचे दुसरे स्थायी महत्त्वाचे. पहिल्यांत प्रचारकी वाङ्मय येतें. आपल्याला एकादी गोष्ट नडत असल्यास ती नड दूर करून कार्यभाग साधणें हा क्षणिक वाङ्मयाचा हेतु असतो. त्यासाठीं लोकमत बनवावें लागतें. सध्यां राष्ट्रापुढें स्वातंत्र्यसंपादन हा विषय आहे. त्याकरतां पारतंत्र्यामुळें होणारी हानि लोकांस समजावून देऊन पारतंत्र्य नष्ट करण्याच्या कामी त्यांना उद्युक्त करणें हें उदाहरण म्हणून देतां येईल. लोकजागृति हा शब्द अशा अर्थानें वापरतात. हें काम पुढें ढकलण्यासारखें नसल्यामुळें अगदीं निकडीचें असतें. युद्धाचीं चिन्हें दिसूं लागतांना, युद्ध चालू असतांना व युद्ध संपल्यावर जीं स्थित्यंतरें होतात त्यांस अनुसरून प्रचंड वाङ्मय निर्माण होतें; हें सर्व नैमित्तिक वा हंगामी वाङ्मय होय. ह्यामध्यें पालटलेल्या स्थितीची जाणीव लोकांना करून द्यावयाची असते.

चिरंतन वाङ्मयाची प्रकृति ह्याहून वेगळी आहे. प्रथमतः तें देशकालातीत असतें. लोकशिक्षण, मनुष्याची बौद्धिक, नैतिक व सांस्कृतिक

उंची वाढविणें हा ह्या वाङ्मयाचा उद्देश असतो. ह्यासाठीं त्याला उच्च वाङ्मय म्हणणें योग्य होईल. कोणत्याहि ग्रंथालयांत अशा विषयावरील ग्रंथांना प्रथमस्थान मिळालें पाहिजे. मानवाला सुबुद्ध करणें हें ह्या उच्च वाङ्मयाचें ध्येय असल्याकारणानें त्याला शिक्षणाचे नियम लागू पडतात. लोकांना जें परिचित आहे; जें त्यांच्या नेहमींच्या अनुभवाचें आहे; आणि म्हणून जें त्यांच्या आकलनशक्तीच्या आटोक्यांत आहे तद्विषयक वाङ्मय निर्माण झालें तरच तें लोकशिक्षणाचें कार्य करूं शकेल. हेंच जिवंत वाङ्मय होय. ह्याची वाढ पायरीपायरीनेंच होत असते व झाली पाहिजे. ज्ञातांतून अज्ञाताकडे हें शिक्षणशास्त्राचें मुख्य सूत्र असतें. ह्याला अनुसरून ग्रंथनिष्पत्ति झाली तरच ती लोकोपयोगी होईल. लोकांचें जीवन आणि वाङ्मय ह्यांची फारखत होतां कामा नये. ह्या कसोटीनें आजच्या वाङ्मयाचा विचार केला तर निराशा होणें स्वाभाविक आहे. तात्कालिक उपयुक्ततेचें वाङ्मय बंदीखान्यांत पडावयाच्या भीतीनें निर्माण होऊं शकत नाहीं. लोकशिक्षणाला वळण लावणें आपल्या स्वाधीन नाहीं. प्रगल्भ व प्रबुद्ध समाजाच्या युरोप-अमेरिकेंत प्रसूत झालेलें वाङ्मय आम्हीं आपल्या विद्वत्तेचा डौल मारण्यासाठीं हिंदुस्थानांत आणतों; परंतु बिनमशागतीच्या आमच्या जमिनींत तें मुरत नाहीं. विद्यापीठानें ह्या दृष्टीनें विचार केला नाहीं म्हणून मराठीतील आजकालचें वाङ्मय नीरस वाटतें. तें आम्हांला पाहुण्यासारखें असतें. पाहुणा जसा ओटीवर असतो, घरांत मिसळत नाहीं तद्वत् आमच्या वाङ्मयाची स्थिति आहे. तें उपरी असतें. ही झाली उच्च वाङ्मयाची स्थिति. अभ्यास व विद्वत्ता ह्यांच्या अभावीं ललित वाङ्मय उच्च वाङ्मयाच्या पदवीला येऊं शकत नाहीं. कामुकता सर्वांना समजते. लोकांची त्यामुळें करमणूक होते. म्हणून अप्रबुद्ध व असंस्कृत मनें रिझविणारें ललित वाङ्मय निर्माण होतें. तात्पर्य सध्यां उच्च वाङ्मयहि निर्माण होत नाहीं, निदान उपयुक्त असें होत नाहीं व लोकजागृतीचें हेतुपूर्ण वाङ्मयहि निर्माण होत नाहीं, हा माझा सिद्धांत आहे.

## जो खी म दा री ची   जा णी व

प्र०——साहित्यिक आणि तत्सम इतर कलावंत हे कोण्यातरी समाजाचे घटक असतातच. या नात्यानें त्यांनीं आपल्या कला-निर्मितीला सामाजिक हिताहिताचा निकष लावणें आपल्याला इष्ट वाटतें काय? यासाठीं एकादी नियंत्रणसमिति असावी हें आपल्याला कितपत योग्य नि व्यवहार्य वाटतें?

उ०——कलेचे निर्माते आपल्या कलेला सामाजिक हिताहिताचा निकष लावून घेण्यास तयार नाहींत ही खेदाची गोष्ट होय. कलाच काय पण प्रत्येक घटना लोकहिताच्या निकषावर तावूनसुलाखून घेणें अवश्य आहे. सर्व सृष्टि-पार्थिव, सजीव व वैचारिक — परमेश्वरानें मानवी समाजाच्या उन्नतीकरतां निर्माण केली आहे हा सिद्धांत ज्याला पटेल तो कलेकरतां कला हा सिद्धांत प्रतिपादन करावयास खचित कचरेल. समाजहिताचें कला हें साधन आहे. हें साधन जितकें विकसित असेल त्या प्रमाणांत साध्यसंपादनाच्या कामीं आपणांस यश येईल. परंतु साध्य दृष्टिआड करून नुसत्या कलेच्या उत्कर्षाच्या मागें आपण लागलों तर त्यापासून हानि झाल्याशिवाय राहाणार नाहीं. हा कटु अनुभव आज येत आहे. वक्तृत्व ही कला आहे. ह्या कलेंत कुशल असलेला माणूस श्रोत्यांचें मनरंजन करितो; त्यांस सज्ञान करीत नाहीं. लेखनकलेचीहि हीच गत आहे. हल्लीं अर्थापेक्षां शब्दाला अधिक महत्त्व देण्यांत येतें. लेखक वाचकाला शब्दमुग्ध करूं पाहातो. यशस्वी लेखकाचें हेंच लक्षण होऊं पाहात आहे. तात्पर्य, समाजाच्या हिताहिताकडे दुर्लक्ष करून कलेचें पोषण करणें अनर्थावह आहे असें मी मानतों.

ह्यासाठीं नियंत्रणसमिति असावी असें सुचविण्यांत येतें. ही सूचना अगदींच त्याज्य नाहीं. तथापि सर्व समाजाची अभिरुचि भ्रष्ट झाली असेल तर नियंत्रक मिळण्यास अडचण पडेल. समाजांतून नियंत्रक येणार; तेव्हां समाजाच्या दोषांनीं तेहि लिप्त — अंशतः तरी — असणारच. समाजाची सुधारणा हळूहळू होते. सत्रुचि व असत्रुचि ह्यांची हद्द निश्चित करणेंहि सोपें नाहीं;

विशेषतः वैचारिक क्रांति होत असतां हें फारच कठीण असतें. अशा अडचणी कितीहि असल्या तरी लोकाभिरुचीला वळण लावण्याचे जे अनेक उपाय आहेत त्यांपैकीं नियंत्रणसमिति हा आहे ह्यांत शंका नाहीं. कृष्णराव मराठ्यांच्या एकाकी प्रयत्नाला अंशतः यश आलें आहे मग समितीला कां येऊं नये ?

प्र०—साहित्यिकाचें चारित्र्य हाहि त्याच्या साहित्यकृतीबरोबर नि साहित्यविषयाबरोबरच अवश्य लक्षांत घेण्यासारखा एक मुद्दा आहे काय ? समाजाचें नेतृत्व ज्यांच्याकडे, कांहींना कांहीं बाबतींत, येतें त्यांनीं आपल्यावरील उत्तरदायित्व ओळखणें आवश्यक नाहीं काय ? शुद्धलेखनासारख्या सामान्य दिसणाऱ्या गोष्टीपासून सामाजिक नीतिनियमांच्या पालनापर्यंत कोणतीच गोष्ट त्यांच्यावर बंधनकारक नाहीं असें म्हणणें समाजघातकीपणाचें आहे, असें आपल्याला वाटत नाहीं काय ?

उ०—साहित्यिकाचें चारित्र्य व त्याची कृति ह्यांची ताटातूट करणें अयुक्त आहे. सामान्य जनतेचें लक्ष चारित्र्यावर खिळलेलें असतें. कृति निर्मळ आणि चारित्र्य मलीन अशी स्थिति असली म्हणजे विकारांच्यापुढें विचार दुर्बळ ठरतो असें अनुमान करणें भाग पडतें. ज्याला विवेकाच्या योगानें स्वतःला शिस्तींत ठेवितां येत नाहीं तो दुसऱ्याला सन्मार्गाला कसा लावणार अशी शंका सहज येते. जनता त्याचे विचार ग्रहण करण्यास कचरते. सामान्य माणूस स्वतः विचार करूं शकत नाहीं. थोर मानल्या जाणाऱ्या व्यक्तींचे विचार तो उचलतो. चारित्र्यवान माणसाला तो हुडकून काढतो; त्याच्यावर श्रद्धा ठेवतो आणि त्याचे विचार आत्मसात् करितो. सर्वसाधारण माणसाची तऱ्हा ही अशी असते. म्हणून इष्ट तो परिणाम आपल्या कृतीचा व्हावा अशी इच्छा असल्यास चारित्र्य रक्षण करणें अपरिहार्य आहे. शब्दनिष्ठ उपदेश प्रभावी असतो. कारण उपदेश कृतींत उतरविण्याकरितां करावयाचा

असतो. मनुष्यस्वभाव असा आहे कीं, दुराचरणी कलावंत कलेला कुशल कलाटणी देऊन आपल्या दुराचाराचें समर्थन करण्याच्या मोहाला बळी पडेल; कदाचित् तो दुराचाराला सदाचारहि बनवील !

पुरुष व स्त्री विवाहबद्ध होऊन एकत्र येतांक्षणींच प्रत्येकाचें स्वातंत्र्य बाधित होतें. दोन माणसें एकत्र झालीं असतांही स्थिति; मग हजारों-लाखों माणसांच्या समाजांतील आपण एक आहों हें ध्यानीं घेतलें तर, कोणतीच गोष्ट माझ्यावर बंधनकारक नाहीं हें म्हणणें किती अप्रयोजक आहे तें समजेल. निरंकुशत्वाचा पुरस्कार करणारे आपल्या अज्ञानाचाच पुकारा करीत असतात हें त्यांना कां समजू नये ? असें प्रतिपादन करणें सर्वथैव अशास्त्रीय होय. आपण बंडखोर बनून हे लोक समाजाला बंडखोर बनवितात व समाजाला नाशाच्या मार्गावर नेऊन सोडतात.

आतां एवढें मात्र खरें कीं, मृत्युबरोबर चारित्र्याचा शेवट होतो; साहित्यकृति मात्र टिकते. तेव्हां भावी पिढ्यांपुढें साहित्यिकांचें चारित्र्य नसल्यामुळें त्यांच्यावर त्यांच्या कृतीचा तेवढा परिणाम होणार. एवढ्यासाठीं चारित्र्यसंपन्न नसलेल्या साहित्यिकांना ‘ कालोह्ययंनिरवधिर्विपुला च पृथ्वी ’ ह्या वचनावर भिस्त ठेवावी लागेल. बंधनांच्या पलीकडे जाण्याचा प्रताप करणारे साहित्यिक समाजघाताचें पाप करीत असतात ह्यांत संशय नाहीं. परंतु ह्या पापाचें फळ त्यांना मिळत नसून समाजाला भोगावें लागतें हें दुर्दैव आहे !



चिंतामणी यशवंत मराठे

# ह त्या रा चा  का य दा

**१८५७ च्या धामधुमींतील एक प्रसंग**

" पार्वती साद् कुणाचा ग ? ऐकलास तूं ? "

पार्वती झोंपली होती पलीकडच्या सोप्यांत. पण मालकिणीची हांक ऐकूं न येण्याइतकी गाढ झोंपीं गेली होती. तिला साद् काय ऐकूं येणार ? तशांत मध्यरात्रीचा सुमार झालेला. झोंप निक्षून टाळण्याच्या यत्न केला तरी ती वाहाळाच्या पाण्यागत लोचटपणानें डोळ्यांवर ओघळत यावयाची. मग पार्वतीसारख्या दिवसभराच्या अंग-मेहनतीनें मळलेल्या माणसाला हांक कशाची आणि साद् तरी कशाचा ! पार्वतीनें हूँ कीं चूँ केलें नाहीं. नुसती कूसदेखील बदलली नाहीं ती !

बरें झालें एक परी ! पुष्कळ वेळां असें होतें कीं माणूस झटकन् जातो बोलून आणि बोलणें तोंडावेगळें झाल्यानंतर वाटतें कीं नसतों बोललों आपण, तर बरें होतें. गिरिजेचें तसेंच झालें. हांक मारून सादाची ओळखण

पुसल्यानंतर गिरिजेला वाटलें कीं उगीचच आपण पार्वतीला हांकारलें. पण पार्वती जागी झाली नाहीं. छान झालें.

गिरिजेला तरी साद कुणाचा ह्याबद्दलचा निर्णय थोडाच हवा होता ! तिनें ओळखलें होतें साद कुणाचा होता तें ! तो असा अवेळीं ऐकूं आला ह्याबद्दल तिला विस्मय वाटला. त्याबरोबरच वठलेली अपेक्षा पालवल्याचें पाहून तिला आनंदहि झाला. त्या आनंदाची सहभागिनी कोणी तरी असावी म्हणून तिनें पार्वतीला पुकारलें. आणि पुकारल्यानंतर तिला वाटलें कीं, नको, ह्या आनंदाची सहभागिनी कोणीहि नको. हा असका आनंद मीच एकटी भोगीन. सालाटरफलासकट खाईन.

पण तिला शंका आली. साद खरा कशावरून ? मनीं ध्यास धरला त्याचा पडसाद तर नसेल ? विरहाची गुणगुण अक्षयींची होऊन बसली म्हणजे साद-पडसाद कसे आणि केव्हां उमटतील याचा नेम नाहीं. ते ऐकत असतां झोपीं जावें आणि जागें व्हावें, असा पापण्यासारखा उघड-झांपींचा खेळ नेहमींच चालतो. कोठें खुट्ट झालें म्हणजे गिरिजेनें कुत्र्याच्या कानासारखें कावरें व्हावें आणि म्हणावें " कुणी सादविलं ! कुणी हांक मारली ? " डोळे बटबटां करून पाहिलें तरी कोण आहे ? कोणीच नाहीं. साद घालणारेंहि नाहीं आणि हांक मारणारेंहि नाहीं. सगळी मनाची माया. मनीं चिंतावें, स्वप्नीं पाहावें, पण खरें कांहींच नसावें. गिरिजेनें थकदिल व्हावें. शेजारींच झोंपलेल्या बाळाला उचलून उराशीं धरावें. आणि त्याचे केस भुरभुरतील असा एक निःश्वास टाकावा.

पण या वेळीं ऐकूं आलेला साद बातल मानावा असें तिचें मन घेईना. ती बिछान्यावर बसती झाली. बाळाच्या अंगावरील सरकलेलें पांघरूण तिनें नीट केलें आणि कानोसा घेत दृष्टीची टक लावून ती निश्चळ झाली.

इतक्यांत देवघरांतील प्रदक्षिणेच्या वाटेवरील झरोक्यांतून फिरून तोच साद कवडाशासारखा आंत आला. शंकाच फिटली. तो साद तिला प्रतिप्राण

वाटला. आणि ज्या नांवानें सादविलें तें नांव ऐकून तर तिचें रोमरोम थरकलें. केवळ दंपतीच्या एकांतांतच निर्माण झालेल्या त्या नांवांत प्रीतीचें गूज सांठविलेलें होतें. जेव्हां अंतरंगांची मिळणी होते आणि जगांतल्या सगळ्या संज्ञा संबोधनाला उण्या पडतात त्या वेळीं वाचेच्या बोबडया वळणानें जें नांव स्फुट होतें, त्याला नांव तरी कसें म्हणावें ? तें अंतरंगांत निर्वाळलेल्या ज्योतींचें प्रतीक ! कामवासनेच्या पलीकडेचें ! देहाभिलाषाच्या पैलथडीचें ! ज्या अवस्थेंत तें निर्माण होतें ती निमेषभरच टिकली तरी त्या आनंदाचे बुडबुडे आठवणीच्या पोकळीनें हरमळून येतात.

दाटलेला कंठ गिरिजेनें मोकळा केला आणि मौनानें व्यक्त होणारें उत्तर दिलें. ती हरिणीसारखी चकित झाली. बिछान्यावरून उठली. पाण्यावरून चालत जावें तितक्या सफाईनें माजघर, देवघर, स्वयंपाकघर ओलांडीत गेली. स्वयंपाकघराच्या मागील दरवाज्यापाशीं जाऊन ती थबकली. मनाची आणि देहाची धडधड थांबविण्यासाठीं ती क्षणभर खोळंबली. आणि मग तिनें हलक्या हातानें कडी खोलली. पण ती कडी देखील तिच्या ढळत्या बोटांना पेलली नाहीं. खळकन् हातावेगळी झाली. तत्क्षणीं धनंजयानें आंत पाऊल ठेविलें. उगवत्या सूर्याचा प्रकाश जसा अंतराळ व्यापून टाकतो तसें झालें.

उमाळा ओसरला. किंचित् दुरावून गिरिजेनें धनंजयाकडे पाहिलें. तिच्या अधीर नेत्रांनीं अंधेराचाहि उजेड केला होता. तिनें पाहिलें आणि निश्वास सोडला. त्या निश्वासाच्या पाठीं अभावितपणें तिच्या तोंडांतून उमटलें, " काय हें ! "

त्या शब्दांत सगळें कांहीं भरलें होतें आणि तें सगळेंच्या सगळें धनंजयाला उमगलें. उंबरठ्याच्या आंत त्यानें पाऊल टाकलें होतें. उंबरठ्याच्या बाहेरचा विचार बाहेरच राहिला होता. धनंजय आंतला विचार करीत होता आणि गिरिजा बाहेरचा विचार करीत होती. तथापि उल्हासवृत्तीला

खळें पडूं द्यावयाचें नाहीं असें धनंजयानें ठरविलें होतें. म्हणून त्यानें गिरिजेची समीपता साधली आणि म्हटलें, " चल आंत ! "

वरामागून वधूनें पाऊल उचलून सप्तपदी पुरी करावयाची असते तो योग आतां सहस्रपदीच्या रूपानें फिरून आला. गिरिजेनें धनंजयाचा हात धरला होता. तिच्या पावलावर धनंजय पाऊलें टाकीत होता. गिरिजेच्या मनांत आलें, " याउपर आयुष्याची उरली वाट माझ्या पाऊलांवर पाऊलें टाकीत नाहीं का पुरी होणार ? "

धनंजय म्हणाला, " काय प्राक्तनाचा खेळ आहे ! स्वतःच्या घरीं चोरपाऊलें टाकण्याचा काय हा अकल्पित योग ! "

दोघेंहि देवघरांत आलीं. नंदादीप तेवत होता. त्या प्रकाशांत त्यांनीं परस्परांना निहाळलें. स्वतःच्या मनांत आलेल्या विचारानें आणि धनंजयाच्या उद्गारानें गिरिजा भावनाविव्हल झाली. तिनें विनयाची मिठी झुगारली, नव्हे, तिनें विनयालाच धनंजयाचें रूप दिलें.

धनंजय हंसला. आणि मघाचेच शब्द थोडेसे पालटून त्यानें म्हटलें.—

" काळवेळेचा गुण कांहीं सांगून येत नाहीं. असा मी घरीं येईन, तुझ्या भेटीसाठीं येईन, बाळाला पाहाण्यासाठीं येईन असें कुणी मला सांगितलें असतें तरी खरें वाटलें नसतें. हा प्राक्तनाचा खेळ म्हणावयाचा ! "

" काळवेळ स्वतःच ओढवून आणण्याचा खेळ केला म्हणजे प्राक्तनाची वावडी होते म्हणतात ती अशी. एरवीं, आपल्याच घरीं चोरासारखें वावरण्याचें कारण काय ? "

" होय. मीच खेळ आरंभिला आहे. प्राक्तनाला माझा अनुयायी बनविण्याच्या आग्रहानें आरंभिला आहे. पाहूं कोण कुणावर मात करणार तें ! "

" तें ठीक आहे. पण तुमच्या या हमाम्यानें माझ्या कुंकवाची रांगोळी होणार आहे."

" होणार आहे खरीच ! पण काय करूं ? पहिल्यापासून मी खोडचाळ. तुझ्या संगतीनें मवाळलों होतों. निवळलों होतों म्हणेनास ! पण माझा तो मूळस्वभाव आतां बाजला आहे. ' कडव्या झाडाला बहु बाज ' म्हणतात तसा आतां बहरला आहे. तो आबासाहेबांना रुचणार नाहीं. तुला आवडणार नाहीं. आणि आतांच्या घटकेचा होरा पाहिला तर प्राक्तनालाहि बरा वाटणार नाहीं असें दिसतें. तरी तो मला सोडतां येत नाहीं. तो मला एका हातीं खेळला पाहिजे."

" सगळेच होळीचे होळकर ! जमले तसे पांगले ! आणा-शपथा कोरड्या झाल्या ! शब्दाचा अर्थ शब्दांतून बारगळला. पण पाहावें तों आपल्या इसाळीला मात्र बाळसें चढलें आहे. माघार घेण्यांतहि शहाणपणा असतो असें आबासाहेब म्हणतात यांत काय खोटें आहे ? "

" खोटें नाहीं. शहाणपणा आहेच. पण स्वाभिमानाला नख लावण्याचा शहाणपणा आहे ! पत्करेल त्यानें करावा."

" छत्र धारण करणारे पिढीजाद छत्रपती स्वाभिमानाचें छत फाडून गेले, तिथें वतनाचे तुकडे मोडणाऱ्या वतनदारांनीं काय ठिगळें लावावीं ? परक्या सत्तेची साउली छत्रपतींनीं बिनदिक्कत पाहिली. पण आपल्याला मात्र घरदाराची साउली गोड वाटत नाहीं. मग वनवासांत कांहीं आगळें असल्यास न कळे ! "

" छत्रपतींना आपल्या चवऱ्या शाबूद ठेवावयाच्या होत्या. म्हणून आपण होऊन त्यांनीं परकी सत्तेला मिठी मारली. मला काय शाबूद ठेवावयाचें आहे ? आणि स्वाभिमानानें जगतां येत नसेल तर किनखापाची सर गोणपाटाइतकीच आहे."

" चवऱ्या नसतील शाबूद ठेवावयाच्या ! पण निवाऱ्यासाठीं आढ्याची साउली शाकारून ठेवावयाला हवी ! त्याचीहि हेळसांड करावयाची आणि प्राक्तनाला बोल लावावयाचा हेंच विपरीत. "

" माणूस कल्पनेच्या जाळ्यांत गुरफटतो आणि त्या खऱ्या करण्यासाठीं आटतो. प्राक्तन म्हणून कांहीं वेगळा मालमसाला नाहीं. माणसाच्या डोक्यांत विचार स्फुरतात, विचारांचे अंदाज होतात आणि अंदाजाला हात फुटतात. यालाच प्राक्तन म्हणावयाचें ! "

" प्राक्तनाची घडी इतकी साळसूध असतांना ती उलगडूं नये याला काय म्हणावें ? "

" हा एक खेळ आहे ! "

" तो खट्याळ आहे. त्यापायीं आंतड्या–कातड्याचीं माणसें गुदमरत ठेवावयाचीं, त्यांचा जीव टांगणीस लावावयाचा, त्यांच्यापासून दुरावा पत्करावयाचा आणि त्यांच्यासकट संसाराचा उन्हाळा करावयाचा ! समजल्यें मी ! हें प्राक्तन आपलें नव्हे, माझें आहे. मुलाबाळांचें आहे. "

" ज्यानें त्यानें असा आपल्यापुरता विचार करावा आणि परिणामाची कदर करूं नये. कां नाहीं परक्या सत्तेची पोळी पिकणार ? फांशीं गेलेल्यांना काय स्वतःचा जीव अधिक झाला होता ? त्यांना काय बायकापोरें नव्हतीं ? पण जीव ओवाळून टाकावा अशा कांहीं अनमोल वस्तु जगांत असतात. स्वातंत्र्य ही त्यांपैकीं एक आहे. मला त्याचा सोस आहे. तें गमावल्याची चीड आहे. म्हणून मी दाही दिशा उधळून मवासगिरी पत्करिली आहे. मी आतां डोंगराचा वारा प्यालों आहें. "

" चार महिन्यापूर्वीं आपलें म्हणणें ठीक होतें. सगळ्या गांवानें आपली एकतारी पत्करिली होती. समवयस्कांनीं आपली साथ करावयाची भाक दिली होती. आपल्या हिंमतीला वणव्यासारखीं तोंडें फुटलीं असतीं. पण आतां रंग पालटला आहे. कंपनी सरकारानें पलटणीची हूल दाखविण्याची देखील आतां गरज नाहीं. पिचलेल्या निखाऱ्यासारखे सगळे राखेंत डुबून गेले आहेत. वडीलधाऱ्या माणसांनीं हत्याराचा कायदा सुतासारखा सरळ आणि बिनखूप केला आहे. हत्यारांना जिवंतपणा आणणारीं माणसेंच मरून गेल्यानंतर

काय करावयाचीं तीं हत्यारें ! त्यांच्यासाठीं कशाला जीव पणाला लावावयाचा ? ”

“ बरोबर आहे तुझें म्हणणें ! पण मी मेलों असें मला अजून वाटत नाहीं. हत्याराचा कायदा आमच्यांत आहे तें पौरुष खच्ची करणार आहे हें जाणण्याइतका मी जिवंत आहें. आणि जिवंत आहे तोंवर मी प्रतिकार करणार आहें. सुखाच्या लालचीनें, मुलालेंकरांच्या कारुण्यानें किंवा बुद्धिभेदानें प्रतिकारशक्ति मावळली नाहीं, तोंवर प्रयत्नांची पराकाष्ठा करणार आहें. माझे अनुयायी मला सोडून गेले, गांवानें हत्यारें सरकारजमा करण्यास्तव एकजूट केली, ही फार चांगली गोष्ट झाली. सोडून गेले ते सोडण्याच्याच लायकीचे होते; हत्यारें दिलीं ते निःशस्त्र होण्याच्याच लायकीचे आहेत हें सिद्ध झालें. पण तसें झालें तरी मी माघार घ्यावी असें मला वाटत नाहीं. ”

“ हा दुराग्रह नव्हे तर काय ? निष्फळ होणाऱ्या प्रयत्नाच्या मागें लागण्यांत कोणता स्वार्थ-परमार्थ साधणार आहे ? ”

“ परिणामावरून पाहतां तुझें म्हणणें वावगें नाहीं. पण मी प्रयत्नाच्या दृष्टीनें पाहतों. प्रयत्नामागें जी वीरश्री आहे. तिच्यावर माझी दृष्टि आहे. तूं वीरपत्नी असशील तर तुला माझा प्रयत्न बाष्कळ वाटणार नाहीं. वीराचें चरित्र ऐकतांना तूं शरद् ऋतूंतल्या सृष्टीसारखी तजेली होतेस, हें मला माहीत आहे. मग तोच योग तुझ्या दारीं चालून आला असतांना अशी कां पाठमोरी होतेस ! काय मी वीर व्हावें, वीर-मरणानें मरावें हें तुला मानत नाहीं ? ”

“ काव्य करणें सोपें आहे. ऐकणें त्याहून सोपें आहे. पण तें जगून आणि जागवून दाखविणें कठीण आहे. मी विजयी वीराची फुलांची शेज पाहिली. अपेशी वीराची वाकळ पाहिली नाहीं. मी वीरपत्नीची फुलांची जाळी पाहिली. अन् आतां काय म्हणूं ? माझा मळवट समरभूमीनें परभारेंच हरताळण्याऐवजीं तो

आतां प्रत्यक्ष सौभाग्यदाताच पुसणार आहे ही कल्पना मला मानत नाहीं. इतकें रखरखीत काव्य जगून दाखविण्याचें त्राण माझ्यांत नाहीं."

"तुला नित्राणपणाची जाणीव झाली, ही तुला हळदकुंकवासारखी कामीं येईल. उगाच दीनवाणे शब्द वेंचून कां हताश होतेस? असें काय विपरीत आचरण मी आरंभिलें आहे, तर पुरुषासारखा पुरुष होऊनहि मी रांडपण पत्करल्यासारखें होणार आहे. मग असा शेणामेणाचा पती वागवून काय तुझ्या सौभाग्याला मोल चढणार आहे! तूं कुंकू लावतेस, मंगळसूत्र घालतेस हीं सौभाग्यचिन्हें खरीं; पण तीं निर्जीव आहेत. पौरुषहीन पतीशीं संसार करण्यासारखीं निर्जीव आहेत. पतीचा पराक्रम हें खरें सौभाग्य. त्या पराक्रमाची स्फूर्तिदेवता म्हणून मी तुला मानूं कीं केवळ भोगाची मूर्ति म्हणून तुझ्याकडे पाहूं? तूं वीरपत्नी आहेस ही उच्च भूमिका मनांत धरून मी भेटावयाला आलों आहें. मी वीर म्हणवितों. तुला जसा सौभाग्यचिन्हांचा तसा मला शस्त्रांचा हव्यास आहे. माझी तलवार, माझी कमची, माझी कट्यार मी खुषीनें टाकावी, त्या अनमोल दागिन्यांची मोड करून त्यांचें लोखंड आणि तिखें करावें, हें मला सहन होत नाहीं. हें इंग्रज सरकार आमचीं हत्यारें काढून घेऊन आम्हांला शेळ्यामेंढ्या बनविणार आहे. आमच्या कपाळावर रांडपणाचा छाप मारणार आहे. मला याची चीड आली म्हणून मी या कायद्याचा खुर्दा करण्याचा निश्चय केला आहे. हत्यारांबद्दलचा पहिला जाहीरनामा जेव्हां आबासाहेबांकडे आला, तेव्हांच माझें प्राक्तन ठरून गेलें आहे. माझ्या पाठीशीं राहील म्हणून मी सगळा गांव गोळा केला, माझे समवयी आणाशपथांनीं बांधून घेतले. जाहीरनाम्याचा परिणाम अन्यत्र काय होणार असेल तो होवो, पण या बिंदाण्यापुरती एकवट करून जाहीरनाम्याची उष्टी पत्रावळ करण्याचा मीं हिया बांधला. पण रंगो बापूजींच्या उठावासारखा माझा प्रयत्न फसला. मला वाटलें होतें कीं पुरुष हे पुरुषच आहेत पण आतां कळून आलें कीं ते केवळ बायकांचीं

सौभाग्यचिन्हें राखणारे पुरुष आहेत; मी त्या दावणींत मान गोंवणार नाहीं. हत्याराच्या कायद्याविरुद्ध हत्यार उपसणारा एक तरी मराठा निघाला, हें मीं इंग्रजांना दाखविणार आहें. ”

“ आकाशाला गवसणी घालण्याचा उद्योग आहे. आबासाहेब काय वीर नाहींत कीं काय ? पण कायद्याची कूस सांभाळून त्यांना वीरवृत्ति जागवितां येते. सरकाराच्या परवानगीनें हत्यारें ठेवतां येतात, असें जाहीरनाम्यांत नाहीं काय ? ”

“ जरूर आहे. पण तीं हत्यारें शोभेला आणि पूजेला देण्यांत येणार आहेत. परक्या सत्तेची मान शाबूद राहावी इतकी दक्षता घेऊनच हत्यारें मिळावयाचीं आहेत. खरे वीर असे परवानगीनें हत्यारें बाळगीत नसतात !”

“ पण शांततेच्या काळीं हत्यारांचा उपयोग तरी काय हें आबासाहेबांचें म्हणणें खोटें नाहीं. कंपनीच्या राज्याला दोन पिढ्या होत आल्या, किती वेळां हत्यारांची गरज लागली ! ”

“ नाहीं लागली. मग हत्यारें काढून घेण्याची तरी कोणती गरज आहे ? आणि गरज ठरविणार तरी कोण ? गरज नाहीं म्हणून एकेक वस्तु माणूस टाकून देऊं लागला तर त्याच्यावर दिगंबरवृत्तीनें राहाण्याचा प्रसंग येईल. गरज किंवा उपयोग प्रसंगानें ठरतो. गंध लावणें, शेंडी ठेवणें, जानवें घालणें यांचा उपयोग काय सांगावयाचा ? पण हिंदु म्हणविणारानें धर्मभावना जागृत ठेवण्यासाठीं त्यांचा वापर करावयाचा असतो. कुंकवाचा आणि मंगळसूत्राचा तरी तसा तादृश काय उपयोग आहे ? सौभाग्याची भावना जागृत ठेवण्यासाठीं त्यांचा वापर करावयाचा असतो. हत्यारांचा उपयोगहि तसाच आहे. पडदळ्याला लटकलेली तलवार अगर कमरपट्ट्यांत खोंचलेली कट्यार वीरवृत्ति जागृत ठेवते. मी हत्यारी आहें, ही भावना राखेंतल्या निखाऱ्यासारखी ऊब आणते.”

गिरिजेचा सगळा युक्तिवाद आटला. आशेचा फुलोरा कोमावून गेला. धनंजयाचा कृतनिश्चय ढळला नाहीं. भेटीचे क्षण संपतील आणि पतीला असमाधानाचें वाढणें वाढून दिल्यासारखें होईल, असें गिरिजेला वाटलें.

" बोलण्याच्या भरांत कशी विसरल्यें पाहा. आज बाळाचा वाढदिवस होता. शेवयाची खीर केली होती. आवडते त्याला फार. तोंडांतून लोंबणारी शेवई आवरतां आवरतां पुरेवाट झाली त्याची."

वावदूक गिरिजा लोपून तिची गृहलक्ष्मी झाली. देवघरांतच तिनें पाट मांडला. समईतील ज्योत ढळवून मोठी केली. केळीचें अगोतलें पान मांडलें. त्यावर शेवयाच्या खिरीचें एकजिनसी जेवण वाढलें.

" बाळाला पाहूं दे कीं पण आधीं."

" आधीं नको. रडूं लागेल एखादा. खाणें होऊं दे. खातांना मला पाहूं दे आधीं ! "

" मला पाहाणार आहेस होय ? पण तूं ? "

आठवणीनें तिला दुपारीं खीर खाववली नाहीं. मुखापर्यंत हात न्यावा आणि खालीं आणून खोळंबून ठेवावा. तिचें रितें पोट भरल्यासारखें तृप्त झालें होतें. पण ज्याच्यासाठीं ती हपापली होती त्या पतीची मूर्ती समोर पाहून तिच्या भुकेला जाग आली. पतीच्या सहवाससौख्यांत ज्योतीच्या प्रकाशासारखी ती एकरूप झाली.

२

पतिपत्नींच्या संवादांतील धनंजयाची भूमिका ध्येयवाद्याची होती आणि गिरिजेची व्यवहारपंडितेची होती. धनंजयाचें म्हणणें सोळा आणे बरोबर

होतें आणि गिरजेचें सोळा आणे चूक होतें अशांतला भाग नव्हता. थोडें तुझें, थोडें माझें असा समारोप झाला असता. माघार घेऊन कायदा मान्य करण्यांत शहाणपणा होता, हें गिरजेचें किंवा आबासाहेबांचें म्हणणें तर्काला धरून होतें. पण हक्क कीं दया हें मूळ होतें. परकी सरकार हक्क मानण्यास तयार नव्हतें. आणि धनंजय दया पत्करण्यास राजी नव्हता.

बुद्धिभेद करून फूट पाडावी आणि लोकांनीं बिनहरकत कायदा मानावा, हेंच कंपनी सरकाराचें धोरण होतें. कायदा जारी करण्यास साताऱ्याच्या आसपास झालेली बंडाची उठावणी हें कारण होतें. गेल्या पंचवीस तीस वर्षांतील राशियत पाहतां किरकोळ दंग्याधोप्याखेरीज हत्यारें चालविण्याचा सर्रास मोका केव्हांच आला नव्हता. तेव्हां कंपनी सरकाराच्या वतीनें कौल देण्यास लोकांना मुळींच दिक्कत वाटली नाहीं.

पण लोकांनीं एकमतानें हत्याराचा कायदा झुगारून देण्याचें मनांत आणलें असतें तर काय झालें असतें, हा विचारांत घेण्याजोगा प्रश्न होता. गिरिजेचें म्हणणें हेंच होतें कीं सर्वांनीं एकजात माघार घेण्याचें ठरविल्यानंतर धनंजयासारख्या एकटय़ादुकटय़ाच्या प्रतिकारानें काय धूप लागणार होता? घरटीं एक, निदान गांवागणिक एकेक धनंजय निर्माण होता तर निःशस्त्रीकरणाच्या त्या काळ्या कायद्याचें कदाचित निर्मूलन झालें असतें.

कदाचित !

राज्यकर्ते गेले कोण आणि आले कोण याकडे ढुंकूनहि पाहाण्यास मराठ्यांना फुरसत नव्हती, इच्छा नव्हती. अंतर्बाह्य उदासीन वृत्तीनें ते ग्रासून गेले होते. पोर्तुगीज व्हाइसरॉय आणि नागपूरचे पदच्युत राजे अप्पासाहेब भोसले यांच्याशीं प्रतापसिंहानें पैगाम बांधला. इंग्रजी अमलाविरुद्ध उठावणी करण्याची ही प्रतापसिंहाची कारवाई पत्त्या-मुद्यासह उघडकीस आली. प्रतापसिंहाला राज्यत्याग करून काशीवास पत्करावा लागला. प्रतापसिंहाच्या कारभारांत प्रामुख्यानें वावरणाऱ्या रंगो बापूजीनें ह्या अन्यायाची दाद

हिंदुस्थानांतील बडे लाट घेत नाहींत असें पाहून १८४० त थेट लंडनची वारी केली. उपयोग कांहींच झाला नाहीं. छत्रपतींच्या या राज्यत्यागाची दखलगिरी लोकांनीं मुळींच घेतली नाहीं.

प्रतापसिंहामागून त्याचा भाऊ शहाजी गादीवर आला. कारण प्रतापसिंहानें घेतलेला दत्तक-पुत्र कंपनी सरकारानें मान्य केला नाहीं. तो हीन कुळींचा आहे त्याअर्थीं कंपनी सरकारानें केलें तें योग्यच केलें, असा शहाजीनें अभिप्राय दिला. पुढें शहाजी वारला आणि मृत्युपूर्वीं त्यानें घेतलेल्या दत्तकासहि कंपनी सरकारानें मंजुरी दिली नाहीं. साताऱ्याच्या छत्रपतींची गादी खालसा झाली आणि १८४९ पासून साक्षात् कंपनी सरकारचें राज्य सुरू झालें. छत्रपतींच्या गादीची वासलात काय लागली याचीहि दखलगिरी लोकांनीं मुळींच घेतली नाहीं. फक्त प्रतापसिंहाच्या दोन राण्यांनीं तैनातीबद्दल खळखळ करून पाहिली इतकेंच.

राज्य खालसा झाल्यानंतर राजघराण्यांतील व त्यांशीं संबंधित असलेल्या कांहीं व्यक्तींची सरकारानें सोय लावून दिली, तरी एकंदर राज्याच्या चालत्या गाड्यांशीं या ना त्या नात्यानें निगडित असलेल्या अनेकांची बेकार अवस्था झाली. वृत्तिच्छेद झाला. साक्षात् राज्य नाहीसें झालें, या दुःखापेक्षां वृत्तिच्छेद झाल्याचें दुःख अधिक होऊन बसलें. इनाम कमिशन बसलें त्या वेळीं ह्या कहाण्यांना ऊत आला होता. उठावें त्यानें आपली कुळकथा सांगावी, अमक्या लढाईत, अमक्याच्या हाताखालीं, अमक्याच्या कारकीर्दींत आम्ही तोलदारीनें कामें केलीं म्हणून कंपनी सरकारानें आमचें चालवावें. "याजकरितां हलीं सरकारास अर्ज आहे. तरी कंपनी सरकारचे नेकनामीची किर्ती सर्व राज्यात प्रसिद्ध आहे. त्यापेक्षां आम्हावरहि मेहरबानगी करतील. कारण आम्हास उवजीविकेस दुसरे उत्पन्न कांहीं नाहीं. गुजारा तर चालला पाहिजे." वगैरे वगैरे.

अशा ह्या पोटार्थी लोकांचें नेतेपण प्रतापसिंहाचा कारभारी रंगो बापुजी यानें पत्करलें. हा गृहस्थ विलायतेस जाऊन आल्यामुळें लोक ह्याला आतांप्रमाणेंच जाणता समजत. आणि यानेंहि भूमका उठवून दिली कीं, प्रतापसिंहाचा दत्तकपुत्र व्यंकाजी राजे यास बडे लाट राज्य बहाल करण्यास तयार असून आडकाठी आहे ती फक्त छोट्या लाट साहेबांची. सबब ही आडकाठी नाहींशी करण्यास सातारा, यवतेश्वर आणि महाबळेश्वर येथील गोऱ्या लोकांची कत्तल केली म्हणजे झालें. त्यासाठीं बेळगांवाकडून हजार लोकांचा जमाव येणार असून बुवासाहेब शिरके यांच्या मार्फतीनें दहा हजार रोहिले उत्तरेंतून येणार आहेत.

रंगो बापूजींच्या झेंड्याखालीं मे १८५७ अखेर पांचसात हजार लोक जमले. रंगो बापूजीनें सातारा सोडून आपलें ठाणें परळीच्या डोंगरांत ठेविलें होतें. तेथून तो सूत्रें हलवीत होता. भोराच्या आसपास हजार दोन हजाराचा जमाव जमत होता तोहि परळीस येऊन मिळणार होता. यांत पुरंदरे-घेऱ्यांतील कोळ्या-रामोश्यांचा मुख्य भरणा होता. हे लोक नाशिक, नगर, ठाणें आणि पुणें यांच्या आसपास राहून कंपनी सरकाराच्या अंमलाची आधूनमधून परीक्षा घेत. विठोर्जा नाईक, रामजी आणि रावोजी भांगरे, उमाजी आणि त्याचे मुलगे तुक्या-महांकाळ ही सर्व ह्याच जमातींतील मंडळी होत. ही मंडळी अनावर होत तेव्हां कंपनी सरकार त्यांना नोकऱ्यांची लालूच दाखवून पोलिसांत भरती करीत असे. मग हे लोकहि आपल्या जातभाईंची बित्तंबातमी सरकाराला पुरवीत आणि खाल्ल्या मिठाला जागल्याचें व देवाघरीं सत्य रुजू झाल्याचें समाधान मानीत.

## ३

रोहिडखोऱ्याचे गुप्ते-देशपांडे यांचें घराणें फार जुनें. निजामशाहीपासून तें त्या खोऱ्याचें देशपांडेपण संभाळून साहेबचाकरी करून होतें. याच घराण्यांतील

दादाजी नरस प्रभूनें शिवाजीच्या राज्यसाधनांत सुरुवातीपासून मदत केली होती. पुढें पेशवाईत सचिवांकडे यांचा राबता असून सदाशिव खंडेराव नांवाचा गृहस्थ सचिवांचा कारभारी झाला होता. पण कांहीं कारणास्तव सचिवांनीं याला घरीं बसविलें होतें. गेलेली चाकरी पुनः मिळवावी ह्या प्रयत्नांत गेलीं तीन्चार वर्षें सदाशिव खंडेराव होता. धागा कोठें जमेना, म्हणून तो हताश झाला होता.

भिंवडीचा नाना राघू चव्हाण ह्या नांवाचा रामोशी सदाशिव खंडेरावाच्या चांगल्या परिचयाचा होता. ह्याच नाना राघूनें १८३१ सालीं पुरंदर घेऱ्यांतील प्रसिद्ध उमाजी नाईकाला पकडून देण्याची मर्दुमकी गाजविली होती. आणि इंग्रज सरकार अशा मर्दुमकीचें चीज करण्यांत वाकबगार आहे. नाना राघूला दहा हजार रुपये बक्षीस मिळाले होते. १८३१ सालीं, भिंवडीसारख्या गांवढ्यांत, नाना राघूसारख्या रामोश्याला दहा हजाराचा तोडा मिळाला म्हणजे लिंबोण्याचीं द्राक्षेंच झालीं म्हणावयाचीं! चिक्कूच्या झाडाला पानागणीक फळ धरावें तसा नाना राघू सद्गुणानें ओथंबला. सदाशिव खंडेरावासारखे भोरकरांचे कारभारी त्याच्या घरीं जाणाऱ्या-येणाऱ्यांतले झाले! यापरता त्याच्या मोठेपणाचा आणखी पुरावा तो कोणता?

दुर्दैवानें सदाशिव खंडेराव नोकरीला म्हणजे प्रतिष्ठेला पारखे झाले, तेव्हां नाना राघूनें त्यांचें सांत्वन केलें.

"अशी गोष्ट आमच्या इंग्रज सरकाराकडून घडणार नाहीं. इंग्रजांची चाकरी म्हणजे चंद्रसूर्यांच्या शाश्वतीसारखी!"

पण सदाशिव खंडेरावाला ही शाश्वती कशी लाभणार? नाना राघूसारखा भाग्यवंत ती चुटकीसरशी कमावून बसला. इतकेंच नव्हे, तर त्याच्या मुलाला पोलिसांत आसामी मिळाली आणि तो कॉन्स्टेबल्ची छडी फिरवूं लागला. काय म्हणावें या भाग्याला!

"तुमच्यासारख्या कारभाऱ्यांना नाना राघूनें काय शिकायत द्यावी, सदाशिवपंत?"

" पुनः कारभारीपदावर बसेन असें कांहींहि सांग, नाना. सूक्तासूक्त गुंडाळून ठेवीन. बऱ्याबुऱ्याचा विचार टाकून देईन. तुला जसा उमाजी तसा मला आणखी कोणी गोमाजी ! "

" कणीस यायला आणि तांबरा पडायला गांठ पडावी तशी तुम्हीं यायला आणि माझ्याजवळ बातमी असायला गांठ पडली आहे. बातमी ताजी आहे. अचूक लागू होणारी आहे. नेमकें कारभारीपद्च मिळेल कीं नाहीं हें मला नाहीं ठाऊक ! पण कद्रदान इंग्रज सरकारांत तुमचा बोलबाला होईल. न जाणों, कारभाऱ्यापेक्षांहि मोठी हुद्याची जागा मिळवून जाल. पण नाना राघूला मात्र विसराल ! "

" काय बोलतोस हें ! मी रामोशी नाहीं, तरी रामोश्याचें इमान बाळगून आहें. "

" बातमी अशी आहे. माझ्या सग्याधाग्यांतल्या रामोश्यांचा आणि आजूबाजूच्या कोळ्यांचा जथा जमला आहे. वगरवाडीहून ह्या चार दोन दिवसांत तो दोन एक हजारांचा जमाव साताऱ्याकडे कूच करणार आहे. परळीच्या डोंगरांत रंगो बापूजी दारूगोळ्याची जोडणी होण्याची वाट पाहात आहे. तेवढें झालें कीं सातारा पेटणार ! बातमी तहकीक आहे. सात कप्प्यांत ठेवण्यालायक गुप्त आहे. उपयोग करून घेणाराची चतुराई बाकी आहे. यापेक्षां अधिक काय सांगूं ? "

" काय म्हणतोस तरी काय ? वगरवाडीसारख्या भोराच्या परसांत पिकणारी बातमी मला समजूं नये आणि तुला मात्र खडा-न्-खडा कळावी ! आश्चर्य आहे बुवा. आतां उपयोग करून घेणाराची चतुराई म्हणतोस, मग तूं कां अडलास ? इंग्रज सरकाराशीं गांठ आहे. बातमी खरी असली तर उखळ पांढरें होईल आणि जर का नसली तर उलटी अंबारी हातीं येईल. एवढी अनमोल बातमी कळून तूं थांबलास म्हणून शंका येते. "

" शंका घ्यावी. बातमीची शहानिशा करावी. पण आम्ही रामोशी रामवंशी म्हणवितों. तेव्हां आमच्या तोंडांतून खरेंच बाहेर पडेल याची खात्री बाळगा. आतां मी कां थांबलों म्हणाल तर माझें पोट भरलें आहे; तरीदेखील मीच कामगिरी उरकली असती; पण तुमची नड अधिक आहे. तुमची चाकरी चढावी, असा हेतु आहे. दैवानें तुमचा हात चालता झाला तर माझा शेर कांहीं कोठें गेला नाहीं. "

नाना राघूच्या बातमीनें सदाशिव खंडेराव जो एकदां हर्षवायूवर आरूढ झाला, तो एकदम रेसिडेंटाच्या उंबरठ्यावर जाऊन उतरला. बातमी इतकी निकडीची आणि महत्त्वाची होती कीं सदाशिव खंडेरावाची पाठ थोपटण्यासहि साहेबास अवसर मिळाला नाहीं. भोरचा माजी कारभारी आणि नाना राघूची जबान घेऊन आलेला. बस्स झालें! तोस्तान अडकविण्याच्या घाईनें साहेब तकार-टकाराची गल्लत करून एवढेंच म्हणाला,

" सडासिव कंडेराव, टुम् बहोत आच्चा काम किया! टुमारा वाजबी बंडोबस्ट हम कर डेगा! "

साहेबाच्या मोडक्या हिंदुस्थानींत काय आंकडेमोड भरली होती हें सदाशिव खंडेरावासारख्या मुरब्बी दरबाऱ्याला काय गुणाकार भागाकार मांडून दाखववावयाला हवें होतें! नाना राघूसारख्या सामान्य रामोश्याची चढती कमान त्यानें डोळ्यांनीं देखिली होती! त्याला साहेबाची ती धांदल पाहून स्वतःच्या कमानीची काय कल्पना आली नसेल! तो मनांत म्हणाला, " शाबास नाना राघू चव्हाण! तूं रामवंशीच खरा! "

## ४

जंगली जनावरासारखे जागरूक इंग्रज आणि दावणींतल्या जनावरासारखे गहाळ मराठे अशा विषम सामन्यांत चीतपट कोण होणार हें काय सांगावयास

हवें! त्यांतून इंग्रजांना उठावाची बातमी आगाऊच मिळालेली होती. साताऱ्याचा कमिशनर आणि मॅजिस्ट्रेट मि० रोज यानें क्षणहि न दवडतां ही वार्ता पुण्यास कळविली आणि कुमक मागविली.

पुण्याहून लेफ्ट० केर आणि सॅण्डफोर्ड घोडदळासह निघाले आणि त्यांनीं पहिला हल्ला वगरवाडीच्या जमावावर केला. वाऱ्यानें चुरमुरे उडावे त्याप्रमाणें लोकांची दाणादाण झाली. कांहीं चकमकींत ठार झाले आणि बाकीचे डोंगराच्या आसऱ्याला जाऊन दडून राहिले. पांच-पंचवीस सांपडले. सर्वांनीं प्रामाणिकपणानें गुन्हा कबूल केला आणि पुढील बेताचा पाढा वाचला.

याच सुमारास सातारा कोर्टाकडील जासूदगिरीच्या कामावर असलेल्या लक्ष्मणसिंग नांवाच्या रजपुताला पकडण्यांत आलें. साताऱ्याच्या तेविसाव्या देशी पलटणीच्या सुभेदारास फोडून सबंध पलटण इंग्रजांविरुद्ध उठविण्याचा लक्ष्मणसिंगाचा प्रयत्न होता. लक्ष्मणसिंगाचें म्हणणें सहानुभूतिपूर्वक ऐकण्याचा सुभेदारानें बहाणा केला. पण अखेर दोन साक्षीदारांसह त्यानें लक्ष्मणसिंगास वरिष्ठांपुढें हजर केलें. गुन्ह्याची मामुली चौकशी होऊन लक्ष्मणसिंगाला फांशीची सजा सुनावण्यांत आली. फांशी जाण्यापूर्वीं इंग्रजी रिवाजाप्रमाणें त्याला बोलण्याची परवानगी मिळाली. त्या वेळीं फांशीची मौज पाहाण्याकरितां जमलेल्या बघ्यांना उद्देशून तो दुर्दैवी प्राणी म्हणाला,

"हिंदु-मुसलमान बंधूनों, इंग्रज प्रथम हिंदुस्थानांत आले, तेव्हां त्यांच्या पायाखालची जमीन शाबूद होती. पण ती आतां कोळ होऊन ढांसळत आहे. एकीच्या बळावर त्यांना पळतां भुई थोडी करणें कांहीं कठीण नाहीं. म्हणून एकवट व्हा. इंग्रजांना हांकून द्या. स्वस्थ बसूं नका."

लक्ष्मणसिंगाच्या ह्या शब्दांनीं इंग्रजांची चांगली करमणूक झाली. कारण ज्यांना उद्देशून निर्वाणीचे हे शब्द तो बोलला होता, ते सारे स्थितप्रज्ञ होते. त्यांच्या चेहऱ्यावर विकार उमटले नाहींत. त्यांच्या शरीराची हालचाल झाली नाहीं.

लक्ष्मणसिंग ता. २० जून १८५७ रोजीं फांसावर लटकला.

पुण्याहून आलेलें घोडदळ आणि साताऱ्याची तेविसावी देशी पलटण यांच्या जोरावर रंगो बापूजीचा परळींचा जमाव उधळून लावण्यांत आला. खुद्द रंगो बापूजी कोठें नाहीसा झाला, त्याचा शेवटपर्यंत पत्ता लागला नाहीं. रंगो बापूजीचा मुलगा कोल्हापुराच्या बाजूस दंगल करणार होता. तो ही धरपकड ऐकून वाळव्यापर्यंत चालून आला. पण इंग्रजांनीं दक्षिण दिशेला पायबंद घालण्यासाठीं वाळवें व अष्टें येथें जय्यत तयारी ठेविली होती. त्यामुळें रंगो बापूजीच्या मुलाचा निभाव लागला नाहीं. तो आणि त्याचे सत्रा ठळक साथीदार सांपडले. त्यांच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवून खटले भरण्यांत आले. आरोप शाबीत झाला आणि त्या सर्वांना ता. ८ सप्टेंबर १८५७ रोजीं फांशी देण्यांत आलें.

बंडाची ही वावटळ कशी व कोठें पसरेल याचा नेम नव्हता. तिच्यांत धोरणाची सूत्रबद्धता असती तर तिचा बींमोड करणें इंग्रजांस जड गेलें असतें. किंवा दंगल माजविणारे लोक आपआपल्यापरी रगेल असते, तरी देखील कठीण गत झाली असती. पण चकमक सुरू होण्यापूर्वींच कसें पळून जावयाचें याचा विचार करणाऱ्या लोकांकडून काय मर्दुमकी होणार! उठाव घ्यावयाचा तर एका विशिष्ट धोरणानें वागलें पाहिजे, हा विचार कोणाच्याहि मनांत आला नव्हता. मुत्सद्देगिरीचें आणि शिपाईगिरीचें असें शून्य झालें होतें.

तात्पुरत्या माजलेल्या ह्या अराजकाला तोंड देण्यासाठीं रोजला सर्वाधिकार मिळाला होता. त्यानें मिळालेल्या अधिकाराचा उपयोग ताबडतोबीनें करण्याचें ठरविलें. छत्रपतीच्या नांवाचा फायदा घेऊन किंवा त्यांच्या नांवाखालीं कोणी झेंडा उभारूं नये, म्हणून छत्रपतींच्या दोन राण्या आणि दत्तकपुत्र यांना साताऱ्यांतून हलवून मुंबईस नेऊन ठेविलें. आणि ऑगस्टांत निःशस्त्रीकरणाचा म्हणजे हत्याराचा कायदा जारी करण्यांत आला.

ह्या बाबतचा पहिला जाहीरनामा ता. १२ ऑगस्ट १८५७ रोजीं सातारा इलाख्यांतील गांवोगांवीं लावण्यांत आला. त्यांत "हत्यारें सरकारांत हजर करणें व त्यांपैकीं हत्यारें परत घेणें असतील तर त्याचा अर्ज करण्याविषयीं" मजकूर होता. या जाहीरनाम्याच्या पाठोपाठ दुसरा ता. २१ ऑगस्ट रोजीं निघाला. त्यांत "हत्यारें मोडून लोखंड-तिखें केल्यास हर्कत नाहीं म्हणून" लोकांना हत्यारांचें रूपांतर करण्यास सवड देण्यांत आली होती. दुष्काळांत पोटचीं पोरें मारण्यास परवानगी देण्यासारखा हा प्रकार होता !

ह्या दुसऱ्या जाहीरनाम्याचा उपयोग व्हावा तसा झाला नाहीं, असें दिसून येतांच ता. २१ सप्टेंबर रोजीं तिसरा जाहीरनामा काढण्यांत आला. त्यांत "गंधक दाहा शेर ठेऊन अधिक असेल तो सरकारांत देणेंविषयीं" फर्माविण्यांत आलें होतें. या जाहीरनाम्याचा रोख पिस्तुलें, बंदुका व तोफा अशा स्फोटक शस्त्रांवर होता.

पुढें या तीनहि जाहीरनाम्यांचा समन्वय करणारा एक अकरा कलमी जाहीरनामा ता. २८ आक्टोबर रोजीं निघाला. त्यांत चौदा दिवसांच्या आंत म्हणजे १० नोव्हेंबरपूर्वीं हत्यारें परत करण्याचा हुकूम होता. याच जाहीरनाम्यांतील ज्या शब्दांवर व्यवहार पंडितांनीं कसरत करून दाखविली आणि तरुण पिढीला निःशस्त्रीकरणास प्रवृत्त केलें, ते चौथ्या कलमांतील शब्द असे होते.

"...... जितकीं हत्यारें अर्ज करणाराकडे बंदोबस्ताकरितां वगैरे योग्य कारणानें वापरण्यासाठीं राहूं द्यावयाचीं असतील तितके हत्यारांबद्दल ते अंमलदार आपले सहीचा दाखला देतील व तीं हत्यारें वारंवार रुजू पाहण्यास ते अंमलदार मागतील तेव्हां त्यांस दाखववीं."

ह्याच शब्दांच्या आधारावर बिंदाण्याच्या देशमुखांनीं आपल्या चिरंजिवांशीं दावा मांडला होता.

## ५

वाळवें तालुक्यांतील बिंदाणें हें गांव वाळवें, कऱ्हाड व पाटण ह्या तालुक्यांच्या सीमेवर डोंगरांच्या पायथ्याशीं वसलें होतें. कांहीं माणसें जशीं स्वभावतःच अवखळ असतात, तशीं गांवेंहि असतात. म्हणजे त्या गांवांतील दर एक माणूस अवखळ असतो, असें नव्हे. पण गांवाचें वळण समुच्चयानें अवखळपणाकडे झुकलेलें असतें. बिंदाणें हें तशापैकीं होतें. पाटील, कुलकर्णी, देशपांडे, देशमुख अशा पिढीजाद वतनदारांनीं बिंदाणें संगीन होतें. इनामदार या नात्यानें देशमुख हे जरी गांवाचे अध्वर्यू होते, तरी अवखळपणाची खळाळी जिवंत ठेवणारा दरपिढीला कोणी तरी एक म्होरक्या असे. एखाद्या पिढीला रगेल किंवा रंगेल वळण देण्याची जबाबदारी ह्या म्होरक्याकडे असे. आणि तो ती स्वभावानुसार पार पाडी. चालू पिढीला हें म्होरकेपण खुद्द देशमुखांचा मुलगा धनंजय ऊर्फ धनाजी यांजकडे होतें.

बिंदाण्याचे इनामदार महिमाजी संताजी ऊर्फ आबासाहेब देशमुख यांचे पूर्वज स्वराज्याच्या धामधुमींत नांवारूपाला आले होते. पण आबासाहेबांचें धोरण नवीन सत्तेशीं मिळतें घेण्याचें होतें. त्यामुळें त्यांच्या वतनदारीला फारसा धक्का पोहोंचला नाहीं. शिवाय घराण्याचा औरस वंशहि बिनतूट असल्यामुळें त्यांना सरकार-दरबार करण्याचें कारण पडलें नाहीं.

धनंजय हा त्यांचा एकुलता मुलगा असावा, असें सकृद्दर्शनीं वाटे. पण महिमाजींच्या मुद्रेवर संसारयात्रेचें दुःख लिहिलेलें दिसत होतें. मग तें इतर अपत्यें न जगल्याचें होतें कीं आणखी कशाचें होतें, हें सांगणें कठीण आहे. महिमाजींचें बोलणें थोडें आणि जें थोडें तें देखील आढ्यतेचें! ही आढ्यता घराण्याच्या उंचपणाची, त्या घराण्यांत आपला जन्म झाला म्हणून मानलेल्या स्वतःच्या इभ्रतीची कीं लोकांकडे पाहाण्याच्या क्षुद्रतेच्या दृष्टीची याची शहानिशा करणें कठीण आहे.

नरहरपंत देशपांडे हे जरी महिमाजींच्या बैठकींतले होते, तथापि जानबा पाटील हा त्यांतल्या त्यांत अधिक जवळचा होता. तो त्यांच्या हुक्कयाचा भागीदार होता. त्यावेळीं तो गांवांतील कमीअधिक बातम्यांचा पाढा वाची. आणि महिमाजीहि आपल्या गोपाळगोष्टी जानबाजवळ जिव्हाळ्यानें सांगत. बंडाची हूल उठली, हत्याराचा कायदा निघाला तेव्हां महिमाजींनीं आपलें स्पष्ट मत सांगून टाकलें कीं, असल्या हुल्लडीशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. दोन दिवसाचे मवास जवळ करून कंपनी सरकारच्या शाश्वत सत्तेला विरोध करावयाचा नाहीं. कंपनी सरकारच्या कृपेनें आपली इनामदारी शाबूद राहिली, सबब निमकहरामपणा करावयाचा नाहीं. हत्यारांची गरज संपली आहे, त्याअर्थीं कायद्याबरहुकूम तीं परत करावयास घसघस बिलकूल उपयोगी नाहीं. अशीं आपलीं सडेतोड मतें महिमाजींनीं जानबास एकाच दमांत स्पष्टपणें सांगून टाकिलीं होतीं.

जानबाला बुचकळा पडला. बोलूं तेच करूं, असा महिमाजींचा बाणा होता. आणि ह्याच गुणाबद्दल गांवकऱ्यांत त्यांच्याविषयीं आदर व वचक असे. महिमाजी शब्दाला जागले नाहींत असें घडलें नाहीं. तथापि प्रतिशब्द ऐकून घेण्याची त्यांना संवय नव्हती. ते इनामदार असल्यामुळें ही संवय अविरोधानें दृढप्राय झाली होती. याच कारणासाठीं वस्तुस्थिति सांगावी कीं न सांगावी, असा जानबाला बुचकळा पडला.

वास्तविक जाहीरनामे निघण्यापूर्वींच बिंद्राण्याची तरुण पिढी धनाजीच्या नेतृत्वाखालीं बंडास अनुकूल झाली होती. फांशी गेलेल्यांच्या उदाहरणानें लोकांना दहशत बसण्याऐवजीं स्फुरण चढलें होतें. कारण ते फांसावर कां लटकले याचें निरूपण धनाजी परिणामकारक शब्दांनीं करीत असे. मराठशाहीचें निधन डोळ्यांदेखत झाल्यामुळें लोकांना चेतविण्यास धनाजीसारखा एखादा पुढारी पुरत असे. लोकांच्या अशा मनःस्थितींत हत्याराचा पहिला जाहीरनामा निघाला, आणि प्रतिकाराची मेढ रोंविली गेली.

जानबानें करवेल तेवढा धीर करून ही सर्व हकीकत महिमाजींपुढें मांडली. त्यांचा नरसिंह कसा खवळला असेल, हें लक्षांत येण्यास फारसें डोकें खाजवावयास नको. हकीकत समजतांच त्यांनीं पहिली गोष्ट ही केली कीं, सातान्याच्या रेसिडेंटास वस्तुस्थिति कळविली. 'आपला मुलगा धनाजी जें कांहीं करील, तें स्वतःच्या जबानदारीवर करीत असून, त्याच्याशीं कोणताहि संबंध आपण ठेविलेला नाहीं. एवढेंच नव्हे तर त्याला घर वर्ज करविलें आहे.' असा त्यांच्या अर्जीचा आशय होता.

महिमाजींनीं स्वतःची म्हणजे इनामदारीची अशी सोडवणूक करून घेतली. धनाजीला त्यांनीं कठोरपणानें घराबाहेर घालविलें आणि हीं भिकेचीं लक्षणें आठवल्याबद्दल त्याच्यावर करवले तितके जोराचे शब्दप्रहार केले. इनामदारी मिळविण्याचे किंवा सांभाळण्याचे कष्ट माहीत नसल्यामुळें हा अविचार सुचल्याबद्दल त्यांनीं धनाजीला बोल लाविला. त्यांचा कयास होता कीं, सुखासीनतेचें पांघरूण काढून टाकतांच धनाजीचे चाळे थांबतील आणि तो साखसुरतीनें नांदावयास लागेल.

महिमाजींचा हा अंदाज चुकला. बापाचे शब्द ऐकून धनाजी विरघळला नाहीं किंवा हुजत घालण्यासहि थांबला नाहीं. त्यानें घरादाराकडे पाठ फिरविली, इनामदारीचीं वस्त्रें उतरून ठेविलीं आणि बिंदुलेश्वराचा आसरा घेतला.

एकामागून एक तीन जाहीरनामे निघाले तरी बिंदाण्याच्या चावडीवर हत्यारें दाखल करण्यास चुकूनहि कोणी आलें नाहीं. ही स्थिति अनिष्ट आहे, असें मामलेदारांनीं पाटील-कुलकर्ण्यांना तसेंच देशमुखांनाहि निक्षून कळविलें. ह्या प्राप्त परिस्थितीचा विचार करणें गांवकऱ्यांना आणि देशमुखांनाहि आवश्यक वाटलें. देशमुखांना तर या माजलेल्या खुळाची चीड आली. पण झालेल्या अगर होणाऱ्या प्रकाराला आळा कसा घालावा, ही

त्यांच्या कह्यांतली गोष्ट राहिली नाहीं. उलट, आधिक ताणलें तर तुटेल, अशी नाजुक परिस्थिति निर्माण झाली.

अशा वेळीं कार्तिक शुद्ध दशमीला चौथा जाहीरनामा येऊन धडकला. मागील तीन जाहीरनाम्यांच्या अवधींत माजलेली दंगल कंपनी सरकारानें नेस्तनाबूद करून टाकली होती. कंपनीचें राज्य टिकेल न टिकेल अशी जी लोकांच्या मनांत संशयित वृत्ति निर्माण झाली होती, ती फांसावर लटकलेल्या लोकांबरोबर गतप्राण झाली. कंपनीचें राज्य चिरस्थायी झालें, असेंच सर्वांना वाटलें. त्याबरोबर चौथ्या जाहीरनाम्याचे शब्दहि रेटाईनें बाहेर पडले.

“ जर कोणी याविरुद्ध वर्तेल किंवा विरुद्ध वर्तण्यास यत्न करील व आणलेला माल ( म्हणजे हत्यारें ) समजून लपवील किंवा लपविण्याचा यत्न करील तर त्यास दोन वर्षेपर्यंत मजुरीसुद्धां कैद होईल. व शिवाय एक हजार रुपये पर्यंत दंड होईल. ”

कैद आणि दंड ह्या शब्दांनीं भेदरलेले बिंदाणेकर जीव मुठींत घेऊन देशमुखांच्या वाड्यांत गोळा झाले. कोणीतरी कळ लावली, पण आतां त्याचा परिणाम सगळ्या गांवाला भोंवणार या धास्तीनें गांवकरी एक झाले. महिमाजींनीं निक्षून सांगितलें कीं, हें बंड सुचेल त्या उपयानें मोडलें पाहिजे. नाहीं तर सर्वांच्या घरांवरून नांगर फिरेल.

महिमाजींचा अभिप्राय जानबा पाटलांनीं मान्य केला. त्र्यंबकपंत कुळकर्ण्यांनीं परिणास भयंकर होईल म्हणून हातपाय गाळले. गांवकऱ्यांची तर लांडग्याचा आवाज ऐकून मुंड्या खालीं घातलेल्या मेंढरांगत अवस्था झाली. अशा त्या निस्तेज समुदायास नरहरपंत देशपांड्यांनीं पोख्त सल्ला दिला. त्यांनीं सूर्याची आणि वाऱ्याची रूपककथा सांगून असें सुचविलें कीं, हत्यारें परत न देण्याचा ज्यांचा कृतनिश्चय झाला आहे, त्यांना कायद्याची जबरदस्ती न सांगतां त्यामुळें प्रपंचाची कशी वाताहत होणार आहे हें सांगावें. प्रपंच हत्यारावांचून चालतो, हें त्यांना पटवावें. बेकायदा वर्तनानें घरादाराची कशी

वासलात लागणार आहे, आयाबहिणींची व बायकापोरांची कोण दीन अवस्था होणार आहे याचें चित्र रंगवून त्यांना सवाल पुसावा, स्वतःच्या अविचारानें दुसऱ्याच्या तोंडचा घास कां काढतां ? अशा रीतीनें चुचकारून घेतलें तर हें बंड मोडेल.

गांवकऱ्यांना हा सल्ला देऊन नरहरपंतांनीं गांवकऱ्यांच्यासमोर आपलें म्हणणें असें मांडलें,

" आणि खरें म्हणाल तर काय आहे हो गरज हत्यारांची ? आज आपण निदान पंचवीस वर्षें पाहात आहों. ह्या दसऱ्याचें गंधफूल पुढील दसऱ्याला काढून घालण्यापलीकडे हत्यार आपण कधीं वापरलें आहे ? उमाजीचें आपण नुसतें नांव ऐकलें. रामजी भांगरे केव्हां झाला याची आपणास आठवणहि नाहीं. त्यांच्या दंग्याची झळ लागली का आपल्याला ! टोपीकर इंग्रज देवाचें वरदान घेऊन आले आहेत. आमच्या राज्यांत नव्हतों इतके आपण सुखांत आहों सध्यां. कारण आमच्या सुखासाठींच इंग्रज येथें आले आहेत. नाहीं तर कोठें सप्तसागरापलीकडे त्यांचा देश आणि कोठें आपलें बिंदाणें ! कः केन संबंधः । हत्यारांची गरजच लागूं नये, इतकी शांतता, सुव्यवस्था आणि सुबत्ता असल्यावर हत्यारांची अडगळ हवी कशाला आणि त्यासाठीं इरेला पडण्याचें कारण तरी काय ? आमचे वडील सांगत कीं, सलग दहा वर्षें डहुळा झाला नाहीं तर वाहिलेला बेल कारणीं लागला असें म्हणावयाची पाळी येई. आपण सारे बिंदाण्यांतच लहानाचे मोठे झालों. कधीं लढाई पाहिली आहे ! धरपकड आणि धामधूम अनुभविली आहे कीं हत्याराचा परज धरला आहे ! ! कशाला पाहिजेत हत्यारें ! चोर चोरी करील म्हणून कड्याकुलुपें लावावयाचीं; पण चोरच नसला तर खळखळ कशासाठीं ? खरें म्हणाल तर कंपनीचें राज्य म्हणजे रामराज्य आहे. सर्वांचीं धर्मकर्में युधिष्ठिरानें चालवावीं तशीं बिनहरकत चाललीं आहेत. धर्मरक्षणासाठींच

इंग्रजांची सोबत दैवानें दिली आहे. काळ्या रात्रीं पंढरीला जाण्याचें मनांत आलें, तरी खुशाल जावें."

देशपांड्यांनीं इंग्रजी राज्याचा महिमा अपार गाइला. आबासाहेबांना जें कांहीं म्हणावयाचें होतें, पण त्यांच्या मितभाषी स्वभावामुळें त्यांना म्हणतां आलें नसतें, तें सर्व देशपांड्यांनीं हरदासी थाटाचे दाखलेदुखले देऊन सांगितलें. सर्वांनीं माना डोलविल्या. इंग्रजांचा एखादा गुप्त हेर त्या ठिकाणीं असता, तर तो तात्काळ प्रकट होऊन 'तथास्तु' म्हणाला असता आणि नारदानें जसें एखाद्या भगवद्भक्ताचें चरित्र शेषशायी भगवानास सांगण्याचें अगत्य दाखवावें, तसें त्यानें लाटसाहेबांना देशपांड्यांचें चरित्र निकडीनें सांगितलें असतें. त्यांच्या वतनदारींतला एकादा चुकला-माकला किंवा मोडका-तोडका दुवा बेमालुम सांधून दिला असता.

बिंदाण्याच्या भूतकालीन देशमुख--देशपांड्यांनों आणि गांवकऱ्यांनों, तुमच्या बुद्धिचातुर्याची तारीफ करावी तेवढी थोडीच होणार आहे ! तुमच्या समयज्ञतेमुळेंच हत्याराच्या कायद्याचें पिल्लूं तुम्ही घरांत घेऊन पोसलें. तुमच्या त्यावेळच्या दूरदृष्टीमुळेंच आजचें बिंदाणें गांव बिंदुलेश्वराच्या पायथ्याशीं घोरपडीसारखें गच्च ठाव धरून उभें आहे. एरवीं, त्याचा चिंधीचोळा व्हावयास काय उशीर होता ?

६

मध्यरात्र टळून गेली होती. वद्य अष्टमीचें चांदणें फांकलें होतें. थंडीची शिरशिरी चमकत होती. अशा निवांत वेळीं वाळवे तालुक्याचे मामलेदार पोलीस अंमलदारासह देशमुखांच्या वाड्यासमीप आले. अंमलदाराबरोबर आलेल्या शिपायांच्या तुकडीनें वाड्याभोंवतीं गराडा दिला. शक्यतों जिवंत

पकडयाची पण नाइलाज झाला तर गोळी घालण्याची परवानगी प्रत्येक शिपायाला होती.

देवडीवरील पाहरेकऱ्यांस मामलेदार व पोलीस अंमलदार यांचीं भरघोस नांवें जानबा पाटलांनीं सुनावलीं. दिंडी-दरवाज्यांतून थेट सदरेपावेतों गेल्यानंतर जानबांनीं देवडीवरचाच मंत्र पुनः एकदां म्हटला.

अंमलदाराचें अवेळीं येणें पाहून महिमाजींना आश्चर्य वाटलें नाहीं. थोडी चीड आली. अंमलदाराला महिमाजींच्या मर्जीकडे पाहाण्याचें कारण नव्हतें.

"आबासाहेब, आपल्याला तसदी देण्याचें जिवावर येतें. पण आम्ही पडलों हुकुमाचे ताबेदार. मामलेदारसाहेबांनीं पोलिसांची मदत मागितल्यावरून साहेबांनीं माझी नेमणूक केली आहे. आपले चिरंजीव धनाजीराव या क्षणाला वाड्यांत आहेत अशी खात्रीलायक बातमी आहे. गेल्या दोनतीन महिन्यांतील त्यांच्या हालचालींवरून सरकारी कायदा मोडण्याचा त्यांचा विचार स्पष्ट झाला आहे. आणि सध्यांच्या गरम वातावरणाचा फायदा घेऊन ते बंडाळी माजवितील, लोकांचें वित्त आणि प्राण धोक्यांत घालतील, अशी कंपनी सरकाराला धास्ती वाटत आहे. सगळ्या बिंदाण्याचा त्यांस सामील होण्याचा रंग आतांपर्यंत दिसत होता. पण गेल्या आठ दिवसांत बहुतेक सर्वांनीं हत्यारें परत देऊन कंपनीच्या सुव्यवस्थेला मदत केली आहे. आपल्या चिरंजिवांप्रमाणेंच जानबांचा मुलगाहि खळखळ करील असें वाटत होतें; पण तो कालच घरीं आला आहे. म्हणजे आपल्या चिरंजिवांवांचून कोणीहि बेकायदा हत्यार बाळगण्यास राजी नाहीं, असें सिद्ध झालें आहे. एकाद्या माणसाचा बंदोबस्त करणें कंपनी सरकारास जड नाहीं. पण सामोपचारानें प्रकरण मिटवावें, आपली नाहक बदनामी होऊं नये, असें आम्हांस वाटतें. धनाजीराव गुन्हा कबूल करतील आणि शस्त्रें देतील तर अजूनहि वेळ गेली नाहीं."

अंमलदारनें मोठ्या तोलदारीनें भाषण केलें. त्यांत आरोप ठेवण्यापासून तों तडजोड करण्यापर्यंतचे सर्व मुद्दे होते. महिमाजींनीं त्याचें म्हणणें शांतपणें

ऐकून घेतल्यानंतर अंमलदाराला उद्देशून पण वस्तुतः मामलेदारांकडे पाहात म्हटलें,

" माझा मुलगा या क्षणीं या वाड्यांत आहे याची मला दखलगिरी नाहीं. तो नसावा अशी माझी समजूत आहे. कंपनी सरकाराचा पहिला जाहीरनामा निघाल्यापासून त्यानें माझ्या मनाविरुद्ध वर्तन केल्यामुळें, त्याला हें घर वर्ज्य आहे."

" कबूल आहे. पण मनुष्य-स्वभावाचा विचार करतां बायकामुलांचा निरोप घेण्याचा मोह टाळतां येण्यासारखा नाहीं. "

" म्हणजे निरोप घेण्यापुरता तरी मी त्याला आसरा दिला, असा आपल्या म्हणण्याचा इत्यर्थ दिसतो. पण हळवेपणाची इतकी कूस माझ्या स्वभावांत नाहीं. मला वाटतें, मामलेदारसाहेब मला पुरते जाणतात. "

" आपल्याबद्दल आम्हांला तिळमात्रहि अविश्वास वाटत नाहीं. मी पोलीस अमलदार असलों, तरी कुटुंबवत्सल आहे. मुलाची माया तोडण्यास किती कठीण असते, याची मला कल्पना आहे."

" याचा अर्थ उघड असा होतो कीं, तो माझ्या संमतीनें कांहीं घटकेपुरता तरी घरीं आहे. मी आपल्या या गर्भित आरोपाचा इन्कार करितों. मला सत्याची जितकी चाड आहे, तितकीच छपवाछपवीची चीड आहे. माझा मुलगा बेकायदा वर्तत असला तरी तो चोरून घरीं येण्याचा नैतिक गुन्हा करणार नाहीं, असा माझा विश्वास आहे. तो माझ्या मताविरुद्ध वागतो हें मला मान्य असलें तरी त्याच्या निडरपणाबद्दल मी त्याला चाहतों. आपण सरकारी अधिकारी आहां. संशयिताचा झाडा घेण्याचा आपला अधिकार आहे. मी त्या अधिकाराआड येऊं इच्छित नाहीं. आपण माझ्या वाड्यांत कोठेंहि जाऊं शकतां. "

महिमाजींनीं ज्या आरोपाचा इन्कार केला, त्याच आरोपाच्या शाबितीसाठीं अंमलदार आला होता. एरवीं, महिमाजींच्या वाड्यांत फेरफटका करण्याची त्याला कांहीं हौस नव्हती !

महिमाजींचा ताठरपणा पाहून मामलेदारसाहेबहि चुळबुळ करूं लागले. त्यांना वाटलें, महिमाजी म्हणतात तसा प्रकार खराच असला तर ? अधिकाराचा दुरुपयोग आणि तो देखील महिमाजींसारख्या इभ्रतदार माणसाच्या बाबतींत झाल्यास आपल्याकडे थोडा कमीपणाच येणार !

पण पोलिस अंमलदार मात्र महिमाजींच्या कडव्या शब्दानें अणुभरहि चिरला नाहीं. आरोपशाबितीसाठीं करावी लागणारी सगळी पूर्वतयारी त्यानें कसून केली होती. जानबाच्या मुलाकडून त्यानें साद्यंत हकीकत समजून घेतली होती. बिंदुलेश्वराच्या डोंगरांत तो स्वतः हिंडून आला होता. सायंकाळपासून त्यानें आपलीं माणसें धनाजीच्या पाळतीवर ठेविलीं होतीं. धनाजीनें बिंदुलेश्वराचा आसरा केव्हां सोडला, तेथून तो गांवांत केव्हां आला आणि मध्यरात्रीच्या सुमारास त्यानें वाड्यांत प्रवेश कसा केला, इतकी बयाजवार माहिती त्या अधिकाऱ्यानें इंग्रजी कसोशीनें मिळविली होती. धनाजी वाड्यांत आहे, याची माहितगारी महिमाजींस नाहीं हेंहि त्याला ठाऊक होतें. पण महिमाजींचा तो आग्रह पाहून अंमलदारालाहि त्यांचा पाणउतारा करण्याचा मोह पडला. आरोपाच्या शाबितीसाठीं आणलेला हुकमी एक्का म्हणजे धनाजीच्या सहवासांत अखेरपर्यंत असलेला जानबाचा मुलगा त्यानें महिमाजींपुढें हजर केला.

"कालपर्यंत मी धनाजीबरोबर होतों. बायकामुलांना भेटण्यासाठीं आम्हीं दोघांनींहि आज गांवांत यावयाचें ठरविलें होतें. कारण उद्यांपासून बिंदुलेश्वराचा डोंगर सोडून तिवऱ्या वाटानें कोंकणांत अगर पन्हाळ्याकडे जाण्याचा आमचा विचार ठरला होता. आमच्यांतून फुटलेले लोक आमच्या

सगळ्या गुप्त जागांची आणि बेतांची माहिती उधळतील आणि आमचें येथें राहणें बिकट होईल, म्हणून आम्हीं तरतूद करून ठेविली होती."

जानबाच्या मुलाची जबानी ऐकत असतां महिमाजींचा गंभीरपणा ढळला. आपल्या मुलानें असल्या गळेकापू दोस्तावर विश्वास टाकल्याबद्दल त्यांना चीड आली असावी, अथवा आपल्या मुलानें बायकोच्या गळ्यांत हात टाकण्याच्या मोहानें वाममार्ग पत्करल्याबद्दल घृणा वाटली असावी. जानबाच्या मुलाकडे आगीच्या दृष्टीनें पाहात महिमाजी खेंकसले,

"मग तूं कां हा वीरश्रीचा मार्ग पत्करलास?"

"त्याचा खुलासा वेळप्रसंग पाहून होईल. तूर्त आम्ही आमच्या कामाला लागतों."

धनाजी सांपळ्यांत सांपडल्यासारखा वाड्यांत अचूक हातीं लागेल, याबद्दल महिमाजींना किंचितहि दुःख झालें नाहीं. मात्र स्वतःवर आलेला दुटप्पीपणाचा आरोप त्यांना असह्य झाला. त्यांचें अंग कापूं लागले, डोळे लाल झाले आणि ओठ थरथरूं लागले. गुन्हा करून पोरानें स्वतःचें आणि घराण्याचें नांव तर बद्दू केलेंच पण बापाच्या सत्यप्रियतेवरहि डांबर ओतलें, याचा महिमाजींना फार राग आला.

असें हें भेदक नाटक सदरेवर रंगलें होतें; तर त्या सदरेपलीकडे देवघरांत साक्षात् कारुण्यालाहि पाझर फुटतील असें दुसरें एक नाटक रंगून संपलें होतें. जानबाच्या मुलाची जबानी संपतांच त्या नाटकाचा अखेरचा पडदा सरकूं लागला होता.

पोलीस अंमलदार सदरेवरून हलला, त्याच वेळीं वाड्याच्या दक्षिण दरवाज्यावर पाळतीवर ठेविलेल्या शिपायांची आणि एका निधड्या वीराची झटापट सुरू होती. वर्मीं लागलेल्या घावानें एक किंकाळी फुटली आणि ती पुरी होण्यापूर्वींच बंदुकांची एक फैर झडली. सदरेवर आणि देवघरांत या प्राणघातक नादाचे निनाद उमटले. महिमाजींनीं दृष्टि विस्फारली. इतक्यांत

देवघरांतून हृदय पिळवटणारा आक्रोश ऐकूं आला. त्याची धार इतकी तीव्र होती कीं त्यानें वटवृक्ष उन्मळून पडला असता, वाड्याची चिरेबंदी ढांसळली असती, जितें पाणी आटून गेलें असतें.

महिमाजींनीं कानावर हात ठेवून डेकें दाबून ठेविलें आणि डोललेलें शरीर सांवरण्यासाठीं खांबाचा आधार घेतला.

हत्याराच्या कायद्याचा जय झाला !

## ७

हत्याराच्या कायद्याचा जय झाला !

ऑगस्टांत जारी केलेला कायदा अवघ्या चार महिन्यांत फलद्रूप झाला. छत्रपतींचा सातारा इलाखा संपूर्णतया निःशस्त्र झाला. शोभेसाठीं आणि पूजेसाठीं एकाद–दुसरें हत्यार माणूस पाहून बहाल करण्यांत आलें. बिंदाण्याच्या धनाजी देशमुखासारखे आणखी कांहीं प्रतिकारी निघाले असले तरी ते अपवादादाखल ! हत्यारास पारखें झाल्याचा काढ कुणालाहि आला नाहीं ! कंपनीच्या सुराज्याच्या सुपारीचें खांड तोंडांत टाकून पोटावर हात फिरविणारी राजनिष्ठ प्रजा निर्माण झाली होती !

बंडाची गुप्त बातमी देणाऱ्या सदाशिव खंडेरावास इंग्रजांनीं पुनः भोराच्या कारभारीपदावर बसविलें. शिवाय त्याला सहाशें रुपयांचा मानाचा पोषाख आणि दरसाल पांचशें रुपयांचा एक गांव बक्षीस दिला.

लक्ष्मणसिंगाच्या कानगोष्टीला वश न होतां ज्या सुभेदारानें राजनिष्ठा दाखविली त्याला तिसऱ्या प्रतीचा सरदार करण्यांत आलें. तरुण छत्रपतींना अतःपर इंग्रजांशीं एकनिष्ठ राहण्याचा योग्य सल्ला दिल्याबद्दल यशवंत मल्हार चिटणिसांना तीन हजार रुपये बक्षिस मिळाले. सारांश, कंपनीचें राज्य

चिरस्थायी होण्यास ज्यांनीं ज्यांनीं कायी-वाचा-मनें मदत केली, त्या त्या सर्वांचीं तोंडें गोड झालीं, हात ओले झाले, आणि खिसे गरम झाले.

जानबा पाटलाच्या मुलानें, धनाजीनें घातलेल्या घोळापासून महिमाजी संताजी ऊर्फ आबासाहेब देशमुख सर्वस्वीं अलिप्त होते आणि धनाजीला वाड्यांत प्रवेश करून देण्यांत त्यांचें बिलकूल अंग नव्हतें, याबद्दल निर्वाळा दिला. मामलेदारांनीं महिमाजींच्या सत्यवचनी बाण्याचा पाठपुरावा केला. संशयनिवृत्ती झाल्यामुळें पोलिस अंमलदारनें मामलेदारांच्या म्हणण्याला दुजोरा दिला. परिणाम असा झाला कीं, देशमुखांच्या वतनाला अगर इतमामाला केंसाचाहि धक्का लागला नाहीं. त्याचेंच फळ आज धनाजीच्या नातवा–पणतवांना चाखावयास मिळत आहे. मात्र केवळ नांवापलीकडे धनाजीची ओळख त्यांच्यांत नाहीं. कदाचित् महिमाजींनीं जाणूनबुजूनच त्याच्या नांवावर आणि सच्चरित्रावर शाई ओतून चिताड करून टाकलें असेल. मग हत्याराच्या कायद्यासाठीं जीव पणास लावणाऱ्या ह्या वीराची कोणती स्मृति आज शिल्लक आहे ?

अतृप्त वासनांमुळें धनाजीला सुखानें मरण आलें नसेल किंवा बापाच्या विरोधामुळें तो मृत्युसमयीं संत्रस्त झाला असेल, त्यामुळें त्यानें दिलेला शाप घराण्याला बाधेल अथवा तो भूतपिशाच्च होऊन वास्तूभोवतीं घिरट्या घालीत असेल अशा समजुतीनें महिमाजींनीं दर अमावास्येस दुपारीं दक्षिण दरवाज्याजवळ पान वाढून ठेवण्याचा आणि तिन्हीसांजीं शेरणी टाकण्याचा उपक्रम सुरू केला. तो आजतागायत त्यांचे वंशज पाळीत आहेत. याचें कारण त्यांना माहीत नाहीं. हा एक कुलधर्म आहे एवढेंच ते समजतात. बस्स् ! हीच त्या वीराची लाचार स्मृति ! !

